पुणें अ. वि. गृह प्रकाशन

साधन-परिचय

अर्थात्

# महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास

इ. स. १६२४ ते १८५९ या सुमारें अडीचशें वर्षांतील
मराठ्यांच्या इतिहासावर प्रकाश पाडणारीं
२५० तत्कालीन अस्सल पत्रें व वेंचे

संपादक

श्री. द. वि. आपटे, बी. ए.,
इतिहास संशोधक
प्रा. रा. वि. ओतुरकर, एम्. ए.

सभासद
भारत इतिहास संशोधक
मंडळ, पुणें,

शके १८६२ ] किंमत रु. २ [ इ. स. १९४१

भा० इ० सं० मं० चे सभासदांस रु. १४१२

मुद्रक प्रकाशक
विष्णु गंगाधर केतकर,
व्यवस्थापक, लोकसंग्रह छापखाना,
६२४ सदाशिव, पुणे २.

'तात्पर्य, एक अस्सल चिटोरें सर्व बखरींच्या बहुमताला
हाणून पाडण्यास बस्स आहे.'

—राजवाडे प्रस्तावना खं. १ पृ. ४

# प्रस्तावना

प्रस्तावनेत ग्रंथाचें प्रयोजन व स्वरूप सांगावयाचें व ऋणनिर्देश करावयाचा.

महाराष्ट्रांत जुन्या ऐतिहासिक कागदपत्रांचें संशोधन सुरू होऊन चाळीसहून अधिक वर्षे होऊन गेलीं. एवढ्या काळांत प्रकाशित झालेल्या पत्रांची संख्या ३०।३५ हजारावर असेल! या प्रकाशित पत्रांचा परिचय करून देणें हा या ग्रंथाचा उद्देश आहे.

प्रस्तुत पुस्तकांत निरनिराळ्या ८३ पुस्तकांतून उतारे घेतले आहेत हें पुस्तकावरील आधारभूत ग्रंथांच्या यादीवरून लक्षांत येईल. ग्रंथ चाळून उतारे निवडूनही विस्तारभयास्तव घेतले नाहींत असे आणखी किती तरी ग्रंथ आहेत. खेरीज न चाळलेलीं अशीं आणखी पुस्तकें असणारच. पुण्यासारख्या ठिकाणी भा० इ० सं० मंडळ ग्रंथालय, सर परशुरामभाऊ कॉलेज लायब्ररी, केसरी ग्रंथालय, गु. प्रो. पोतदार यांचा खाजगी ग्रंथसंग्रह अशीं संग्रहालयें आहेत म्हणून तरी शंभराहून अधिक पुस्तकें चाळता आली व निवडक उतारे काढता आले.

वर सांगितलेल्या प्रकाशित पत्रांखेरीज अप्रकाशित हस्तलिखित भांडार त्याच्या किती तरी पटीने मोठें आहे. पण इतिहासाची साधनें प्रकाशित होऊनही त्यांचा पुरेसा उपयोग होत नाही. संशोधकांनीं परिश्रम करून व संशोधन-संस्थांनी स्वार्थत्याग करून ग्रंथ प्रकाशित करावे व मराठी वाचकां-कडून त्यांचा परामर्ष घेतला जाऊं नये, यामुळें संशोधक पिचून जावा असा प्रकार दृष्टीस पडतो, तो टाळण्यासाठीं संशोधन सामान्य वाचकांच्या आटोक्यात आणण्याचा हा एक नम्र प्रयत्न आहे. जुन्या कागदपत्रांतून अपरिचित भाषा, त्यांतील अजरख्तखानें, अर्बा सल्लासीन मया व अलफ, असे शब्दप्रयोग आल्याबरोबर, सामान्य वाचकच नव्हे तर पढिक पदवीधर देखील हातीं घेतलेलें पुस्तक बाजूस ठेवून देतो, ही स्थिति पालटली पाहिजे.

प्रस्तुत पुस्तकांत इ. स. १६२४ पासून इ. स. १८५९ पर्यंतच्या २३५ वर्षांतील २५० अस्सल पत्रें व उतारे कालानुक्रमानें संग्रहित केले आहेत. होतां होईतों तत्कालीन अस्सल साधनावर भर दिलेला आहे. हे उतारे निवडतांना मोठी अडचण भासली ती कोणते उतारे गाळावेत हें ठरविण्याची. अशीं किती तरी नमुनेदार पत्रें विस्तारभयास्तव बाजूस ठेवावीं लागलीं. तरी देखील निवडलीं याहून अधिक निवडक पत्रें निवडतां आली असती हे कबूल केलें पाहिजे. सदरहू पत्रांवर इतक्या भरपूर व अर्थबोधक टीपा लिहिल्या आहेत की, वाचकांस पत्राचा अर्थ लागण्यास अडचण राहणार नाहीं. मात्र सर्व पत्रचे पत्र सुलभ मराठीत करून वाचकांचे अभ्यासाचे श्रम वांचवावे असें मात्र केलें नाहीं. कारण असा ऐदीपणा परिणामीं इष्ट नाही. जुन्या संशोधन ग्रंथांतून पत्रांचे जे जे प्रकार दिसून येतात त्यांतील बहुतेक नमुने यांत संग्रहित केले असल्यानें या ग्रंथाचे उपयोगाने मराठीच्या अभ्यासकांस सतराव्या व अठराव्या शतकातील प्राचीन मराठी गद्याचें दालन खुलें होईल अशी आशा आहे. अर्थबोधक टीपा लिहिण्यासाठी **मराठी शब्दकोशाचा** बहुमोल उपयोग झाला.

दुय्यम शाळांतून इतिहासाध्यापनाची पद्धत दिवसेंदिवस सुधारत आहे मूळ-साधनांच्या साहाय्यानें इतिहासाचा पाठ अधिक उपयुक्त करावा हे शिक्षणपद्धतीचें तंत्र आतां शिक्षकांस अवगत झाले असून त्यांना असा निवडक साधनसंग्रह हातार्शीं नसल्यानें मोठी अडचण पडते. पुण्या-मुंबईसारख्या ठिकाणीं साक्षेपी इतिहास-शिक्षकानें मनांत आणले तर साधनें मिळतात तरी; पण जिल्हा- तालुक्याचे ठिकाणीं हें शक्य नाहीं. खेरीज अगदी संपन्न शाळांखेरीज इतर शाळांना हा सर्व ग्रंथसंग्रह जमविणें दुष्कर जाईल हे लक्षांत घेऊन, इतिहास शिक्षकांचे हातीं इतिहासाध्यापनाचे एक अद्ययावत् साधन सुसज्ज करून द्यावें म्हणून हा यत्न आहे. मात्र, शिक्षकाने इतिहास शिकविण्यासाठीं या साधनांचा उपयोग करतांना हें लक्षांत ठेवावें की, हीं साधने आहेत, इतिहास नव्हे. साधनांच्या साहाय्यानें इतिहासकालीन वातावरण व पार्श्वभूमि निर्माण होईल, पण ऐतिहासिक घडामोडींची साक्षेपीपणानें केलेली कार्यकारणमीमांसा ही येथें आढळणार नाही. तें कुशल इतिहासकारांचेंच काम आहे. पुढें दिलेल्या पत्रांतून इतिहास बनविणाऱ्या व्यक्ती आपला

इतिहास स्वमुखानें मांगत आहेत. पण त्यांच्या प्रामाणिक जबानींतही कांहींसा एकतर्फीपणा असणारच. तेव्हां त्यांचा सावधपणानें उपयोग केला पाहिजे.

केवळ राजकीयच नव्हे तर तत्कालीन सामाजिक पार्श्वभूमि व धर्म-समजुती यांवर प्रकाश पाडणारीं ४० वर पत्रें या संग्रहांत आहेत; तीं वाचकांस अधिक मनोरंजक वाटतील.

सदरहू पत्रे कालानुक्रमाने लावलीं असल्यानें तीं क्रमाने वाचीत जाणारास मराठी राजवटीचा उदयास्त व इंग्रजी अंमलाचा उदय याची अभावितपणें क्रमवार कल्पना येऊन तिचा मनावर परिणाम होतो. नुसती अनुक्रमणिका चाळणारासही याचा अनुभव येईल. तसेंच या कालानुक्रमामुळें मराठी गद्याची २५० वर्षांतील स्थित्यंतरेंही अभ्यासकांस पाहावयास सांपडतील.

सारांश, (१) इतिहासाध्ययनाचें एक अर्वाचीन सुसज्ज साधन म्हणून, किंवा (२) इतिहाससंशोधनाच्या मार्गावर पहिलें पाऊल टाकणारास साह्य म्हणून, किंवा (३) मराठी गद्याचें प्राचीन स्वरूप समजण्यासाठीं म्हणून, या तिहींपैकीं एका किंवा अधिक उद्देशानें या ग्रंथाचा उपयोग होऊं शकेल अशी आशा आहे. अपरिचितपणामुळें दुर्बोध व दारिद्र्यामुळें दुर्मिळ झालेल्या ऐतिहासिक साधनांचा पाट काढून तो विद्यार्थी, शिक्षक व सामान्य वाचकांच्यापर्यंत नेऊन पोहोंचवावा व अशा रीतीनें संशोधक व सामान्य वाचक यांतील अंतर कमी करून संशोधकास सध्यां प्राप्त झालेली वरिष्ठ दर्जाची "अस्पृश्यता" कमी करावी यासाठी हा यत्न आहे.

प्रस्तुत पत्रें कोणत्या तत्वावर निवडावीत हे ठरवून ती निवडण्याचें काम श्री. आपटे व श्री. ओतूरकर या दोघांचें आहे. यानंतर निवडलेल्या पत्रांस टिपणें देण्याचें काम मुख्यतः श्री. ओतुरकर यांनी केलेलें आहे. अर्थात संपादनात व्यक्त झालेल्या मतांची जबाबदारी श्री. ओतुरकर यांची आहे हें सांगणें नकोच. पुस्तकास जोडलेल्या प्रदीर्घ शुद्धि पत्राचें समर्थन करण्यापेक्षा त्यासंबंधीं मुग्ध राहणेंच बरें.

**ऋणनिर्देश :**—प्रथम ऋण त्या संशोधकांचें, की ज्यांच्या ग्रंथांतून हे उतारे घेतां आले. यानंतर इतरांचें. प्रस्तुत पुस्तकांत संग्रहित केलेल्या पत्रांवर टीपा लिहितांना श्री. शंकरराव जोशी व श्री. ग. ह. खरे यांचें वारंवार

साहाय्य झालें. श्री. महाबळ, बी.ए. यांनीं कठिण शब्दांचे अर्थ काढले, श्री. शं. दा. चितळे, एम्.ए., बी.टी. यांनीं इ. स. १७६१ ते ९५ या काळांतील उताऱ्यांवर सूचक प्रश्न लिहिले, श्री. सी. म. लिमये, श्री. बिवलकर, श्री. वसंत ओतुरकर यांनीं उतारे नकलण्याचें काम केलें. श्री. भा. वि. भावे यांनीं सूचि तयार केली. व श्री. वि. गं. केतकर व्यवस्थापक, अ. वि. गृह, यांनीं हें पुस्तक प्रकाशनाची जबाबदारी पतकरली. श्री. य. न. केळकर व एलिनेशन ऑफिसचे कमिशनरसाहेब यांनीं आपल्या संग्रहांतील उतारे प्रकाशनास घेऊ दिले. याबद्दल या सर्वांचे मनापासून आभार मानतो.

चैत्र व. ११, शके १८६३
पुणें, २२-४-४१

ग. वि. ओतुरकर

---

# आधारभूत ग्रंथांची यादी

सदरहू आधारभूत ग्रंथ असे आहेत की, ज्यातून प्रत्यक्ष उतारे निवडले. ग्रंथ चाळून विस्तारभयास्तव उतारे निवडले नाहींत अशीं आणखीही पुस्तकें आहेत. या आधारभूत ग्रंथांत कांहीं आधार दुय्यम प्रतीचे आढळतील. उदा०, पत्रसारसंग्रह, रामदासवचनामृत वगैरे. हे आधार तसेच कायम ठेवण्याचा उद्देश उतारा तेथून घेतलेला आहे व त्यांत केलेले संक्षेप या पुस्तकांतील उताऱ्यांतही कायम ठेविले आहेत. मात्र शक्य तोंवर उतारा मुळांतून तपासून पाहिला आहे. उताऱ्यांत आलेलीं विरामचिन्हें ही मूळच्या मोडी कागदांतील नव्हेत. ऐतिहासिक कागदपत्रांच्या संपादकांनीं घातलेली आहेत.

**—संपादक**

| | |
|---|---|
| १. श्रीरामदासवचनामृत | संपादक प्रो. रा. द. रानडे |
| २. पत्रसारसंग्रह, भा. १ व २ | शिवचरित्र कार्यालय, भा. इ. सं. मं., पुणें |
| ३. शिवचरित्रप्रदीप | भा. इ. सं. मंडळ |
| ४. शिवचरित्रसाहित्य, भा. २ व ५ | ,, ,, |
| ५. शिवभारत | ,, ,, |
| ६. भा. इ. सं. मंडळ, त्रैमासिक, वर्ष ८, ९, १७, २० | सं. प्रो. द. वा. पोतदार व सरदार गं. ना. मुजुमदार |
| ७. भा. इ. सं. मंडळ, वार्षिक इतिवृत्त शके १८३५ व १८३७ | |
| ८. ई. इं. कंपनीचा पुणें दरबारशीं फारशी पत्रव्यवहार | सं. सरदार गं. ना. मुजुमदार |
| ९. साधनचिकित्सा | ले. श्री. वा. सी. बेंद्रे |

(जुन्या कागदपत्रांतील पारिभाषिक मोडणीची व कालगणनेची ओळख करून घेण्यास हें पुस्तक फार उपयुक्त आहे.)

| | | |
|---|---|---|
| १०. | मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खं. १, ३, ५, ६, ८, १०, १५ | सं. श्री. वि. का. राजवाडे |
| ११. | अमात्यनीति | ले. श्री. रामचंद्रपंत आमात्य बावडेकर |
| १२. | सभासद बखर | ले. श्री. कृष्णाजी अनंत सभासद |
| १३. | इतिहास मंजरी | सं. श्री. द. वि. आपटे, बी. ए. |
| १४. | सनदापत्रें (Sanads and Letters) | सं. वाड व पारसनीस |
| १५. | तह व करारमदार | ,, ,, |
| १६. | शाहूमहाराज यांची रोजनिशी | ,, ,, |
| १७. | ब्रह्मेंद्रस्वामी चरित्र व पत्रव्यवहार | ले. श्री. द. ब. पारसनीस |
| १८. | इतिहाससंग्रह व. १, २, ३, ६, ७. | ,, ,, |
| १९. | काव्येतिहाससंग्रह | सं. श्री. का. ना. साने |
| २०. | पेशवेदप्तर, भा. ५, ८, ९, १२, १३, १४, १५, १७, १८, १९, २०, २४, २८, २९, ३०, ३१, ४१, ४२, ४३. | सं. रियासतकार सरदेसाई |
| २१. | स्थिरबुद्धि राजाराम | ले. ,, ,, |
| २२. | मराठी रियासत, मध्यभाग १ ला व २ रा, उत्तरविभाग १ ला | ले. ,, ,, |
| २३. | ऐतिहासिक पत्रव्यवहार | सं. रियासतकार देसाई व श्री. या. मा. काळे इ. |
| २४. | महादजी शिंदे यांचीं कागदपत्रें | सं. रियासतकार सरदेसाई |
| २५. | कुलाबकर आंग्रे सरखेल | ले. श्री. दा. गो. ढबू |
| २६. | पुरंदरेदप्तर | सं. श्री. कृ. वा. पुरंदरे |
| २७. | धार संस्थानचा इतिहास | ले. श्री. लेले व ओक |
| २८. | मोगल इतिहासाचीं साधनें (इंग्रजी) | लेन्पूल |
| २९. | ऐतिहासिक लेखसंग्रह भा. १, २, | |

४, ५, ७, ८, ९, १०, ११,
१३, १४. सं. श्री. वा. वा. खरे

३०. अधिकारयोग ले. ,, ,,

३१. पुणें रेसिडेन्सी पत्रव्यवहार
(इंग्रजी), भा. १, २, ६, सं. प्रो जदुनाथ सरकार

३२. ऐतिहासिक पोवाडे सं. श्री. य. न. केळकर

३३. ज्ञानप्रकाश (वर्तमानपत्र),
व. १ लें संग्राहक एलिएनेशन ऑफिस

३४. धूमकेतू (वर्तमानपत्र), वर्ष ६ वे संग्राहक श्री. य. न. केळकर

३५. माझा प्रवास अथवा १८५७
सालच्या बंडाची हकीकत ले. विष्णुभट गोडसे

# जुनी कालगणना

( लेखक :—श्री. **द. वि. आपटे,** बी. ए. )

इंग्रजी किंवा मराठी कालगणना ज्याप्रमाणें आकड्यांतून मांडण्याची पद्धत आहे तसा प्रकार जुन्या कागदपत्रांतून उल्लेखिलेल्या सुहूर सनासंबंधी नाही. तो सन शब्दांत लिहितात. जसें ' अर्बा सबैन व अलफ ' या कालगणनेचें स्पष्टीकरण पुढील मजकुरावरून होईल. पुढील उतारे समजण्यास कालगणना समजून घेणें अवश्य आहे.

## चांद्रमान व सौरमान वर्षांचें स्पष्टीकरण

जुन्या मराठी कागदपत्रांत इसवी सन किंवा जानेवारी, फेब्रुवारी वगैरे महिने नसतात; त्यांच्या जागीं चैत्र, वैशाख इत्यादि मराठी महिन्यांचीं किंवा मोहरम, सफर इत्यादि मुसलमानी महिन्यांची नांवे आणि शालिवाहन शक, राज्याभिषेक शक किंवा सुहूर, फसली अगर हिजरी सन इत्यादि कालगणनेचे आकडे आढळतात. चैत्रादि व मोहरमादि महिने चांद्रमानाचे (म्हणजे सुमारें २९॥ दिवसांचा एक महिना या पद्धतीचे) असतात; पण वर्षे बहुधा सौरमानाची (म्हणजे ३६५। दिवसांचे एक वर्ष या पद्धतीची) असतात; फक्त हिजरी वर्ष मात्र (२९॥ × १२ = ) ३५४ दिवसांचें असतें. चैत्रादि गणनेत महिने चांद्र असले तरी २॥ वर्षांनीं एक अधिक महिना धरतात; यामुळें वर्षाचें सरासरी मान ३६५। दिवसांचें म्हणजे सौरमानाचे असतें. मोहरमादि गणनेंत अधिक महिना धरीत नाहीत; यामुळें हिजरी वर्षाचा सौरमानाशीं मेळ राहात नाहीं; म्हणजे चैत्र वैशाखांत उन्हाळा, श्रावण महिन्यांत पावसाळा असें मराठी महिन्यांसंबंधीं म्हणतां येतें तसें मोहरमादि गणनेसंबंधीं म्हणतां येत नाहीं. मोहरम महिना कधीं उन्हाळ्यांत येतो, कधीं पावसाळ्यांत येतो तर कधीं हिंवाळ्यांत येतो. यामुळें उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा यांचा फेरा साधणें हें जें काम ' वर्ष ' या शब्दानें होणें आवश्यक असतें तें

हिजरी कालगणनेनें होत नाहीं. यासाठीं मुसलमानी राज्यांत देखील हिजरी गणना सोडून सौर वर्षाची पद्धति स्वीकारावी लागली. सुहूर सन व फसली सन यांचा प्रारंभ सौर पद्धतीचा असतो व इसवी सन व जानेवारी वगैरे महिने सौर असतात. यामुळें सुहूर सनाचा प्रारंभ इंग्रजी तारखेशी जुळता असतो.

## जंत्री म्हणजे काय ?

गेल्या सवाशें वर्षांत इसवी सन व जानेवारी वगैरे महिन्यांच्या तारखा महाराष्ट्रांत रूढ झाल्यामुळें जुन्या पत्रांतले चैत्रादि अगर मोहरमादि कालांचे उल्लेख इसवी सन व तारखा या रूपांत समजून घेणें आवश्यक असतें. ही सोय ज्या ग्रंथांत केलेली असते त्याला 'जंत्री' म्हणतात. उदाहरणार्थ, 'खरे जंत्री', 'मोडक जंत्री', 'संशोधकांची छोटी जंत्री' इत्यादि. शब्दकोशांत ज्याप्रमाणें एका भाषेंतल्या शब्दाला दुसऱ्या भाषेंतला प्रतिशब्द दिलेला असतो त्याप्रमाणें जंत्रीत शालिवाहन शक, महिना व तिथि किंवा सुहूर सन, मोहरमादि महिना व चंद्र यांना प्रत्येक वर्षी इंग्रजी सन, महिना व तारीख कोणती असते हें दिलेले असतें. जुन्या पत्रांतील तिथि किंवा चंद्र पाहून त्याची इंग्रजी तारीख जंत्रीच्या साह्यानें ठरवावी लागते, त्याप्रमाणें ती या पुस्तकांत दिलेली आहे. अभ्यासकाम ती ताडून पाहतां येईल.

## मुसलमानी व मराठी महिने

**मुसलमानी महिने** :—१ मोहरम, २ सफर, ३ रबिलावल, ४ रबिलाखर, ५ जमादिलावल, ६ जमादिलाखर, ७ रजब, ८ साबान, ९ रमजान, १० सवाल, ११ जिल्काद, १२ जिल्हेज.

**मराठी महिने** :—१ चैत्र, २ वैशाख, ३ ज्येष्ठ, ४ आषाढ, ५ श्रावण, ६ भाद्रपद, ७ आश्विन, ८ कार्तिक, ९ मार्गशीर्ष, १० पौष, ११ माघ, १२ फाल्गुन.

मराठी महिन्यांत दोन पंधरवडे असतात; पहिल्यास शुद्ध पक्ष व दुसऱ्यास वद्य किंवा 'बहुल' पक्ष म्हणतात. प्रत्येक पक्षांत १५ तिथी असतात. शुद्ध १५ व्या तिथीस पौर्णिमा व वद्य १५ स अमावास्या म्हणतात.

मुसलमानी महिन्याच्या तारखांना चंद्र म्हणतात; मराठी महिन्याच्या शुद्ध द्वितीयेस मुसलमानी महिन्याचा पहिला चंद्र येतो.

## सनाचे प्रकार

सुहूर सनाचे आंकडे शब्दांत लिहीत. ते असे—**इहिदे** = १, **इसने** = २, **सलास** = ३, **आर्बा** = ४, **खमस** = ५, **सीत** = ६, **सबा** = ७, **समान** = ८, **तिसा** = ९, **अशर** = १०, **अशरीन** = २०, **सलासीन** = ३०, **आर्बैन** = ४०, **खमसैन** = ५०, **सितैन** = ६०, **सबैन** = ७०, **समानीन** = ८०, **तिसैन** = ९०, **मया** = १००, **मयातैन** = २००, आणि **अलफ** = १०००.

उदाहरणार्थ : अर्बा सबैन व अलफ = १०७४. सुहूर सनांत ५९९ किंवा ६०० मिळविल्यानें इसवी सन येतो.

वरील मजकुरावरून लक्षांत येईल की, जुन्या पत्रांत वर्षाच्या उल्लेखांत '**अलफ**' शब्द असल्यास तें पत्र इ. स. १६०० ते १७०० या कालांतलें म्हणजे **शिवकालीन; मया व अलफ** ( = ११०० म्हणजे १७०० इ. स.) हे शब्द असल्यास तें पत्र **पेशवाईंतलें** आणि **मयातैन व अलफ** हे शब्द असल्यास **इ. स. १८०० नंतरचें** असतें हें समजेल. वर सुहूर सनांत ५९९ किंवा ६०० मिळवावे म्हणजे इ. सन येईल असा विकल्प लिहिण्याचे कारण सुहूर सनाचा प्रारंभ सूर्य मृग नक्षत्रांत प्रवेश करतो त्या दिवशीं करीत; ही तारीख मे २४ किंवा जून ५ अशी असे.*

मुसलमानी बादशाहाच्या राज्याभिषेकदिनापासून सुरू होणाऱ्या सनास 'जुलूस' म्हणतात. हा जुलूस त्या त्या बादशाहाच्या मृत्यूनें संपे. कालगणना सुहूर वा फसली वा जुलूस असो. महिने मोहरम, सफर इ. मुसलमानीच असत हें सांगणें नकोच.

शिवाजी महाराजांना शके १५९६ च्या ( = इ. स. १६७४) ज्येष्ठ शु.

---

*इ. स. १७५२ मध्यें इंग्लंडांतील पार्लमेंटनें कायदा करून ३ सप्टेंबर या तारखेस १४ सप्टेंबर म्हणावें असें ठरविलें हें येथें लक्षांत ठेवल्यास या दोन तारखांच्या विकल्पाचें कारण लक्षांत येईल.

१३ या तिथीस राज्याभिषेक झाला; त्या दिवशीं जी गणना सुरू झाली तिला **राज्याभिषेक शक** म्हणतात.

शालिवाहान शक + ७८ = इसवी सन.

मुहूर सन (शब्दांत लिहिलेला) + ९ = फसली सन (आंकड्यांत लिहिलेला).

---

## वारांचीं जुनीं नांवें

रविवार—आदित्यवार
सोमवार—चंद्रवार, इंदुवार
मंगळवार—भौमवार
बुधवार—सौम्यवार
गुरुवार—बृहस्पतवार
शुक्रवार—भृगुवार
शनवार—मंदवार, स्थिरवासर

---

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | उतारा | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २५ | १७ | इ. स. १७५९<br>इ. स. १७७० | श. १६१९<br>इ. स. १६९७ |
| ३९ | २६ | श. १५७८ | श. १५९८ |

यांखेरीज, पुस्तक छापून झाल्यावर सुटे फॉर्म प्रा. पोतदार यांचेकडे पाठविले असतां त्यांनीं मूळ मोडीवाचनाच्या व अर्थाच्या दुरुस्त्या दाखवून दिल्या. खालीं कंसांत दिलेला शब्द चुकीचा असून दुरुस्ती पुढें दिलेली आहे. वाचकांनीं या दुरुस्त्या करून घ्याव्या ही विनंति.

| पृष्ठ | | |
|---|---|---|
| १ | ओळ ९ | (अनाचारी) अनाचारी |
| ३ | ६ | आलीशान–ज्याचा मोठेपणा मोठा आहे. |
| | ,, ,, | फेरोजी निशाने–जय हे ज्याचें निशाण आहे. |
| ३ | ,, ८ | जरूर–(नाइलाजानें) अवश्य |
| ६ | तळटीप ,, ३ | मज्यालम–गाण्याबजावण्याची मैफल मज्यालस दिली याचा संदर्भार्थ मानमरातब दिला |
| ८ | टीप आंकडा ३ | अगदी–(निर्भेळ) सर्व |
| ९ | तळटीप ओळ ९ | असा पत्रावरील (शिक्का) शेरा आहे |
| १४ | ,, ,, ३ | (सखवारबाई) सकवारबाई |
| २१ | ,, ,, १ | गोड (बरे)–मूळ शब्द गौर म्हणजे सूक्ष्म विचार. |
| २३ | ओळ २ | (लिंगमगड) लिंगणगड |
| ,, | ,, ३ | (धोरप) भोरप |
| ,, | ,, ,, | (अलवारी) अशेरी |
| २५ | ,, २० | (खकम [ ? ]) खलक–लोक |
| २६ | ,, ८ | (दर्यासागर) दर्यासारंग |
| ,, | तळटीप ,, ५ | (राजापूर) दंडराजपुरी |

| | | |
|---|---|---|
| ३० | (श्लोक ३८) | (वराट) 'वराह' असावें |
| ३१ | तळटीप ओळ १ | रजतवर्ती–चांदीची काडी |
| ३३ | टीप आंकडा ७ | कुराणांत वाईट व चांगलें दोन्ही ईश्वरानें निर्माण केलें असें लिहिलें आहे, म्हणून हिंदु लोक घंटा वाजवितात, त्यास दोष दिल्यास ईश्वरानें म्हणजेच कुराणांत जें लिहिलें आहे तेंच रद्द केल्यासारखें होतें. |
| ३४ | तळटीप ओळ ४ | जुम्ला–(समाइकी जमीन) सैन्याचा भाग |
| ३५ | टीप आंकडा १० | मान–(हुकूम) संभव |
| ३५ | टीप आंकडा २० | यादी–आठवण. अर्थात् यादी धरून काळजीपूर्वक. |
| ३७ | ओळ ५ | म्हणून येथें 'जाणून' असावें |
| ३७ | टीप आकडा ३९ | बाराव्या चंद्राला शु. द्वादशीच असेल असें नाही. |
| ३८ | टीप आंकडा ३ | गनीम–(चोर) शत्रू. |
| ३९ | चौकटी कंसांतील ओळ ३।४. | 'दक्षिणची पादशाही आम्हा दक्षणियांच्या हातीं राहे तें करावें' असा कुतुबशाहाचा मनसबा होता; त्यास शिवाजीची संमति होती. मनसबा शिवाजीचा होता असें उताऱ्यांत नाहीं. |
| ४१ | टीप आंकडा ७ | कैपक्ष–(सत्पक्ष) कैवार |
| ४३ | ओळ ६ | (यक्षियार राऊ) यख्तियार राऊ–अधिकारी |
| ५२ | ओळ १२ | (बदली) बहाली |
| ५५ | उतारा ३६ ओंवी ३ चरण १ | (क्षमा करावे) क्षमावे |
| ५६ | तळटीप ओळ १ | नास्ती–(नासून जाणें) न + अस्ति–होत नाहीं |
| ६४ | तळटीप आंकडा १ | हें ठिकाण पोलादपूर असावें |
| ७१ | तळटीप आंकडा १८ | कारीचा किल्ला हा कुवारी किल्ला होय |
| ७९ | तळटीप आंकडा | (सचिव) राजाराम |

| | | | |
|---|---|---|---|
| ८७ | शीर्षक | | (चंदनी) चांदजी |
| ८८ | तळटीप आंकडा | १३ | वस्तु-हातून |
| ९८ | तळटीप आंकडा | २ | सौम्यवासर–(सोमवार) बुधवार |
| ९९ | ,, ओळ | ३ | मर्यादा–शेवट, अंत |
| १०० | ,, आंकडा | ८ | (भेटणे) तंत्रांत राहणे |
| १०४ | ओळ | ६ | हिंदुपत–(हिंदु म्हणून गाजलेले) हिंदुपति |
| १०६ | तळटीप आंकडा | ३ | रोखे करून–(उद्देश मनांत धरून) मागणीपत्र पाठवून |
| १०७ | ओळ | १८ | 'वोढीस' हे 'वोलीस' ओलीस असें असावें |
| १०८ | तळटीप आंकडा | ४ | पांढरी–(गाव ठाणावरील लोकवस्ती) गांवठाण |
| ११२ | ,, आंकडा | ५ | (हमी) भरपाई |
| ११५ | ,, ,, | २ | (मजकूर) मशारुल–प्रसिद्ध |
| १२० | ,, ,, | १४ | कूर्मावलोकन करून–दयार्द्र दृष्टीनें |
| १२५ | ,, ,, | ८ | हवाला–हमीची व्यवस्था |
| १३१ | तळटीप* | | पोता–(स्वतः) खजिन्यांत |
| १३४ | ओळ | ७ | प्राक्तानाचे गाढे–नशिबाचे शिकदर |
| १३५ | ओळ | १० | तालुका–ताबा |
| १३८ | तळटीप आंकडा | १ | उपस्त–जननेंद्रिय |
| १३९ | तळटीप आंकडा | ५ | (शिताफी, कौशल्य) जलदीनें |
| १४१ | ,, | ८ | भाडयाचे बैल=भांडयाचे–तोफखान्याचे बैल |
| १४३ | तळटीप आंकडा | १ | दाली–चामडयाचा पट्टा |
| | तळटीप आंकडा | १२ | बलखुद हें 'हालखुद' असावें. अर्थ–संयमानें |
| १४४ | तळटीप आंकडा | १ | तोहमस्तकुलीखान=नादीरशाह |
| १४७ | ,, | १३ | 'श्रीवर लिहिलें', हें 'त्रिवार दिली'. असावें (मोडीवाचनांत फरक) |
| १४९ | ,, | १३ | नर्मतेने–खुबीनें, नम्रतेनें |
| १५७ | तळटीप आंकडा | ६ | सुमारें (नेम, बेत) रोखानें |
| १६३ | ,, ,, | ६ | उगवला–(खर्च झाला) वसूल झाला |

| | | |
|---|---|---|
| १६८ | ओळ २ | (रिसायत) रियासत |
| १७५ | ,, ११ | मसनदीवर–गादीवर |
| १७६ | तळटीप आंकडा ८ | कसालियाखाले–(बेजार होणें) संकटाखालीं |
| १८३ | ,, ,, ७ | जाबता–(देखरेख) पहारा |
| १९३ | | |
| १९९ | तळटीप आकडा ४ | खंदार हें गावाचें नांव आहे |
| २११ | ,, ,, ४ | साहित्य (तजवीज) सामान |
| २२० | ओळ १४ | (फटफळ) फटकळ |
| २२९ | तळटीप आंकडा ४ | वोढ–(त्रास, कष्ट) आर्थिक अडचण |
| २३१ | ओळ ११ | 'सलामत' हा शब्द 'सलाबत' असावा. अर्थ–धाक |
| २४० | ,, ३ | उपकार हा शब्द उपहार असावा |
| २४७ | तळटीप आकडा ६ | पैगाम (बोलाबोली) संधान |
| २६० | ,, ,, ८ | काफरशाही–(काफर–अधर्मी लोक) अधर्मी लोकांची बादशाही |
| २७६ | ,, ,, ६ | साा–(समजावा) सबब |
| २९३ | ,, ,, ८ | गलफ–(मूळ शब्द 'गलेफ' अभ्रा) अर्थात् गवसणी |
| ३११ | ,, ,, ७ | विाा (विषयीं) विद्यमाने |
| ३२० | ओळ ६ | शादनामी हा शब्द 'शादमानी' असावा अर्थ–खुशाली |
| ३२८ | उतारा २४२ | सांकेतिक पत्राचा अंदाजानें अर्थ पुढीलप्रमाणे: दोन तोफा पडून आहेत. मारा फार झाला तरी त्यास (मारा पिण्याचा) अधिक शोष लागला आहे. आणि चातकाप्रमाणें तोफांच्या आवाजाचें भक्ष्य त्या मागत आहेत. आज हुकूम होतांच श्रीमंतांचे पायापाशीं हजर होतील. |

# महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास

## अनुक्रमणिका

## संभाजी (१६८०–८९)



## राजाराम (१६८९–१७००)

## दुसरा शिवाजी (१७००–१७०७)



## शाहू (१७०७–४९)

## पेशवा बाळाजी विश्वनाथ (१७१३–२०)



## पेशवा पहिला बाजीराव (१७२०–४०)

## पे० बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब (१७४०–६१)



## छत्रपति रामराजा (१७४९–७७)

## पे० थोरले माधवराव (१७६१–७२)

## पे० नारायणराव (१७७२–७३)



## बारभाईंचा कारभार



## पे० सवाई माधवराव (१७७४–९५)



## छत्रपति दुसरा शाहू (१७७७–१८०८)

## दुसरा बाजीराव (इ० स० १७९५–१८१८)

## छत्रपति प्रतापसिंह (१८०८–३९) व शहाजी (१८३९–४८)

## पुनरुत्थानाचा प्रयत्न

# पत्रांचें वर्गीकरण

---

**१—सामाजिक परिस्थितीवर प्रकाश पाडणारीं.—**

१, ८, २७, ४०, ८६, १०५, १०६, १०७, १०८, १०९, ११०, १११, ११२, ११३, ११४, १४६, १५१, १५२, १६६, १६८, १६९, १७४, १८४, १८६, १८९, १९४, २००, २०१, २०२, २१०, २१४, २३१, २३३, २३५, २३९, २४०, २४१, २४३, २४४, २४५.

यांखेरीज अन्य उताऱ्यांतून अप्रत्यक्षपणे तत्कालीन सामाजिक स्थिति व्यक्त झालेली आहे.

**२—वाङ्मयाचे निवडक नमुने.—**

**काव्य** :—१, ८, २७, ३६.

फारशी प्रचुर गद्य :—२, ५, २३५.

जुनें मराठी गद्य :—२४, २५, २६, ३२, ४४, १०२, ११९, १२५, १३०, १३४, १३७, १५४, १६५, २४२. याखेरीज इतर बहुतेक उतारे जुन्या मराठी गद्याचेच आहेत.

**३—लढाईतील हाणामारीचें वर्णन.—**

३८, १०४, १४२, २१८.

---

-दुसऱ्या बाजूस संभाजीची सनद दिली आहे. मूळ कागद भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, पुणें, यांच्या संग्रहालयांत ठेविला आहे. अशा हजारों मोडी पत्रांसाठीं संशोधकांनीं हिंडून, तीं जमवून, जुळवून, नकलून, ताडून, अर्थफोड करून निराश न होतां परिश्रम केले!

पत्रें कोठें सांपडतील याचा नेम नाहीं; पत्रांत काय उपलब्ध होईल याची कल्पना नाहीं; पत्रांच्या मालकास त्याचें महत्त्व समजत नाहीं; सामान्य वाचकांस यांची गोडी नाहीं अशा स्थितींत कष्टास न कंटाळतां संशोधकांचें किचकट काम चालू होतें व आहे!

या कष्टाचीं फळें आजच्या पिढीस मिळत आहेत, कारण या कागदपत्रांनीं महाराष्ट्राचें अंतरंग स्पष्ट करून दाखविलें आहे.

# संभाजीची सनद



या पत्राच्या वाचनासाठीं पृ० ६१ 'फोंड्याची लढाई' पहा.

—भा० इ० सं० मंडळ, पुणें यांच्या परवानगीनें

# महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास

[ पुढें दिलेल्या पत्रांतील अनोळखी भाषेनें बिचकून जाण्याचें कारण नाहीं. दोनतीनशे वर्षांपूर्वीचे लोक ह्या पत्रांतून आपणाशीं बोलत आहेत व ज्यांचा इतिहास आज आपण शिकत आहों ते आपल्या हालचाली व कल्पना स्वमुखानें आपणांस सांगत आहेत. ]

उदाहरणार्थ, श्रीसमर्थ रामदास त्यांच्या वेळच्या देशस्थितीचें पुढील-प्रमाणे वर्णन करतात :—

## १. शिवपूर्वकालीन अस्मानी सुलतानी

पदार्थ मात्र तितुका गेला । नुस्ता देशचि उरला ।
येणें करितां बहुताला । संकट जालें ॥ १ ॥
लोकें स्थानभ्रष्ट जालीं । कितेक तेथेंचि मेलीं ।
उरलीं तें मराया आलीं । गांवावरी ॥ २ ॥
माणसा खावया धान्य नाहीं । आंथरुण पांघरुण तेंहि नाहीं ।
घर कराया सामग्री नाहीं । काये करिती ॥ ३ ॥
पुढें आला प्रजन्य काळ । धान्य महर्ग दुःकाळ ।
शाकार नाहीं भळभळ । रिचवे[1] पाणी ॥ ४ ॥
कितेक अनाचारी[2] पडिलीं । कितेक यातिभ्रष्ट[3] जालीं ।
कितेक ते आक्रंदलीं । मुलेंबाळें ॥ ५ ॥

---

१ सांडणें, ओतणें. २ धर्माविरुद्ध आचरण. ३ जातिभ्रष्ट.

कितेक विषें घेतलीं । कितेक जळीं बुडालीं ।
जाळिलीं ना पुरिलीं । किती येक ॥ ६ ॥
ऐसें जालें वर्तमान । पुढें हि अवघा अनमान ।*
सदा दुश्चीत[1] अवघे जन । उद्वेगरूपी ॥ ७ ॥
कांहींच पाहातां धड नाहीं । विचार सुचेना कांहीं ।
अखंड चिंतेचा प्रवाहीं । पडिले लोक ॥ ८ ॥
येक म्हणती कोठें जावें । येक म्हणती काय करावे ।
विदेशा जाउनि काये खावे । वेच[2] नाहीं ॥ ९ ॥
तथापि मार्गचि चालेना । भिक्षा मागतां मिळेना ॥
अवघे भिकारी च जना । काये म्हणावें ॥ १० ॥
प्राणीमात्र जाले दुःखी । पाहातां कोण्ही नाहीं सुखी ।
कठिण काळे वोळखी । धरीनात कोण्ही ॥ ११ ॥

—रामदास

---

# २. शहाजीचा स्वाभिमान

| | |
|---|---|
| पत्रसारसंग्रह, पत्र नं० ७१० | श० १५७८ श्रावण इ० १६५६ जुलै |

[ सदरहू पत्र अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें आहे. मराठी राज्याचा संस्थापक शिवाजी राजपूत वंशांतील होता कीं नाहीं याबद्दल एके काळीं वाद होता. त्याच्या राजपुतत्वाबद्दल वंशावळीसहित पुरावा 'मुधोळ संस्थानचा इतिहास' या ग्रंथास श्री. द. वि. आपटे यांनीं लिहिलेल्या उपोद्घातांत सांपडेल. शिवाजीचा बाप शहाजी स्वतःस राजपूत समजे हें या पत्रकावरून कळेल. खेरीज, दक्षिणेंतील मुसलमानी शाहयांच्या पदरीं असणारे

---

*संशय. १ मन स्वस्थ नाहीं. २ खर्च करण्यास पैसा.

मराठे आपल्या मालकाशीं कसे मानीपणानें वागत याचें प्रत्यंतर या पत्रांत पाहावयास मिळतें. हें पत्र विजापूरच्या कोणातरी प्रसिद्ध खानास ‘ महाराज ’ शहाजे राजे लिहीत आहेत. या पत्रांतील ‘ रजपूत ’ हा शब्द वंशवाचक नसून तो सामान्य ‘ शिपाई गडी ’ ‘ लढाई पेशाचे ’ या अर्थी वापरला आहे असें कित्येकांचें म्हणणें आहे. ]

खान आलीशान फेरोजी निशाने* महाराज शहाजी राजे सलाम---

हजरत साहेबाचा तरी कौल करारदाद आपल्यास आहे की तुम्चे जागीर-पैकीं एक चावर कसीदगी करणें नाहीं. जरूर येक वख्त पादशाही कामाबा काही कसीदगी केले तरी अवल सवाईन मुबादला देउनु बादज कसीद करावे. आमा अकार्तुकाचे बोले करुनु आपले जागिरीत नाहक गेरहिसाबी पादशाह खलेल करवितातो. तरी आपण रजपूत लोक अजी तलग पेशजीहि दोघा चौ पादशाहीत खिदमत केली. अमा गैरहिसाबी जाजती सोसुनु कमइजतीन व गैरमेहरबानीन पेशजीही खिदमत केली नाही व पुढेही न करूं. उमेदीने आपण आजी दीढ वर्ष जाजती सोसिली ; ते याच दमा की, थोरले हजरत साहेबाचे नवाजीस व हजरत साहेबीहि जहाबक्षी केली आहे व वख्तही एक वजाचा समजोनु आपण सबूरी करुनु तहमूल करावयास तकसीर केली नाहीं.

---

*या सर्व त्या खानाच्या मानाच्या पदव्या आहेत. मुळांत या पदव्यांनीं तीन ओळी मजकूर व्यापिला आहे.

सलाम—नमस्कार. हजरतसाहेब—खाविंदसरकार (बादशाह). कौल—अभय. करारदाद—करार दिलेला. चावर—चाहूर (१२० बिघे). कसीदगी करणें—काढून घेणें. जरूर येक वख्त—नाइलाजानें एकादे प्रसंगी. बा—बद्दल. अव्वल सवाईन—मूळच्या सवाईनें. मुबादला—मोबदला. बादज—नंतर. कसीद करावे—काढून घ्यावे. आमा—परंतु. अकार्तुक—फालतु इसम. नाहक—विनाकारण. गैरहिसाबी—गैरवाजवी. कमइजतीन—अपमानानें (इजत—अब्रू ). खलेल—व्यत्यय. जाजती—जुलूम. अजीतलग--आजपर्यंत. गैरमेहेरबानी—अवकृपा, गैरमर्जी. पेशजी—पूर्वीही. पेस्तर—पुढें. खिदमत—नोकरी. उमेद—आशा. थोरले हजरत—पूर्वीचे बादशाह अर्थात् महमदशाह. दम—जोर. दमा—जोरावर. नवाजीस—नांवाजलेला, मर्जीतला. जहाबक्षी—क्षमा. वख्त—वेळ. एक वजाचा—एक तऱ्हेचा. सबूरी—थांबणें. तहमूल—सहन. तकसीर—चूक.

पेस्तर हजरत साहेबास आपली दरकार असेल तरी हिसाबी आपला सरंजाम सदरहु केला पाहिजे. आणि दरकार नसेल तरी खुषनुदीनें रजा दिधली पाहिजे. आपल्यास असलाद दुन्याई मामल्याचीहि हवस काही राहिली नाही. एखादे आपले हिंदूचे तीर्थी बसौनु हक तालाची बंदगी करून हजरत साहेबास दुवा देउनु फर्जंदभाई आहे तियापासुनु खिदमत घेतली पाहिजे. अगर त्याहीपासुनु खिदमत घेणे नसेल तरी त्यासहि रजा द्यावी. बाजे भाईबंद जेथे आपली पोटें भरिताती तेथें हेहि भरितील. अमा नाहक आपल्यास बदनाम केले न पाहिजे. दरीबाब हजरत बंदगीस हाली अर्जदास्त पाठविली आहे तरी बंडभाईनेहि हजरत बंदगीस अर्ज करून सदरहुप्रमाणें अनागोदीच्या[1] मुबादलियाचा सरंजाम व पंधरा खेडियाचा ताजा फर्मान आपल्याच नावें देविला पाहिजे. अगर आपल्यास खुषनुदीन रजा दिधली पाहिजे.

---

# ३. शिवाजीचा जन्म

**शिवचरित्रप्रदीप, पृ० १६** | **जेधे शकावली**

[ शिवाजीचा जन्म एके काळीं शके १५४९ वैशाख शु. २ (इ. स. १६२७) असा समजला जात असे, याचें कारण कित्येक बखरींत शके १५४९ हे शिवजन्माचें साल दिलें जाई. पण एका 'सभासद बखर' खेरीज बहुतेक

---

पेस्तर–यापुढे. दरकार–जरूर. हिसाबी–सरळ. सदरहु करणें–चालू करणें. खुषनुदी–समाधान. असलाद–मुळांत. दुन्याई–दुनियेसंबधीं. मामला–काम. हवस–हौस. हक–देव. ताल–फार मोठा. बंदगी-बंदगी–सेवा. दुवा–दुवा. फर्जंद–मुलगा. बाजे–इतर. बदनाम–दुर्लौकिकाचें. दर-इ-बाब–प्रत्येक बाबतींत. हाली–सांप्रत. अर्ज–अर्ज. दास्त–कहाणी. सदरहुप्रमाणें–वर सांगितल्याप्रमाणें. मुबादला–बदला, ऐवजी. सरजाम–(सरंजाम) जाहागीर. फर्मान–राजपत्र.

१ हें गांवाचें नाव.

बखरी उत्तर पेशवाईतील असल्यानें तो पुरावा विश्वसनीय नव्हता. शिवाय कोणत्याही बखरींत शिवाजीचा जन्म तिथि, वार, नक्षत्र, शक यासह बिनचूक दिलेला नाही. मराठी इतिहासाच्या साधनांत समकालीन अस्सल पत्राइतकेंच नसलें तरी त्याच्या खालोखाल समकालीन शकावलींना महत्त्व आहे. या शकावल्या पूर्वी प्रत्येक मोठ्या घराण्यांत तयार करीत. जेधे शकावली अशापैकीच आहे.

प्रस्तुत शकावलीत निर्दिष्ट केलेल्या शिवाजीच्या जन्मतिथीस आणखी स्वतंत्र पुरावा मिळतो. कवींद्र परमानंदानें शिवाजीच्या हयातीत लिहिलेलें 'शिवभारत' नांवाचें काव्य आहे, त्यांतही शके १५५१ फाल्गुन व. ३ हीच तिथि आहे. तसेच तंजावर येथे बृहदीश्वराच्या देवालयावर असलेल्या शिलालेखांत शिवभारताच्या आधारें याच सालाचा उल्लेख आहे. याखेरीज प. गौरीशंकर ओझा यांच्या प्राचीन कुंडली संग्रहांत असलेली शिवाजीची कुंडली याच तिथीस जुळणारी आहे. इतके स्वतंत्र, समकालीन व विश्वसनीय पुरावे एकत्र मिळाल्याने शिवाजीची परंपरागत जन्मतिथि बदलून बहुतेक इतिहासकारांनी या तिथीचा स्वीकार केला आहे. मात्र बखरीत तरी कां होईना चुकीचा शक कसा घुसावा याचा छडा अद्याप लागलेला नाही.

याच शकावलीत इतर अनेक महत्त्वाचे उल्लेख आले आहेत, तेही लक्षपूर्वक पाहावे. ]

श्रीगजवदनवरद

श्री शके १५४० कालयुक्तनाम संवछरे कार्तिक वद्य प्रतिपदा औरंगजेब उपजला.

शके १५४६ रक्ताक्षी संवछरें

कार्तिकमासी भातवडीस मोगलाचा सुभेदार लस्करखान व येदीलशाही मुला महमद येसी दोन कटके मलीक आंबरे बुडविली १

मलिक अंबरे सोलापुरास वेढा घालून विज्यापूरकरापासून घेतले १

शके १५४७ क्रोधननाम संवछरी जहागीर पातशाहवरी त्याचा लेक सुलतान खुरूम रुसोन निजामशाहीमध्ये गेला त्यास निजामशाहामध्यें मलिक-अंबरे ठाव दिल्हा १.

---

यैसी–ऐसी, अशीं. कटकें–सैन्यें. खुरूम–खुर्रम. ठाव–आश्रय.

शके १५४८ क्षयनाम संवछरे वैशाखमासी मलिक आंबर परलोकास गेला १

शके १५५० विभवनाम संवछरे सुलतान खुरम पातशाहीस दिलीस बैसला नाव शाहाजाहा ठेविले १

ये वर्षी कार्तिकमासी कृष्णपक्षी पंचमी गुरुवासरी नक्षत्र पुष्य राजश्री कान्होजी नाईक जेधे यांची पहिली स्त्री पासलकराची लेकी सावित्रीबाई होती तिचे पोटी बाजीनाा पुत्र जन्मला माहानक्षत्र अनुराधा दक्षणायेन

शके १५५१ शुक्ल सवत्सरें

फालगुण वद्य त्रितीया शुक्रवार नक्षत्र
हास्त घटी १८ पळे ३१ गड ५
पळे ७ ये दिवसी राजश्री सिवाजी राजे
सिवनेरीस उपजले १
श्रावणे पुर्णिमेस लुखजी जाधवरावजी
नीजीमशाहानी मारिले १
चैत्रमासी* इभराम इदिलशाहा
परलोकास गेला सुलन महमद-
शाहा तख्ती बैसले खवासखान
प्रधान जाला मुरार जगदेवराव
कारभारी जाला १

शके १५५२ प्रमोद संवछरे

ये वर्षी दुकाल पडिला
पौश वद्य येकादसी फत्तेखानास
सोडून मज्यालस दिल्ही. १
शके १५५३ प्रजापति सवछरे फत्तेखान[२] बुऱ्हान निजामशाहा मारिला १

---

बाजीनाा—बाजी नाईक. *चैत्रमासी या शब्दाचा संबंध 'मुरार जगदेराव कारभारी जाला' या विधानाकडे आहे. मधलीं विधानें संदर्भा-साठीं लिहिलीं असावींत. सुलन—सुल(ता)न. दुकाल—दुष्काळ. मज्यालस देणें—पार्टी देणें, अर्थात् मानमरातब दिला. २ ही तृतीया आहे 'फत्तेखानानें.'

शके १५५४ अगिरा सवछर

जेष्ट काजी महबतखाने वेढा घालून दौलताबाद घेतली १
भाद्रपद मासी शाहाजी राजे याणी
पेमगिरीस निजामशाहावरी छेत्र
धरिले १

---

# ४. राज्यस्थापनेची पूर्वतयारी

**शिवचरित्रप्रदीप, पृ० ४३–४४** } { **जेधेकरीना***

[ राज्यस्थापनेपूर्वी मावळांत जमवाजमव करण्याऱ्या लोकांच्या राज्यस्थापनेच्या काय कल्पना होत्या तें या उताऱ्यावरून कळून येतें. या उताऱ्यांत ' मऱ्हाष्टराज्य ' हा महत्त्वाचा शब्द आहे. ]

## मावळांत जमवाजमव

त्यावरी राजश्री स्वामीनी[1] हुकुम केला की वरकड† मावळचे देशमुख व तुम्ही येक जागा बैसोन त्यांचा मुदा[2] मनास आणवणे त्यावरी कान्होजी[3] ना[4] व अवघे मावळचे देशमुख येके जागा बैसले तेव्हा अवघे देशमुख बोलिले की तुमचा विचार काये तो सांगणे तेव्हा बोलले की आम्ही राजश्री स्वामीच्या पायासी इमान धरून वतनास देखील पाणी सोडिले आम्ही व आपले

---

पेमगिरी हें ठिकाण. छेत्र–छत्र; शहाजी ' किंगमेकर ' झाला.

*हकीकत. जेधेकुटुंबाची हकीकत. असे करीने पूर्वी लिहिले जात व वंशपरंपरा त्यांतील हकीकत वाढविली जाई.

१ मोकळी जागा ' शिवाजी 'साठीं सोडली आहे. बहुमानार्थी नांव न घेतां पत्रांत मोकळी जागा सोडण्याची चाल असे. †बाकी राहिलेले. २ मुद्दा. ३ कान्होजी जेधे. ४ नाईक.

लेक देखील राजश्री स्वामी पुढे खस्त[1] होवे येसा आमचा दृढ विचार आहे तुमचा मुदा काय तो बोलणे मुसलमान बेइमान आहे कार्य जालियावरी नस्ते निमित्य ठेऊन नाश करील हे मऱ्हाटराज्य आहे अवघियानी हिमत धरून जमाव घेऊन राजश्री स्वामी संनिध राहोन येकनिष्टेने शेवा करावी येश्या हिमतीच्या गोष्टी सांगितल्या तेव्हा अवघे देशमुख बोलिले की तुमचा विचार तोच आमचा विचार इमानपुरस्कर[2] आहे येसे बोलिले तेव्हा अवघे देशमुख घेऊन राजश्री स्वामी संनिध आले अवघ्यानी शफत केली मग अवघ्यास भोजनास घातले त्यावरी अगदी[3] मावलचा जमाव केला.

---

# ५. दादाजी कोंडदेवास देवाज्ञा

शिवचरित्रसाहित्य भा० २ रा, लेे० १२० } { श० १५६९ आषाढ व० १२ ता० १९।७।१६४७

[ शिवकालीन अनेक उपलब्ध पत्रांचा नमुना म्हणून हे पत्र घेतलें आहे. या पत्राचा साराश असा की, महादेव मुद्गल पुरंदरे म्हणून कोणी गृहस्थाने शिवाजी राजाकडे तक्रार केली की 'मजकडे पिंपरी, पिंपळे-सौदागर वगैरे गांवचे वसूल इनाम म्हणून मलिकंबरचे वेळेपासून चालत आले असतां, सालमजकुरी दादाजी कोंडदेवास देवाज्ञा झाल्यावर पुणें परगण्याचे देशमुख इनामवसूल घेऊं देत नाहीत, जुन्या सनदेस मान देत नाहीत, नवी सनद हवी असे म्हणतात. तरी या गोष्टीकडे आपण कृपाळूपणानें पाहून इनाम भोगवटयास मिळावें म्हणून हुकूम व्हावा.'

या तक्रारीचा विचार होऊन शिवाजीने पुणें परगण्याच्या देशमुखास सदरहू महादेवभटाचे जुन्या सनदेवरून इनाम चालू करावें, नवी सनद मागू नये, असा हुकूम काढला आहे. नवीन स्थापन होणाऱ्या राजवटीतल्या देशमुखानें जुनें मलिकंबरचें फर्मान मानू नये व महादेव-

---

१ झिजावे, खर्ची पडावे. २ विश्वासपूर्वक. ३ निर्भेळ.

भटानें यावद्दल देशमुखाविरुद्ध तक्रार करावी, या दोन्ही गोष्टी अगदीं स्वाभाविक आहेत.

या पत्रांतील भाषा व मजकुराचा मुद्दा शेकडो शिवकालीन पत्रांत वाचावयास मिळेल. महादेवभटास आपल्या इनामाचें महत्त्व म्हणून त्यानें कागद जपून ठेवला. इतिहास-लेखकास त्यामुळें दादाजी कोंडदेवाच्या मृत्यूचें साल कळलें व शिवाजीकडे येणाऱ्या तक्रारी व त्यांचा निकाल करण्याची त्याची पद्धत यासंबंधीचें ज्ञान झालें ]

शिवाजीचा 'प्रतिपच्चंद्र०' हा शिक्का

अज रख्तखानें राजश्री सीवाजी राजे दाम दौलतहु वजानीव कारकुनानी हाल व इस्तकबाल व देशमुखानि पा। पुणे बिदानद के मुहुर सन समान आर्बैन (र+वांमुद) अलफ बो। माहादभट बिन मुदगलभट पुरंदरे सेकीन कसबे मजकूर हुजूर येऊन मालूम केले जे आपणांस बदल इनाम दर महाल जमीन चावर तोन ३८

१ (मौजे परवति) जमीन चावर येक देखील नख्तयाती (व वाजे बाबा व नाय) पोसी व (पटिया हाल व) पेस्तर व महसूल कुलबाब कुलकानू चावर येक '

२ मौजे पिपरी ना। गहाटणी बाबा महमुलेसी जमीन चावर येक'

३ मौजे पिपळे सौदागर जमीन चावर येक दो। महसूल व नख्तयाती

---

१ प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।
शाहसूनोः शिवस्यैषा मुद्राभद्राय राजते ॥

अज–पासून. रख्तखाना–कचेरी. इ–चा (of), एकंदर अर्थ शिवाजी राजाच्या कचेरीपासून. दाम–चिरायु, अखंडित. दौलतहु–लक्ष्मीवान्. वजानीव–कडे. कारकुनानी–कारकुनान् (कारकून) या शब्दाचें अनेकवचन. हाल–विद्यमान. इस्तकबाल–भावी. पा।–परगणे. बिदानद–जाणावे. के–कीं. रवां सुद–रवाना (Despatch) झाले, हा मुळ मजकुरातील शब्द नव्हे. 'रवा मुद' असा पत्रावरील शिक्का आहे. बो।–बेशमी–इसमाबरोबर, नांवें, नामें. बिन–चा पुत्र; जसें, अ बिन ब–ब चा पुत्र अ. सेकीन–राहणारे. मालूम–माहीत. बदल–साठी, म्हणून (बदल इनाम–इनाम म्हणून) दर–आंत. देखील–समाविष्ट, सुद्धां. नख्तयाती–रोख रक्कम. (पुढील पृष्ठावर चालू)

४ ताा ठाणे ताा देहाये व पायपोसी (कुलबाब) कुलकानू चावर बदल दिवाबती बरमाहाल जकाती पाा मजकूर दरोज रुके ८३

येणेप्रमाणे बाा फर्मान हुमायुनु राा खास व खुर्दखत ममलकतमदार मलिक अबर व भोगवटे वजीरानी व खुाा महाराज साहेब बाा सनद शुदा ताा साल गुाा सन सबा चालिले आहे हाली साल माा कारणे माा दादाजी कोंडदेऊ शुबेदार यासी देवाज्ञा जाली म्हणौनु माहाली कारकुनु ताजिया खुर्दखताचा उजूर करिताती दरीबाब नजर एनायत फर्माउनु सदरहु इनाम जमीन देहाये गावगना व नख्त रुके तीन दुमाले करावया रजा होये बिनाबरा इलतमेसी खातीरेसी आणौनु माहदभट बिन मुदगलभट पुरंदरे यासी इनाम बरमाहाल बिताा

जमीन चावर ३ ताा—

देणे खााा सरकसखान इनाम जमीन चावर २ गज० रायनी दर सवाद मौजे पिपरी नाा राहाटणी जमीन चावर येक बाबा येक महसुलेसी दुमाला कीजे मौजे परवती जमीन चावर १ गजशराइणी देाा नख्तयाती व बाजेबाबा पायेपोसी व पटिया हाल व पेस्तर व महसूल कुलबाब व कुलकानूसी दिधले असे.

---

पायपोसी—या नांवाचा एक कर. पटिया—कर. पेस्तर—पुढें. कुल—संपूर्ण. कुलकानू—संपूर्ण नियमाप्रमाणें. नाा—नजीक. देाा—देहाय—गांव. ताा—तर्फ, गांवाचा समूह. ठाणे—हवालदारचें ठिकाण. बाजे—इतर, बाबा—बाबी. पाा—पैकी. मजकूर—हिशेब. रुका—एक नाणें. बाा—बमोजीब—प्रमाणें. हुमायुनु—शुभ. राा—रख्तखाना. खास—खुद्द स्वारी अर्थात् बादशाह. खुर्दखत—दिवाणानें द्यावयाची सनद. ममलकत—राज्य. मदार—आधार, 'ममलकतमदार' (राज्याचा आधारस्तंभ) हा एक किताब आहे. भोगवटे—उपभोग घेण्याचा अधिकार देणारे पत्र. खुाा—खुर्दखत. शुदा—सुरू. ताा—तागायत. सालगुाा—सालगुदस्त, गेलें वर्ष. माा—मजकूर. माा—मरहूम—मयत. शुबेदार—सुभेदार. उजूर—तक्रार. दरीबाब—दर-इ-बाब—ह्या बाबीमध्यें. नजर एनायत—कृपेची नजर. फर्माउनु—हुकूम द्यावा. गावगना—दर गांवचे. दुमाल—ताब्यांत. रजा—हुकूम. बिनाबरा—साठीं. इल्तिमास—विनंति. खातीर—समजूत. बिताा—बितपशील, तपशीलाप्रमाणें. खााा—खान. गजशरायणी—गज—२४ तसूचें माप; शरायणी—इस्लामी धर्मांत सांगितल्याप्रमाणें. रायनी—राजेसाहेबाचे. सवाद—शिवार, जमीन.

देणे मा हजरती राजश्री मुधोजी नाईक जमीन चावर १ गजसरायणी दर सवाद मौजे पिंपळे सौदागर व दा महसूले नख्तयाती व ता ठाणे व ता देहाय व पायपोसी कुलबाब कुलकानूसी दिधले असे.

येणे प्रमाणे बा फर्मान रा ग्वास व खुर्दखत ममलकतमदार मलिक अंबर व भोगवेट वजीरानी व खा महाराज साहेब बा सनद शुदा ता सालगा सन सबा चालिले असेली तेणे प्रमाणे मनासी आणौनु दुमाले करणे दर हरसाल ताजिया खुर्दग्वताचा उजूर न करणे तालीक घेऊनु असेली इनामदार मजकुरापासी फिराउनु देणे व रोजमुरा जकाती पैकी इा अवल सालापासूनु देत जाणे मोर्तब सुदु ( मर्या । देयविरा । जेत । अशा ३ ओळींचा शि. )

तेरीख २६ जमा दिलाखर माहे रजब सुरु
मुरुसुद नीवीस

# ६. शहाजीची कैद

शिवभारत, पृ० १४७ — इ० स० १६४८

[ कवींद्र परमानंद हा दक्षिणेंतील शिवकालीन कवि काशीस गेला असतां तेथील पंडितांनीं शिवाजीची कीर्ति ऐकल्यावरून, त्याचें चरित्र परमानंदाकडून ऐकण्याची इच्छा दर्शविली असतां त्यानें हा शिवभारत

---

मा–मशरूल-महशूर अल्–प्रसिद्ध. मशरूल हजरती–राजमान्य. हर–दर,प्रत्येक. तालीक–नक्कल. असेली–अस्सल. फिराउनु–परत. मोर्तब–तयार (पत्राच्या शेवटीं येणारा शेरा). सुदु–झाले. (शिक्क्याचे शब्द–मर्यादा इयं विराजते–ही मर्यादा शोभते). अव्वल–प्रारंभीचें, प्रथमचें. सुरु सुद–प्रारंभ झाला (अंमलबजावणीस प्रारंभ झाला.). सुरु निवीस–सचीव. इा–इस्तकबील–पासून. अवल सालापासून–सालाच्या प्रारंभापासून. मशरूल अनाम–लोकप्रसिद्ध. रोजमुरा–रोजचें वेतन.

नांवाचा ग्रंथ त्यास ऐकविला अशी खुद्द शिवभारतांतच कथा आहे. या ग्रंथाचे एकंदर ३२ अध्याय आहेत व यांत शिवाजीचा आजा मालोजी याच्या चरित्रापासून तों शिवाजीनें इ. स. १६६२ साली शास्ताखानाशीं सामना करण्याची तयारी करण्यापर्यंतचा मजकूर आला आहे. तंजावर येथें सरस्वती महाल म्हणून ग्रंथालय आहे त्यांत या ग्रंथाची हस्तलिखित प्रत आहे. शिवाय भोसल्यांचे कुलगुरु राजोपाध्ये यांचे संग्रहांत कोल्हापूरकडे शिवभारताची प्रत सापडली. तिच्यावरून पुणें येथील आनंदाश्रम ग्रंथमालेंत शिवभारताची संस्कृत आवृत्ति छापली आहे. या उताऱ्यांत उल्लेखिलेला संभाजी हा अर्थात् शिवाजीचा वडील भाऊ होय. ]

## अध्याय १५

अहो अर्हदिवममी अस्माभिः परिपालिताः ।
क्षिण्वन्ति यवनानस्मान् क्षत्रियाः कालनोदिताः ।। ४ ।।

४. अहो ! रात्रदिवस ज्यांचें आम्हीं पालन केलें ते हे क्षत्रिय मराठे अनुकूल काल येतांच आम्हां यवनांचा नाश करीत आहेत.

समृद्धिमधिकां लब्ध्वा दुर्मदात्मा मदाश्रयात् ।
साहसी शाहराजोऽयं मन्नियोगं न मन्यते ।। ५ ।।

५. माझ्या आश्रयानें अधिक समृद्ध पावून हा उन्मत्त झालेला साहसी शहाजी राजा माझी आज्ञा मानीनासा झाला आहे.

अनेन कोपनेनाद्धा विधायोद्धतमाहवम् ।
पुण्डरीकपुरोपान्ते विजितो रणदूलहः ।। ६ ।।

६. ह्या रागीटानें उघडपणें जोराचें युद्ध करून पंढरपुरापाशीं रणदुल्लाखानास जिंकिलें.

मुहुराहूयमानोऽपि नायातोऽयमुपह्वरे ।
अपातयदयं ह्यस्मज्जयं संशयगह्वरे ।। १० ।।

१०. वारंवार बोलविलें असतांनाही हा सन्निध आला नाहीं; व ह्यानेंच आमचा जय संशयगर्तेंत पाडला आहे.

अनेनोपकृतः पूर्वमिभरामः पदे पदे ।
निवेशितोऽयं सन्तुष्य तेनाप्यत्युन्नते पदे ।। ११ ।।

१२. ह्यानें पूर्वी इब्राहिमशहास पदोपदीं उपकृत केल्यामुळें त्यानें मुद्दां संतुष्ट होऊन ह्या शहाजीस अत्युच्च पदावर स्थापिलें.

**अंगांसि सुगरीयांसि क्षन्तु नैव क्षमोऽभवम् ।**
**तदानीं निग्रहायास्य मुस्तुफाखानमादिशम् ॥ १३ ॥**

१३. पण अक्षम्य असे मोठे अपराध जेव्हां ह्याचे माझ्या नजरेस आले तेव्हां त्यास पकडण्यासाठीं मीं मुस्ताफाखानास हुकूम केला.

**अस्मिंस्तु निगृहीतेऽस्य सुतौ शम्भु शिवावुभौ ।**
**उन्नद्धिभूय युध्येते मन्निमज्जन लोलुभौ ॥ १४ ॥**

१४. नंतर ह्याला कैद केला असतां ह्याचे संभाजी व शिवाजी हे दोघे मुलगे उद्दाम होऊन मला बुडविण्याच्या इच्छेनें युद्ध करीत आहेत.

**पित्रर्थे शम्भुना तत्र फरादः परिभावितः ।**
**सम्पराये शिवेनात्र फतेखानोऽपि यापितः ॥ १५ ॥**

१५. आपल्या पित्यासाठीं संभाजीनें तिकडे फरादखानाचा पराभव केला आणि इकडे शिवाजीनें युद्धामध्यें फत्तेखानासहि पळवून लाविलें.

---

# ७. जावळीची लढाई

**शि०च०प्र०, पृ०१७** } { **जेधे शकावली**

[ जेधे शकावलीतील हा उतारा फार महत्त्वाचा आहे. शिवाजीनें चंद्रराव मोऱ्याचा खून करून जावळी घेतली हा प्रवाद बखरीतून प्रसिद्ध आहे. पण त्यास अस्सल पत्राचा आधार नाहीं चंद्ररावाशीं झालेल्या सामन्यांत जेधे मंडळी होती. त्यानी शकावलीत जावळी व रायरी घेतल्याचें वृत्त लिहूनही चद्ररावाचा खून केल्याचा किंवा त्यास मारल्याचा उल्लेख नाहीं, हें चिंतनीय आहे. 'चंदरराउ किलियाखाली' उतरल्यानंतर पुढें तो कोणत्या प्रसंगानें शिवाजीच्या पक्षाकडून मारला गेला यासंबंधी अस्सल पुरावा उपलब्ध नाहीं. ]

शके १५७७ मन्मथ संवछरी राजश्री सिवाजी राजे याणी पौष चतुर्दशीस जाऊन जावळी घेतली ते समई कान्होजी जेधे देशमुख व बांदल व सिलिंबकर याचा जमाव व मावलच्या देशमुखांचा जमाव बराबर घेऊन जमावाच्या बळे युद्ध करून जाऊली घेतली. '

शके १५७८ दुर्मुख संवछर

वैशाखमासी राजश्री सिवजी राजे याणी रायरी घेतली समागमे कान्होजी जेधे देशमुख ताा भोर व बादल व सिलिंबकर देशमुख व मावळचा जमाव होता हैबतराऊ व बालाजी नाईक सिलिंबकर याणी मध्यस्ती करून चंदरराऊ किलियाखाली उतरले त्यावरी दुसरा सिका' हैबतराऊ सिलिंबकर यांस दिल्हा आणि भावाभावांच्या वाटणीया केल्या.'

मार्गसीर्ष मासी सुलतान महमद इदिलशाहा मृत्य पावले. १

अस्वीन वद्य पक्षी राज्यानी सुपे घेतले संभाजी मोहिते धरिले. १

माघ शुध पक्षी गायेकवाडासी सोयरीक² केली सखवार बाईचे लग्न जाले. १

---

# ८. समर्थांची भवानीस विनंति

| | |
|---|---|
| **रामदासवचनामृत, पृ० १९५–९६** | **इ. स. १६५६ (?)** |

[ शिवाजी रामदास यांचा साक्षात् संबंध केव्हां व कितपत आला या मुद्यावर पुष्कळ वेळां वाद होतो. प्रस्तुत उतारा रामदासाच्या राज्य-स्थापनेबद्दलच्या तळमळीच्या मनोवृत्तीवर चांगला प्रकाश पाडतो.

---

ताा–तपे (तप सुमारें २०।२५ गांवांचा एक राजकीय विभाग). १ दुसरा सिका दिला–आणखी एकास देशमुखीचा अधिकार दिला. २ ही सोयरीक शिवाजीनें सखवार बाईशीं केली. तिच्या माहेरच्या घराण्याचें आडनांव गायकवाड.

जावळी घेतल्यानंतर शिवाजीनें इ. स. १६५६ चे सुमारास तुळजापूरच्या देवीची प्रतापगडी स्थापना केली. हें झाल्यानंतर लौकरच रामदासानें या ओंव्या रचिल्या असल्या पाहिजेत असें 'पारघाटीं जगन्माता सद्य येऊनि राहिली' या वाक्यावरून सूचित होतें. विद्यार्थ्यांनी हा उतारा पाठ करण्यासारखा आहे. ]

## तुझा तूं वाढवी राजा

उदंड ऐकिलें होतें । रामासी वरु दीधला ।
मी दास रघुनाथाचा । मजही वरदायेनी[1] ।।
श्रेष्ठांचा[2] नौस[3] जो होता । तो मी फेडीनसें म्हणें ।
पुष्प देउन उतराई । ऐसें हें कल्पिले मनीं ।।
तुळजापुर ठाकेना । चालिली पश्चिमेकडे ।
पारघाटीं[4] जगन्माता । सद्य[5] येउनी राहिली ।।
ऐसें हें ऐकिलें होतें । हेत तेथेंचि पावला ।
पुष्पाची कल्पना होती । तेथें पुष्पचि दिधलें ।।
ऐसी तूं दयाळु माता । हेमपुष्पचि[6] घेतलें ।
संतुष्ट भक्तिभावानें । त्रैलोक्यजननी पाहा ।।
थोड्यानें श्लाघ्यता[7] केली । थोर संतोष पावलों ।
उत्तीर्ण काये म्यां व्हावे । तुझे कृपेसी रोकडें[8] ।।
तुम्हेंची तुजला दिल्हें । म्यां हें कोठुनि आणिलें ।
संकटें वारिलीं नाना । रक्षिलें बहुतांपरीं ।।

---

१ रामाला वर दिलास. मी रामाचा भक्त तर मलाही वरदायिनी हो असा भावार्थ. २ समर्थांचे वडील बंधु रामीरामदास ३ नौस–नवस. ४ प्रतापगडचे बाजूस पारघाट आहे. पायथ्याशीं पारगांव हें गांव आहे. ५ हल्लीं. शिवाजीनें जावळी घेतल्यावर प्रतापगडास भवानीची स्थापना केली त्यास उद्देशून हा उल्लेख असला पाहिजे. ६ भक्तानें फूल वाहून नवस फेडण्याचें ठरविलें पण देवीनें भक्ताकडून सोन्याचीं फुलें घेतलीं हा भाव. शिवाजीनें प्रतापगडच्याभवानीस सोन्याचीं पुष्पें वाहण्यासाठीं करून दिलीं होतीं. ७ प्रशंसनीय गोष्ट. शिवाजीस यश दिलें या गोष्टीस उद्देशून हें असेल काय ? ८ रोकडे–प्रत्यक्ष.

जीवींचें जाणते माता । तूं माता मज रोकडी ।
लोकांच्या चुकती माता[१] । आचुक जननी मला ।।
येकची मागणें आतां । द्यावें तें मजकारणें ।
तुझा तूं वाढवी राजा । सीघ्र आम्हांची देखतां ।।
दुष्ट संहारिले मागे । ऐसे उदंड ऐकतों ।
परंतु रोकडें कांहीं । मूळ सामर्थ्य दाखवी ।।
देवाचीं राहिलीं[२] सत्वें । तूं सत्व पाहासी किती ।
भक्तांसी वाढवीं वेगीं । ईच्छा पूर्ण परोपरीं ।।
रामदास म्हणे माझे । सर्व आतुर[३] बोलणें ।
क्षमावें तुळजे माते । ईच्छा पूर्णची ते करी ।।

---

## ९. शिवाजीचा फडशा करावा

साधनचिकित्सा, पृ० २८७ — शके १५८१ आषाढ शु० ६, इ० १६५९ जून १६

[ हें अली अदिलशहानें कान्होजीस पाठविलेल्या फारसी फर्मानाचें भाषांतर आहे. अफझलखानास शिवाजीविरुद्ध पाठवितांना विजापूर दरबारची वृत्ति काय होती तें यावरून स्पष्ट होईल. ]

अलीअदिलशहा–कान्होजी जेध

शिवाजीनें अविचारानें व अज्ञानानें निझामशाही कोकणांतील मुसलमानांना त्रास देऊन लूट करून पातशाही मुलुखांतील कित्येक किल्ले हस्तगत केले आहेत.

---

१ लोकांच्या माता (देव) यश पावत नाहीत. २ दिसेनाशी झाली–लुप्त झाली. ३ सत्वर सिद्धि व्हावी अशाविषयीचें.

यास्तव त्याचे पराभवार्थ......अफजलखान महमदशाही यांस तिकडील सुभेदारी देऊन नेमून पाठविले आहेत. तरी खान माचे रजामंदींत[1] व ताबेदारींत राहून......शिवाजीचा पराभव करून निर्मूळ फडशा करावा. शिवाजीचे निसबतीचे[2] लोकांस आश्रय न देता टार मारून या दौलतीचें कल्याण इच्छिणें. खानाच्या सांगण्यावरून......तुमची योग्यता वाढविली जाईल. त्याचे सांगण्याप्रमाणें वागावें. तसे न केल्यास परिणाम चांगला होणार नाहीं. हे जाणोन या सरकारी आज्ञेप्रो चालावें तेरीख......हुजरची परवानगी झाली असे.

---

## १०. पन्हाळयाचा वेढा

| | |
|---|---|
| पत्रसारसंग्रह, नं० ८२६ | श० १५८२ आषाढ व० ६<br>इ० १६६० जुलै १७ |

[ अफझलवधानंतर शिवचरित्रांतील महत्त्वाचा प्रसंग पन्हाळयाच्या वेढयाचा होय. यासंबंधी त्या काळी वेंगुर्ल्याच्या डच व्यापाऱ्यांनीं आपल्या गव्हर्नर जनरलला त्या वेळीं लिहिलेले हें पत्र आहे. सदरहु पत्रांत शेवटी 'शिवाजीस अडवून धरलें' असें लिहिलें आहे पण शिवाजी खरोखर निसटून गेला हें इतिहासज्ञास माहीत आहेच. पत्र समकालीन असलें तरी त्यांतील विधान पारखून घेतले पाहिजे हें यावरून लक्षांत येईल. ]

आम्ही मागलें पत्र रवाना केल्यानंतर विजापूरकरांच्या सैन्यानें पाठलाग केल्यामुळें शिवाजी (८ हजार शिपाई व ६० घोडेस्वार घेऊन) पन्हाळयाच्या बळकट किल्ल्यांत शिरला; आणि बाकीचें सैन्य त्यानें जिंकलेल्या ठाण्याच्या बंदोबस्तासाठीं ठिकठिकाणीं रवाना केलें. पावसाळा जवळ आल्यामुळें शिद्दी जोहारला वेढा फार दिवस चालवितां येणार नाहीं असा शिवाजीचा अंदाज होता, पण हा त्याचा अंदाज चुकीचा ठरला; कारण सिद्दी जोहारानें बऱ्याच

---

१ खुशी, संमति. २ सबंधीचे, तर्फेचे.

सैन्यानिशी पावसाळ्यांत देखील वेढा चालू ठेवण्याचें ठरविलें व पावसाळी छपरेंहि बांधविलीं. किल्ल्यांत तंबाकू, मीठ वगैरे जिनसांचा तुटवडा असून पुष्कळ पैसा भरून अली आदिलशाहकडून माफी मिळविण्याची शिवाजी खटपट करीत आहे अशी लोकवार्ता आहे. तथापि अशी माफी देण्याचें नाकारण्यांत आलें. याकरितां थोडया लोकानिशीं किल्ल्यांतून निघून जावें असें शिवाजीनें योजलें पण आंतल्या पठाणांनीं (शिपायांनीं ?) त्याला आडवून धरलें.

---

# ११. पुण्यांत शास्ताखानावर हल्ला

| | |
|---|---|
| **पत्रसारसंग्रह भाग ३ रा, नं० २६७२** | **श० १५८५ चैत्र इ० १६६२ एप्रिल** |

[कोयाजी बांदल यांच्या वंशजांनी इनाम जमिनीचे कागद जपून ठेवले म्हणून शिवाजीच्या शास्ताखानावरील हल्ल्याचें तत्कालीन मराठी वृत्त अचानक हाती आलें.]

......शास्ताखान दिल्लीहून स्वारी करून आले. खासा राजमहालात येऊन राहिले. ते समयी थोरले महाराज जातीनशी रात्रीस धारकरी[१] लोक पायउतारा[२] घेऊन रंगमहालात प्रवेश करून गर्दी केली. ते वेळेस कोयाजी बांदल याणे मोगलाचे लोकावर वार केले; त्यासही चार वार लागले. याकरिता महाराज कृपाळू होऊन मौजे आळंदस नूतन इनाम जमीन रकम कास[३] टके[४] १७॥ दिल्हे.

---

१ तरवारबहादर. २ पायी चालत. ३ लागवडीयोग्य जमीन. ४ टका—टक्का. जमिनीचें क्षेत्रमाप.

४८ रुके = १ टक्का
१ टक्का = ४ चाहूर
१२० बिघे = १ चाहूर

शिवचरित्रसाहित्य खं० २ पृ० १२८ पहा.

# १२. सुरतेची लूट

पत्रसारसंग्रह, पत्र नं० ९६६ | श० १५८५ पौ० व० ३ ते व० १४ इ० १६६४ जनेवारी ५ ते १७

## ‘ लॉयल मर्चंट ’ गलबताचें टिपण पुस्तक

स्वाली[1] होल, ५ जाने—शिवाजी सुरतेहून १०।१२ मैलांवर आल्याची बातमी सायंकाळीं ३ वाजतां प्रेसिडेंटनें कळविली. त्याचे मागणीप्रमाणें १० हत्यारबंद लोक कंपनीच्या मालाच्या रक्षणाकरितां सुरतेस पाठविले.

६ जानेवारी—दोन प्रहरीं अडीच वाजतां ‘ सुरतेंतील माल व माणसें ही धोक्यांत आहेत. तेथें फक्त १० माणसें ठेवून बाकीचे सर्व लोक पाठवा ’ अशी प्रेसिडेंटची चिठी आली. परंतु····फक्त ४२ शिपाई पाठविले. त्या रात्रीं शिवाजी शहरांत शिरला आणि जाळपोळ व लुटालुटीस सुरवात झाली. इंग्रजांच्या वखारींत १५० इंग्रज व ६० शिपाई रक्षणाच्या तयारीनें राहिले. सुरतेचा भित्रा सुभेदार शहरांतील वीस हजार माणसांना असहाय्य स्थितींत सोडून किल्ल्यांत पळून गेला ! इंग्रजाप्रमाणें डचहि तयारीनें राहिले. इंग्रजांच्या वखारीजवळ ते लोक येतांच इंग्रजांनीं बाहेर पडून शिवाजीचे ३ शिपाई व १ घोडा ठार केला····या उदाहरणानें आर्मीनिअन्स वगैरे परदेशी लोकहि ठासून ठिकाणीं राहिले. परंतु मनुष्यबळ अपुरें पडल्यामुळें कोणालाच चालून जातां आलें नाहीं, व शिवाजीची लूट अप्रतिहत चालू राहिली. सोनें, रुपें, मोतीं, हिरे इत्यादि मूल्यवान जिनसांशिवाय त्यानें इतर क्षुद्र वस्तूंकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं !

---

१ स्वाली किंवा सुवाली हें पश्चिम किनाऱ्याबर बंदर आहे.

# १३. शिवाजीसंबंधीं उठणाऱ्या बातम्या

पत्रसारसंग्रह, पत्र नं० ९९६

श० १५८६ आषाढ शु० १३
इ० १६६४ जून २६

[ शिवाजीचा उदय होत असतां समुद्रकिनाऱ्यावर सुरत, मुबई, वगैरे ठिकाणीं इंग्रज कंपनीचे व्यापारी असत. ते एकमेकांस जी पत्रें लिहीत तीं उपलब्ध असून पुढील पत्र त्यांपैकीं आहे. ]

सुरत–कारवार (१४ मेच्या पत्रास उत्तर)

विलक्षण धाडसी असा दरवडेखोर म्हणून शिवाजीची इतकी ख्याति झाली आहे कीं लोकांनीं **'त्याचें शरीर हवामय असून त्याला पंखहि आहेत'** असें उठविलें आहे. एरव्हीं तो एकाच वेळीं अनेक ठिकाणीं प्रकट होतो ह्या बातम्या शक्य तरी कशा होतात? आज तो एका ठिकाणीं आहे असें खात्रीलायक समजावें, तर एक दोन दिवसांत तो दुसऱ्या ठिकाणीं आहे असें कळतें. तर लगेच दूर दूर असलेल्या पांचसहा ठिकाणीं एकामागून एक अशा तऱ्हेनें अप्रतिहतपणें लूटालूट व जाळपोळ करतांना तो आढळतो! यामुळें त्याचें नांव सर्वतोमुखी झालें असून त्याला भीमाचें (हर्क्युलिस) सामर्थ्य आहे असें लोक मानतात. सुमारें ६० एक गलबतें (कांहीं नवीं बांधून व सज्ज करून) घेऊन तो ह्या बंदरावर (सुरतेवर) अचानक हल्ला करून इराण व बसरा इकडून परत येणारीं गलबतें लुटणार आहे अशी हूल उठल्यामुळें आमचे तोंडचें पाणी पळालें आहे! कित्येक लोकांच्या मतें शिवाजी एवढी तयारी करून खंबायत नदींतून जाऊन सुरतेप्रमाणेंच अहमदाबादची जाळपोळ व लूट करणार आहे! तो गोव्याला वेढा देईल हें आम्हांला मुळींच संभवनीय वाटत नाहीं. एकादा सक्त वेढा चालवीत बसण्याचें त्याच्या मनांतहि नाहीं. कारण त्यांत त्याला कांहीं लाभ होणार नाहीं. बिनतटबंदीचीं नगरें धांवतां पळतांना जाळून लुटावीं असा अनायासें मिळणारा लाभ त्याला नेहमी पाहिजे असतो. तुमच्या येथपर्यंत तो येणार नाहीं, कारण पावसाळयांत घोडा

किंवा मनुष्य यांना तिकडील प्रवास सुखाचा होणार नाहीं; आणि दुसरें असें कीं, विजापूरच्या शाहानें त्याच्यावर सैन्य पाठविलें तर त्याला रिकामा वेळ लाभणार नाहीं. तथापि आपण सुरक्षित आहों या विश्वासावर विसंबूं नका. शिवाजीच्या पाळतीवर असा; आणि वेळ येतांच सुरक्षित ठिकाणीं जातां येईल अशा तयारीनें रहा, हाच आमचा सल्ला आहे. हुबळी हें ठिकाण आम्हांला सुरक्षित वाटतें. तरी कंपनीची सर्व मालमत्ता तिकडे नेण्याची तजवीज करा.

---

## १४. पुरंदरचा तह

**पत्रसारसंग्रह, नं० १०८३** — **श० १५८७ भाद्रपद शु० ७, इ० १६६५ सप्टंबर ५**

[ औरंगजेबाच्या पत्रांपैकी हें एक नमुनेदार पत्र आहे. अशींच शाहूला आलेलीं पत्रें पुढें आली आहेत. त्यांत शाहूस ' मुसलमानी धर्माचे कैवारी ' म्हटलें आहे. अस्सल फर्मानावर बादशाहाच्या उजव्या हाताचा पंजा उठविण्याचा प्रघात असे. ]

औरंगजेब–शिवाजी

शिवाजीराजे याणी बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावे कीं, सांप्रत तुमचे पत्र बहुत नरमाईचें राजे जेसिंग यांचे भेटीबद्दल कळलें. कृत्य माफ व्हावें म्हणून घेतलें याचे पाहून गोड ध्यानास आला.[१] यापूर्वी तुमचे मनांतील हाशील[२] सरकार कामगारांनीं समजविलें होतें कीं, तुम्ही आपले कृत्यांचा पश्चात्ताप करून, या दौलतीचे आश्रयास येऊन, तीस किल्ले आपणांकडील इकडील कामगारांचे स्वाधीन करून, बारा किल्ले व त्यांजखालील मुलूख एक

---

१ कृत्य माफ व्हावें असें तुम्हीं मागून घेतल्याचें लक्षांत येऊन तुमच्यासंबंधी आम्हांस बरें (गोड) वाटलें, असा भावार्थ. २ तात्पर्य.

लक्ष होनांचा;[1] निजामशाहीचे किल्ले व मुलूख पैकीं, त्याच प्रकारें आणखी चार लक्ष होनांचा मुलूख तळ कोंकणांतील विजापूरकरांचे इलाख्याचा जो हालीं तुमचेकडे चालू आहे व पांच लक्ष होनांचा मुलूख बालेघाटापैकीं, विजापूरचे इलाख्यापैकीं, येणेप्रमाणें एकंदराचा फर्मान बादशाहो मागता व चाळीस लक्ष होन दरसाल तीन लक्षप्रमाणें पेशकसीबद्दल' देऊं म्हणता. ऐशियास[2], तुमच्या गोष्टी ज्या तुम्हीं तूट अंदेशा[3] न पाहातां केल्या त्या माफी जोग्या नाहींत. तथापि राजे जेसिंग याणी लिहिल्यावरून ते सर्व माफ करून तुमच्या मनोरथाप्रमाणें बारा किल्ले ( देतों ). त्यांचा तपशील खाली लिहिला आहे व त्यांच्या खालचा मुलूख देऊन आणखी हुकूम केला आहे कीं, जो मुलूख नऊ लक्ष होनांचा त्यापैकीं चार लक्ष होनांचा तळकोकणपैकीं विजापूरकरांचे इलाख्यापैकीं हालीं तुम्हांकडे चालत आहे तो बंदोबस्ताकरितां इकडील सरकारांत आला. सबब बालेघाटीं पांच लक्षांचा मुलूख, विजापूर आमचे हातीं येईल त्या आधीं तुम्ही त्यांजकडून घेतल्यास व चांगले फौजसुद्धां राजे जेसिंग यांस मिळोन बादशाही कामांत याचे मर्जीप्रमाणें कोशीस[4] केल्यास, विजापूर फत्ते झाल्यानंतर तुम्ही पेशकसीचे ऐवजाचा भरणा केल्यास, तुम्हांकडे बहाल ठेवूं.[5] हालीं आमचे चिरंजीवास[6] पांच हजारी मनसब व पांच हजार स्वार— कीं एकेकाचीं दोन दोन तीन घोडीं असावीं—याप्रमाणें देऊन, तुम्हांकरितां पोषाख पाठवून, हा[7] फरमान आपले पंजाच्या चिन्हासुद्धां पाठविला आहे. तरी तुम्ही इकडील लक्षांत[8] वागोन बादशाही काम लहान मोठेंसुद्धां करून हें सर्व आपले ऊर्जिताचीच गोष्ट समजावें. रबिलावल सन ८ जुलूस मुा[9] सन १०७६ हि.

---

१ नजराणा. २ 'ऐशियास' या शब्दापर्यंत मूळ पत्रांतील मजकूर यानंतर 'ऐशियास' म्हणजे यास उत्तर कीं. ३ तूट—नुकसान; अंदेशा—विचार. ४ मेहनत. ५ शिवाजीस हा पांच लक्षांचा मुलूख 'बहाल' करण्यापूर्वी औरंगजेब त्यावर किती अटी घालीत आहे त्या वाचण्याजोग्या आहेत. ६ तुमच्यासाठी (तुम्हांस देण्यासाठी) पंचहजारी मनसब, स्वार, पोषाख व फरमान आमच्या चिरंजीवास (चिरंजीवाकडे) पाठविला आहे. ७ हा घेण्याकरितां शिवाजी जयसिंगाचे तळाकडे २७ सप्टेंबरला आला होता [प्रो. सरकारचा 'शिवाजी' पृ. ४२१.] ८ तंत्रानें. ९ मुा—मुताबिक—जुळणारा. जुलूस सन १०७६ शीं जुळणारा.

किल्याचा तपशील राजे जेसिंग यांचे लिहिल्याप्रमाणें :—

| | | |
|---|---|---|
| १ राजगड | १ तोरणा | १ लिंगमगड |
| १ घोरप | १ अलवारी | १ महागड |
| १ घोसाला | १ तळेगड | १ पाल ( गड ) |
| १ उधेदुर्ग | १ रायरी | १ कुंवारी |

---

## १५. शिवाजीस आग्र्याहून सोडावें काय ?

**पत्रसारसंग्रह, नं० ११३२**

**श० १५८८ ज्येष्ठ—श्रावण**
**इ० १६६६ जून—ऑगस्ट**

[ वजनदार राजपूत सरदारासंबंधी देखील औरंगजेबाच्या दरबारीं कसे अविश्वासाचें वातावरण असे तें या पत्रांत दिसून येईल. तसेंच शिवाजी आग्र्यास कैदेंत असतां त्याचे हाल कां टळले याचें उत्तरही या पत्रांत सांपडेल. ]

जयसिंग—औरंगजेब

" पूर्वी शिवाजीला परत जाऊं द्यावें असें मीं विनविलें होतें. तेव्हां दख्खन-मधील परिस्थिति थोडी निराळी होती. आतां ( मोगलांची परिस्थिति ) थोडी बिकट झाली असल्यामुळें शिवाजीला इकडे सोडणें शहाणपणाचें होणार नाहीं. परंतु तेथें ठेवण्यांत सावधगिरी राखिली पाहिजे. नाहीं तर त्याचें जीवित व स्वातंत्र्य धोक्यांत आहे अशी कल्पना झाली म्हणजे त्याचे (दक्षिणेंतील) अमलदार निराशेनें आदिलशाहाला मिळतील. आणि मग सर्वत्र अंदाधुंदी माजून बखेडा मात्र होईल." [हाफ्त अंजुमान—१९४ अ]

" शिवाजीवर मला खुद्द बादशाहांनीं पाठविलें...अगदीं थोडया वेळांत मला यश प्राप्त झालें आणि नंतर हजारो युक्त्या करून त्याला आणि त्याच्या मुलाला दोघांनाहि मीं बादशहासमोर पाठवून दिलें. बादशाहांना या गोष्टी

माहीत आहेत. असें असून दरबारी लोक आतां म्हणतात, ‘ शिवाजी हा असा होता, हें तुला माहीत असतांना त्याला कशाला दरबाराला पाठविलें ?...’ असें ऐकतों. जेव्हां मी त्याला पन्हाळ्यावर पाठविलें तेव्हांहि ‘ जयसिंगानें त्याला आपल्या काबूंतून पळून जाण्यास संधि दिली. ’ अशीहि लोकांनीं टीका केली. आणि आतां त्याला ( ताब्यांत आणून देण्याकरितां ) बादशाही मुलाखतीला पाठविलें तरीही ‘ कशाला पाठविलें ?’ म्हणून म्हणणें आहेच.”

---

# १६. शिवाजीच्या नाशाची गुप्त खटपट

| | |
|---|---|
| **पत्रसारसंग्रह, नं० ११५२** | श० १५८८ इ० १६६६ |

[ बादशाही कार्य फत्ते करण्यासाठी जयसिंग केवढी दगलबाजी करण्यास तयार होता तें वाचा. मात्र एवढ्यावरून सर्व राजपुतांसंबंधीं सर्वसाधारण कल्पना बांधू नका. इतकेंच नव्हे तर खुद्द जयसिंगानेंही हें आवेशाच्या भरांत लिहिलें असण्याचा संभव आहे ही गोष्ट लक्षांत घ्या. ]

जयसिंग—जाफरखान

“ विजापूर, गोवळकोंडा आणि शिवाजी या त्रयीच्या विरुद्ध माझें सर्व सामर्थ्य एकवटून मी प्रयत्न केला आहे व करीतहि राहीन. शिवाजीनें कसें तरी मला एकदां भेटावयास यावें अशा तजविजींत मी आहें. म्हणजे येतां जातांना केव्हां तरी संधि साधून माझे हुषार लोक त्याचा नाश करतील ! हा बादशाहाचा बंदा लोकांच्या निंदास्तुतीकडे न पाहातां बादशाही कार्य फत्ते करण्याकरितां कांहींहि करण्यास तयार आहे. बादशहानीं संमति दिली तर त्याच्या कुळाशीं शरीरसंबंध जोडण्याचें म्हणजे माझ्या मुलाला त्याची मुलगी करण्याचें बोलणें लावण्यास मी तयार आहे. त्याचें घराणें आणि जातकुळी माझ्यापेक्षां इतकी हीन आहे कीं, आम्ही त्याचा स्पर्श झालेलें अन्नहि

खाणार नाहीं. मग लग्नसंबंधींची गोष्ट कशाला? त्याची मुलगी पकडून आणली गेली तरी मी तिला आपल्या जनानखान्यांतहि ठेवणार नाहीं! पण तो हीन कुळांतला असल्यामुळें हें आमिष गिळून हुकाला अडकेल! हा बेत गुप्त राखला पाहिजे. उत्तर त्वरित पाठवावें.'' [हापत अंजु., पृ० १३९ अ]

---

# १७. आरमाराची उभारणी

| | |
|---|---|
| **शिवछत्रपतीचें चरित्र**, पृ० ५५ | इ. स. १७५९ |
| **सभासद बखर**, पृ० ५५ | इ. स. १७७० |

[ कृष्णाजी अनंत सभासद यांनीं रचिलेलें शिवचरित्र 'सभासद बखर' म्हणून प्रसिद्ध आहे. ही बखर इ. स. १६९७ मध्यें म्हणजे शिवाजीच्या मृत्यूनंतर अवघ्या १७ वर्षांनीं लिहिली असल्यानें बरीच विश्वसनीय आहे. मात्र सर्व प्रसंग स्मरणानें तोंडीं सांगावे तसे सांगितले असल्यानें त्यांत प्रसंग आगेमागे झाले आहेत, व कांहीं ढोबळ चुकाही आहेत. इतर बहुत बखरी एकोणिसाव्या शतकांतील किंवा अठराव्या शतकाच्या अखेरी अखेरीच्या आहेत. त्यांपैकीं एकाद्या बखरीबद्दल जुनेपणाचा हक्क क्वचित् सांगितला जातो. 'सभासदी'चें जुनेपण मात्र सर्वांस निर्विवाद मान्य आहे. ]

...पुढें राजियास राजपुरीचे शिद्दी घरांत जैसा उंदीर तैसा शत्रु, यास कैसें जेर करावें म्हणून तजवीज[1] पडली. तेव्हां रघुनाथ बल्लाळ सबनीस यांनीं आंगें[2] अर्ज केला कीं, आपण शिद्दीवर स्वारी करतों. असें म्हणून सात पांच हजार मावळे ख क म (?) पाईचे घेऊन राजपुरीवरि चालिले. त्यांनीं जाऊन राजपुरी पावेतो तळे घोसाळें कुल[3] देश मारून राजपुरी पावेतो सरद[4] (सर्व ?) दरिया[5] किनारा मोकळा केला, शिद्दीच्या एक दोन फौजा आल्या

---

१ तजवीज–विचार, काळजी. २ आंगें–स्वतः होऊन. ३ कुल–सर्व. ४ सरद–सीमा. ५ दरिया–समुद्र.

त्या मारिल्या. तेव्हां राजपुरीकडून रघुनाथपंताशीं राजकारण करून सल्ला केला. देश थोडा बहुत मागून, पुढें सज्जन मनुष्य पाठवून आण शफत देऊन, रघुनाथपंतास भेटीस नेलें. भेट जाहली, सत्याची बळकटी करून सख्य झालें. रघुनाथपंतास वस्त्रें घोडा दिधला. आपले देशास आले. पुढें काळानुसार रघुनाथपंत मृत्यु पावले. त्यानंतर शिद्दीचे शैल तुटले.[1] यावरि हाबशियांनीं बदल खावून[2] देशास उपद्रव करूं लागले....त्यास राजियानीं जाहाजें पाणियांतील सजिलीं.[3] गुराबा व तरांडी[4] व तारवें, गलबतें, शिबाडें[4], गुराबा, पगार[4] अशीं नाना जातींचीं जहाजें करून दर्यासागर म्हणोन मुसलमान सुभेदार व मायनाईक म्हणोन भंडारी असे दोघे सुभेदार करून, दोनशें जहाजें एक सुभा, असें आरमार सजलें. त्यास व शिद्दीचे जाहाजास युद्ध होऊन शिद्दीचीं जहाजें पाडाव केलीं. युद्ध बहुत जाहलें. दर्यांत तरांडें फिरेना असें जालें. त्यावर हमेशा[5] युद्ध करीत चालले. मग चोरून मारून हाबशी सामान नेत होता. राजियाचीं जहाजें व जागांजागां बंदरें शहरें मोंगलाई व फिरंगी व वलंदेज[6], इंग्रज किलाताव[7] ऐशा सत्तावीस पातशाहा[8] पाणियांत आहेत त्यांचीं शहरें बदनूर, सोंदें, श्रीरंगपट्टण एशी दर्या किनारे नाना शहरें मारून पोट भरीत चालले. जागांजागां युद्ध करीत मालमत्ता मेळवून आपलें पोट भरून राजियास रसद[9] द्रव्यें जिन्नस आणून देऊं लागले. ये रीतीनें सातशें जहाजें पाण्यांतील झालीं. समुद्रामध्यें ही एक लष्कर झालें. हा एक बेत सजिला. पाण्यांतील एक राजपुरी निजामशाही उरली.[10]

---

१ शैल तुटले–बुद्धि पालटली (शैल–शील ?). २ बदल खावून–उलट जाऊन. ३ सजिलीं–तयार केलीं. ४ गुराबा, तराडी, वगैरे नौकांचे प्रकार. ५ हमेशा–एकसारखें. ६ वलंदेज–डच. ७ किलाताव (?). ८ पातशाहृचा; हीं सर्व ठाणीं समुद्रकिनारी नाहींत; २७ ही संख्या पोकळ आहे. ९ रसद–सामग्री. १० राजापूर एवढें मात्र बदर निजामशाहाच्या ताब्यांत राहिलें.

**प्रश्न :**—सभासद सिद्दीस ‘ घरांत जैसा उंदीर ’ असें म्हणतो. कोणतें घर ? भोसल्यांचीं गांवें हीं देशावर मैदानी मुलुखांत असतांना शिवाजी कोंकणपट्टीस घर कां समजे ? विस्तार करा. पत्र नं. १४ त दिलेले शिवाजीकडे ठेवलेले किल्ले कोंकणांतील आहेत.

# १८. साल्हेरचा संग्राम



**पत्रसारसंग्रह भाग २ रा, नं० १४४७** | **श० १५९३ माघ व० १२ इ० १६७२ फेब्रु० १५**

मॅथ्यू ग्रे ( स्वाली )—मुंबई

मुरतेहून भीतीची बातमी आल्यामुळें प्रेसिडेंट सुरतेला गेला. स्वराज्यांतच शिवाजीला भरपूर व्यवधानें आहेत, असें जरी तुमच्या ५ तारखेच्या पत्रांत लिहिलें आहे; तथापि तो आपले हात दूरवर पसरतांना दिसतो. त्याच्याबरोबर एक आणि शिवाय बादशाही मुलुखांत एक अशीं त्याचीं दोन मोठीं सैन्यें संचार करीत आहेत. सालेरीला वेढा घालणाऱ्या दिलीलखानाच्या सैन्याचा मोड करून त्या किल्ल्याचा त्यानें चांगला बंदोबस्त केला. दुसऱ्या एका लढाईत त्यानें बहलोलखानाला ठार मारून सालेरींत सुमारें ३० मोठे अमलदार कैदेंत ठेविले आहेत. आतां त्यानें मुल्हेर घेतलें हें निश्चित असून सुरतेचा मार्ग ताब्यांत असल्यामुळें तो केव्हांहि सुरतेला येऊं शकेल. मध्यरात्रींच तो सुरतेपासून २५ मैलांवर आल्याची बातमी आली. ती खरी असल्याचें दिसतें. कारण पूर्वी व्यापाऱ्यांना दरवाजांतून बाहेर न सोडणारा सुभेदार आतां त्यांना आपलीं बायकामुलें व संपत्ति सुरक्षित ठिकाणीं नेण्यास परवानगी देत आहे.

वरचेवर येणाऱ्या हुलीमुळें प्रेसिडेंट मुंबईला येऊं शकला नाहीं. पावसाळ्यापूर्वी बहुधा येईल.

**प्रश्न :**—पुण्याहून सुरतेचा शिवकालीन मार्ग कोणता ? हल्लीं कोणता आहे ?



# १९. ख्रिस्ती धर्माचा गुप्त प्रचार

**पत्रसारसंग्रह भा० २ रा, नं० १६०३** — **श० १५९५ मार्ग० व० २ इ० १६७३ डिसें० १५**

[ अशीं गुप्त पत्रें उजेडांत आल्यावांचून कुणाचें अंतरंग कसें कळेल ? ]

मुंबई—ई० इं० कंपनी

मुंबईच्या लोखंडी तोफा आम्ही शिवाजीला देऊं शकूं. परंतु तसें केल्यानें शत्रूला तोफा पुरविल्याबद्दल बादशहाचा आपल्यावर राग होईल .... ...

दहा आज्ञा आणि ख्रिस्ती धर्माच्या तत्त्वांचें देशी भाषांत भाषांतर करून तें बेटांत फैलावून ख्रिस्ती धर्म स्वीकारण्यास उत्तेजन द्यावें. ही आपली आज्ञा आम्हांला महत्त्वाची वाटते. आणि ती अमलांत आणण्याचा प्रसंग येईल त्याप्रमाणें आम्ही अमलांत आणूं. परंतु धर्माचे बाबतींत सर्वांना स्वातंत्र्य देण्याची आमची प्रतिज्ञा असल्यामुळेंच येथें लोकवस्ती वाढत आहे, हें ध्यानांत घेतां या बाबतींत आमचें ताटस्थ्य थोडें देखील ढळल्याचें लोकांच्या लक्षांत आल्यास अनिष्ट परिणाम होईल. यामुळें हें आक्रमण गुप्त-पणेंच करणें जरूर आहे.

---

# २०. शिवाजीचा राज्याभिषेक

**पत्रसारसंग्रह भा० २ रा, नं० १६४३** — **श० १५९६ वैशाख व० ४ ते ज्येष्ठ व० ५ इ० १६७४ मे १३ ते जून १३**

[ शिवाजीच्या राज्याभिषेकप्रसंगीं ऑक्झिंडेन हा इंग्रज कंपनीतर्फें हजर होता. त्यानें राज्याभिषेकसमारंभाचें केलेलें सर्वच वर्णन मुळांतून वाचण्यालायक आहे. त्रयस्थ वृत्तीनें लिहिलेलें हें चक्षुर्वैसत्यं वर्णन असल्यानें तर त्यास विशेष महत्त्व आहे. ]

आर्क्झिडेनची रायगडच्या शिष्टाईची रोजनिशी—

**जून ५** रोजीं, दुसऱ्या दिवशीं ७।८ वाजतां सिंहासनारूढ राजाला मुजरा व नजर करण्यासाठीं यावें म्हणून निराजी पंडिताचा निरोप आला.

**ता. ६ जून** रोजीं, त्या वेळीं राजा भव्य सिंहासनावर आरूढ झालेला व मूल्यवान पोशाख केलेल्या प्रधानांनीं वेष्टिलेला दिसला. संभाजी राजे, पेशवा मोरोपंत आणि एक श्रेष्ठ ब्राह्मण हे सिंहासनाखालीं लगत उंचवट्यावर (on an ascent under the throne) बसले होते. राहिलेले सेनाध्यक्ष व इतर अमलदार बाजूला आदरानें उभे होते. मी मुजरा केला व नारायण शेणव्यानें नजरेची आंगठी वर धरली. शिवाजीचें आमच्याकडे लक्ष जातांच त्यानें अगदीं सिंहासनाच्या पायरीजवळ येण्याचा आम्हांला हुकूम केला व पोशाख देऊन आम्हांला तत्काल रजा दिली. थोडाच वेळ आम्हीं सिंहासना-समोर होतों. तेवढ्या वेळांत सिंहासनाच्या दोन्ही बाजूला सुवर्णांकित भाल्याच्या टोंकावर (मुसलमानी पद्धतीचीं) अनेक अधिकारदर्शक व राज-सत्तेचीं चिन्हें असल्याचें आम्हीं पाहिलें. उजव्या हाताला दोन मोठीं मोठ्या दांतांच्या मत्स्यांचीं सुवर्णाचीं शिरें होतीं. डाव्या हाताला अनेक अश्वपुच्छें व एक मूल्यवान भाल्याच्या टोंकावर समपातळींत लोंबणारीं सोन्याच्या तराजूचीं पारडीं, न्यायचिन्ह म्हणून तळपत होतीं. राजवाड्याच्या दाराशीं आम्ही परत आलों तों दोन लहान हत्ती दरवाज्याच्या दोन्ही बाजूला उभे केले असून दोन सुंदर (पांढरे) घोडे शृंगारून आणिलेले दिसले. गडाचा मार्ग इतका बिकट होता हें लक्षांत घेतां हे पशु कोठून वर आले असावे याचा आम्हांला तर्कच करवेना !

---

# २१. राजव्यवहार कोश

**शि० च० प्र०** } { **पृ० १४७**

[ ‘यवन वचनांनीं लुप्तप्राय झालेली विबुध भाषा प्रसृत करण्यासाठीं व राजाच्या रोजच्या उपयोगासाठीं राजव्यवहार कोश रचावा म्हणून मूर्धा-

भिषिक्त झालेल्या शिवाजीनें मला आज्ञा केल्यावरून मी हा कोश रचला आहे ' असें रघुनाथ नारायणानें म्हटलें आहे. यावरून शिवाजीचें लक्ष एतद्देशीय संस्कृतीचें यावनी संस्कृतीपासून रक्षण व्हावें इकडेही असल्याचें दिसून येईल. या ग्रंथाचे १० भाग व ३८४ श्लोक आहेत. पुढील ८ श्लोक केवळ नमुन्यादाखल दिले आहेत. नलदमयंती स्वयंवराचा कर्ता रघुनाथपंडित तो हाच. आधुनिक सावरकरसांप्रदायी शब्दकारास या पंडिताच्या शब्दरचनेचें विशेष कौतुक वाटेल. पण यांतील कांही शब्द निःसंशय बोजड आहेत. ]

**कार्यस्थानं तु कार्खाना-नामतः परिभाषितम् ॥**
**कौशागारं खजाना स्याज् जाम्दारः कोशरक्षकः ॥३४॥**

**यस्तस्य तु हवाल्दारः कोशपालः स ईरितः ॥**
**अधिकारी सैनिकानां सर्हवाल्दार नामकः ॥३५॥**

**निक्षेपस्तु दफीना स्याद् दास्तानं संचितम् स्मृतम् ॥**
**व्ययस्थानं खर्चपोतें तदीयस्तु हवालदार्— ॥३६॥**

**व्ययाधिकारी, तस्यैव जाम्दारो व्ययकिङ्करः ॥**
**तत्रत्यो निर्विसिदा यः स भवेद् व्ययलेखकः ॥३७॥**

**पोतदारो नाम बुधैर्ज्ञेयो द्रव्यपरीक्षकः ॥**
**द्रव्यं तु नख्त-संज्ञं स्याद् वराटो होन उच्यते ॥३८॥**

**तदर्धं तु प्रतापः स्याद् भाषयोरुभयोरपि ॥**
**वराहपादो धरणश् चवलस्त्वष्टमांशकः ॥३९॥**

**दुवलः षोडशांशः स्यान्मोहरा तु बुधैः स्मृतम्—॥**
**सुवर्णनिष्कं, रजतनिष्कं स्याद् रूपयाभिधम् ॥४०॥**

---

या उताऱ्यांत आलेले शब्द व त्याचे पर्याय पुढीलप्रमाणें :—

कार्खाना—कार्यस्थान. खजाना—कोशागार. जामदार—कोशरक्षक, व्ययकिंकर. हवाल्दार—कोशपाल, व्ययाधिकारी. सर्हवालदार—सैनिकांचा अधिकारी, व्ययाधिकारी. दफीना—निक्षेप. दास्तान—संचित. खर्चपोते—व्ययस्थान. निर्विसिदा—व्ययलेखक. पोतदार—द्रव्यपरीक्षक. नख्त—द्रव्य. होन—वराट. होनाचा अर्धा—प्रताप. धरण—वराहपाद. चवल—अष्टमांशक. दुवल—षोडशांश. मोहरा—सुवर्णनिष्क. रुपया—रजतनिष्क.

वाच्या रजतवर्ती तु लाहरी फलमः पणः ॥
ताम्रद्रव्यं तु खुर्दा स्याद् बस्तनं बन्धनं स्मृतम् ॥४१॥

---

# २२. शिवाजीची समर्थांस सनद

श्रीरामदासवचनामृत, पृ० १९९–२०० } { आश्विन शु० १० शके १६००

[ समर्थ-शिवाजी यांचे परस्पर संबंध लक्षांत येण्यास हा उतारा उपयुक्त आहे. ]

श्रीरघुपती श्रीमारुती

श्रीसद्‌गुरुवर्य श्रीसकळतीर्थरुप श्रीकैवल्यधाम[1]

श्रीमहाराज स्वामीचे सेवेसीं—

चरणरज[2] शिवाजी राजे यांनीं चरणावरी मस्तक ठेऊन विज्ञापना जे[3] मजवर कृपा करुनु सनाथ केलें. आज्ञा केलीं कीं तुमचा मुख्य धर्म राज्यसाधन करुन धर्मस्थापना, देव-ब्राह्मणाची सेवा, प्रजेची पीडा दूर करुनु पाळण, रक्षण करावें; हें व्रत संपादून त्यांत परमार्थ करावा. तुम्हीं जें मनीं धराल तें श्रीसिद्धीस पाववील. त्याजवरून[4] जो जो उद्योग केला व दुष्ट तुरुक ( पाठभेद-दुराढे ) लोकांचा नाश करावा, विपुल द्रव्यें करुनु राज्यपरंपरा अक्षई चालेल

---

लाहरी–रजतवर्ती. फलम–पण. खुर्दा–ताम्रद्रव्य. बस्तन–बंधन.

१ मोक्षाचें माहेरघर. २ पायाची धूळ. ३ की. ४ यावरून राज्यस्थापनेचा उद्योग सुरू करण्यापूर्वी, निदान त्यास मोठें स्वरूप येण्यापूर्वीच समर्थ-शिवाजी भेट झाली असली पाहिजे हें उघड आहे; यानंतर कित्येक वर्षांनीं चाफळ येथें श्रीरामाची स्थापना झाली त्यानंतर हें पत्र लिहिलें गेलें आहे. समर्थ-शिवाजीसंबंधाची त्रोटक परंतु मुद्देसूद चर्चा प्रा० रानडे यांनीं रामदासवचनामताच्या प्रस्तावनेंत केलेली आहे.

ऐशीं स्थळें दुर्घट[1] करावीं ऐसें जें जे मनीं धरिलें तें तें स्वामींनीं आशीर्वाद-प्रतापें मनोरथ पूर्ण केले.

याउपरि राज्य सर्व संपादिलें तें चरणीं अर्पण करुनु सर्वकाळ सेवा घडावी ऐसा विचार मनीं आणिला तेव्हां आज्ञा जाहली कीं, "तुम्हांस पूर्वीं धर्म सांगितला तेच करावेस तीच सेवा होय," ऐसें आज्ञापिलें.

यावरून निकटवास घडुनु वारंवार दर्शन घडावें; श्रीची स्थापना कोठें तरी होउनु सांप्रदाय शिष्य व भक्ती दिगंत विस्तीर्ण घडावी ऐसी प्रार्थना केली. तेही आसमंतात गिरिगव्हरीं[2] वास करुनु चाफळीं श्रीची स्थापना करुनु सांप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता घडली.[3]'

---

## २३. शिवाजीचें औरंगजेबास पत्र

सनदापत्रें, पृ० १४९ } { इ० स० १६७९

### 'जेजिया पट्टी'चा निषेध

[ मूळ फारसी हस्ताक्षर. शिवाजीचा फारसीनवीस* नीलप्रभु याचें. ]

'...आम्ही† इकडे आल्यावर पादशाई खजिना रिकामा जाहाला व सारें द्रव्य खर्च जाहालें. याजकरितां हिंदु लोकांपासून जेजिया पट्टीचें द्रव्य उत्पन्न करून पादशाईचा क्रम चालविला आहे असें ऐकण्यांत आलें. त्यास पूर्वीं अकबर पादशाहा याणीं बावन वर्षें पादशाही केली. यामुळें एकंदर हिंदु वगैरे लोकांचे धर्म चांगले चालले व ते धर्मस्थापनेविसी मदत ठेवीत होते. सबब 'जगद्गुरु' असी त्याची कीर्ति जाहाली. व त्यास हरएक स्थळीं यश येत होतें. पुढें नरोद्दिन

---

१ अवघड. २ गुहा. ३ सांप्रदाय व शिष्य चारही दिशांस विस्तार पावले.
*फारशी लेखक. यावरून 'पारसनीस' हा शब्द आला असावा. †शिवाजी.

झ्यांगीर पादशाहा याणीं बेवीस वर्षें ईश्वरी लक्ष ठेऊन पादशाई केली. नंतर स्वर्गास पोहोचले. उपरांत[1] शहाजहान साहेबकिरान* पादशाहा याणीं बत्तीस वर्षें पादशाहाई करून कीर्ति मिळविली. जो पुरुष जिवंत असतां लौकिकवान व माघे ज्याची कीर्ति त्याजला अचल लक्ष्मी प्राप्त जाहाली असें आहे. तेव्हां पादशाहा याणीं जेजियापट्टी घेण्यास ते समर्थ होते, परंतु ‘ सारे लहानमोठे जन ईश्वराचे आहेत ’ असें जाणोन त्याणीं कोणावर जुलूम केला नाहीं. याजकरितां सर्वांचे मुखीं त्यांची स्तुति आहे. ज्याची जसी नेत[2] तसी त्यास बरकत.[3] त्या पादशाहा याची दृष्ट प्रजेचे कल्याणावर होती. व आपले कारकीर्दीस कितीएक किले व मुलूख गेले. बाकी राहिले तेहि जातात. रयत लोक खराब[4] आहेत. व सौदागर[5] पुकारा करितात कीं हरएक माहालाचें उत्पन्न लाखास एक हजार येणें कठिण जाहलें आहे. पादशाहाचे घरीं दरिद्राचा वास जाहला. तेव्हां पदरचे मंडळीची अवस्था कळतच आहे कीं कितीएक लोकांस पोटास मिळत नाहीं. त्यांजवर जेजिया पट्टी म्हणोन हिंदु लोकांवर आपण कर बसविला तो मुलगा जाहला म्हणजे दहा रुपये व मुलगी जाहली म्हणजे पांच रुपये असा चक[6] बसविला. या प्रकारचे करण्यांतच पुरुषार्थ पादशाहा समजतात. व तैमूर पादशाहाचें नांव बुडवितात असें जाहलें आहे. व कुराणांत ईश्वर जगाचा व मुसलमानाचाच आहे येविसी वाईट अगर चांगलें हे दोनी ईश्वरानें निर्माण केलें आहे हे रद[7] करून महेजतींत[8] यवन लोक बाग[9] देतात व देवालयांत हिंदु लोक घंटा वाजवितात, याजकरितां कोणाचे धर्मावर दोष ठेविल्यास ईश्वरानें लिहिलें तें रद्द केल्यासारिखे होतें. न्यायाचे मार्गानें जेजिया पट्टीचा फायदा केवळ गैर. ज्यावर जुलूम जाहला, त्याणें खेद करोन ‘ हाय, हाय ’ म्हणोन मुखानें धूर काढिल्यास त्या धुरानें जितके लौकर जळेल तितके अग्नी जलदीनें जळतां इसदास[10] जाळणार नाहीं, ऐसे आहे. याजवर हिंदु लोकास पीडा करण्यांतच धर्म आहे असें मनांत आलें असल्यास राजा राजसिंग याजपासून जेजिया पट्टी अगोदर घ्यावी. मग

---

१ नंतर. २ नेत-नियत–शील. ३ भरभराट. ४ वाईट स्थितींत. ५ व्यापारी. ६ हुकूमनामा. ७ ‘रद्द.’ या वाक्याचा अर्थ काय? ८ मशिदींत. ९ प्रार्थनेसाठीं पुकारा. १० इस्बत शपथ–इसबदास–शपथपूर्वक असा अर्थ असावा. *ग्रहांच्या युतींचा साहेब (नियंत्रक).

इकडून देण्यास कठीण नाहीं. परंतु गरीब मुंग्या चिलटासारखे आहेत. त्यास उपद्रव करण्यांत मोठेपणा नाहीं. पदरची मंडळी अग्नी गवतानें झाकितात हें आश्चर्य वाटतें. राज्याचा सूर्य प्रतापाचा उदयचळापासून तेजस्वी असो.'

—वार्षिक इतिवृत्त शके १८३७, पृ० १६६.

**अभ्यास** :—१ या उताऱ्यांतील म्हणीवजा सुंदर वाक्यें निवडून काढा. २ या उताऱ्यांतील धार्मिक उदारतादर्शक वाक्यें निवडा. ३ औरंगजेबाचे डोळे उघडावे म्हणून लिहिलेला भाग कोणता ? ४ जिझिया कर काय होता ? ५ या उताऱ्यावरून दिल्लीच्या राज्याविषयीं शिवाजीची बुद्धि काय होती असें अनुमान होतें ? ६ आज दारुनिर्बंध दूर होत आहे याबद्दल नापसंति दर्शविणारें पत्र मुंबई सरकारास लिहा.

---

# २४. शिवाजीचें फौजेच्या अधिकाऱ्यास पत्र

| | |
|---|---|
| राजवाडे खं० ८,<br>ले० २८, पृ० २३ | वैशाख शु० १५ श० १५९६<br>ता० ९ मे १६७४ |

[ आपल्या सैन्यापासून प्रजेस त्रास होऊं नये याबद्दल शिवाजी फारच जपत असे, हें निराळे सांगण्याची जरूरी नाही. एकदां शिवाजीच्या कांहीं फौजेची छावणी कोंकणांत होती. त्या फौजेच्या अधिकाऱ्यास शिवाजीनें एक पत्र लिहिलें, तें पुढीलप्रमाणें ]

श्रीभवानीशंकर

मशरुल[1] अनाम[2] राजश्री जुमलेदारानी[3] व हवालदारानी व कारकुनानी

---

१ लौकिक. २ लोक, अर्थात् मशरूल अनाम—लोकांत लौकिकवान. 'राजमान्य राजश्री' प्रमाणें फारसी मायना. ३ जुमलेदार, हवालदार व कारकून यांचीं प्रथमेचीं अनेकवचनें. जुमलेदार—जुम्ल्यावरील अधिकारी; जुम्ला—समाइकी जमीन.

दिमत[४] पायगो[४] मुक्काम मौजे हलवर्ण तो[५] चिपळूण मामले[६] दाभोळ प्रति राजेश्री शिवाजी राजे सुा[७] अर्बा[८] सबैन व अलफ. कसबे चिपळूणीं साहेबी लष्कराची विले[९] केली आणि या उपरी घाटावरी कटक जावें ऐसा मान[१०] नाहीं म्हणून एव्हां छावणीस रवाना केलें. ऐसीयास, चिपळूणी कटकाचा मुक्काम होता याकरितां दाभोळच्या सुबेयांत[११] पावसाळ्याकारणें पागेस सामा[१२] व दाणा व वरकड[१३] केला होता तो कित्येक खर्च होऊन गेला व चिपळुणाआसपास विलातींत[१४] लष्कराची तसवीस[१५] व गवताची व वरकड हरएक बाब लागली. त्याकरितां हाल[१६] कांहीं उरला नाहीं. ऐसें असतां वैशाखाचे दिवस, उन्हाळा, हेही पागेस अधिक बेठी[१७] पडली. परंतु जरूर जालें त्याकरितां कारकुनाकडून व गडोगडी गल्ला असेल तो देवऊनच जैसी तैसी पागेची बेगमी केली आहे. त्यास तुम्ही मनास माने ऐसा दाणा, रातीब[१८], गवत मागाल. असेल तोंवरी धुंदी करून चाराल. नाहींसें जालें म्हणजे मग कांहीं पडत्या पावसांत मिळणार नाहीं. उपास पडतील, घोडीं मरावयास लागतील. म्हणजे घोडीं तुम्हींच मारिलीं ऐसें होईल. व विलातीस तसवीस देऊं लागाल. ऐशास, लोक जातील, कोण्ही कुणब्याचे एथील दाणे आणील, कोण्ही भाकर, कोण्ही गवत, कोण्ही फाटे, कोण्ही भाजी, कोण्ही पाले, ऐसें करूं लागलेत म्हणजे जीं कुणबीं घर धरून जीवमात्र घेऊन राहिलीं आहेत तेहि जाऊं लागतील. कित्येक उपाशी मरायला लागतील. म्हणजे त्याला ऐसे होईल कीं मोंगल मुलकांत आले त्याहूनहि अधिक तुम्ही! ऐसा तळतळाट होईल! तेव्हां रयतीची व घोडयांची सारी बदनामी तुम्हावरी येईल. हें तुम्हीं बरें जाणून, सिपाई हो अगर पावखलक[१९] हो, बहुत यादी[२०] धरून वर्तणूक करणें. कोण्ही पागेस अगर मुलकांत गांवोगांव राहिले असाल त्यांणीं रयतेस काडीचा अजार[२१] द्यावयाची गरज नाहीं. आपल्या

४ दिमत–संबंधीं, पागकडील. ४ पायगो-पायगा–पागा. ५ तरफ. ६ मामलत. ७ सुा–सुहूरसन. ८ 'अर्बा'–४ सबैन–७०, अलफ–१,०००; सनासाठीं 'कालगणना' पृष्ठ पहा. ९ व्यवस्था. १० हुकूम (?). ११ सुभ्यांत. १२ सामान, सामग्री. १३ इतर जिनसा. १४ विलायत–प्रदेश. १५ त्रास उपसर्ग. १६ आतां. १७ मुक्काम. १८ ठराविक प्रमाण. १९ पायदळांतील सैनिक. २० काळजीपूर्वक. २१ त्रास.

राहिल्या जागांतून बाहीर पाय घालाया गरज नाहीं. साहेबीं खजानांतून वांटणिया पदरीं घातलिया आहेती. ज्याला जें पाहिजे, दाणा हो अगर गुरेंढोरें वागवीत असाल त्यांस गवत हो, अगर फाटे, भाजीपाले व वरकड विकावया येईल तें रास[२१] घ्यावें, बाजारास जावें, रास विकत आणावें. कोण्हावरी जुलूम अगर ज्याजती[२३] अगर कोण्हासी कलागती करावयाची गरज नाहीं. व पागेस सामा केला आहे तो पावसाळा पुरला पाहिजे. ऐसे तजवीजीनें दाणा रातीब कारकून देत जातील तेणेंप्रमाणेंच घेत जाणें; कीं उपास न पडतां रोजबरोज खायला सांपडे आणि होत होत घोडीं तवाना होत ऐसें करणें. नसतीच कारकुनासी धसपस कराया, अगर अमकेंच द्या तमकेंच द्या ऐसें म्हणाया, धुंदी करून खासदारकोटींत,[२४] कोठारांत शिरून लुटाया गरज नाहीं. व हल्लीं उन्हाळ्याला आहे तइसें खलक[२५] पागेचे आहेत, खण[२६] धरून राहिले असतील व राहातील, कोण्हीं आगट्या करतील कोण्ही भलतेच जागा चुली रंधनाला[२७] करितील, कोण्ही तंबाकूला आगी घेतील, गवत पडिलें आहे ऐसें अगर वारें लागलें[२८] आहे ऐसें मनास न आणितां म्हणजे अविस्राच[२९] एकादा दगा होईल. एका खणास आगी लागली म्हणजे सारे खण जळोन जातील. गवताच्या लहळ्यास[३०] कोणीकडून तरी विस्तो जाऊन पडला म्हणजे सारें गवत व लहळ्या आहेत तितक्या एक एक जळों जातील. तेव्हां मग कांहीं कुणबियांच्या गर्दना मारल्या अगर कारकुनास ताकीद[३१] करावी तैसी केली तऱ्ही कांहीं खण कराया एक लाकूड मिळणार नाहीं, एक खण होणार नाहीं; हें तों अवघियाला कळतें. याकारणें, बरी ताकीद करून, खासे खासे असाल ते हमेशा फिरत जाऊन, रंधनेंकरितां, आगट्या जाळिता, अगर रात्रीस दिवा घरांत असेल, अविस्राच उंदीर वात नेईल, ते गोष्टी न हो. खण, गवत वांचेल तें करणें. म्हणजे पावसाळा घोडीं वांचलीं. नाही तर मग, घोडीं बांधावीं नलगेत, खायास घालावें नलगे. पागाच बुडाली. तुम्ही निसूर[३२] जालेत ऐसें होईल. याकारणें तपशिलें तुम्हांस लिहिलें असे. जितके खासे खासे जुमलेदार, कारकून आहां तितके हा रोखा[३३] तपशिलें ऐकणें आणि

---

२२ घाऊक. २३ बळजबरी २४ खासकोठींत. २५ लोक (नीच जातीचे). २६ झोपडी, घर. २७ स्वयंपाकाला. २८ सुरू झालें, सुटलें. २९ अकस्मात्. ३० पेंढ्या. ३१ कडक हुकूम. ३२ निष्काळजी. ३३ हुकूम.

हुषार राहणें, वरचेवरी रोजाचा रोज, खबर घेऊन, ताकीद करून, येणें-प्रमाणें वर्तणूक करितां ज्यापासून अंतर पडेल, ज्याचा गुन्हा होईल, बदनामी ज्यावर येईल त्यास–मराठियाची तो[३४] इज्जत[३५] वाचणार नाहीं, मग रोजगार कैसा, खळक[३६] समजों[३७] ज्यास्ती[३८] केल्यावेगळें सोडणार नाहीं. हें बरें म्हणून वर्तणूक करणें. छ.[३९] १२ सफर.[४०]

---

## २५. शिवाजीकडून अधिकाऱ्याची खरमरीत कानउघाडणी

राजवाडे खं० ८, लें० ३१, पृ० २७

माघ शु० ३ शके १५९६
इ० स० १८ जाने० १६७५

[ एकदां मामले प्रभावळीचा सुभेदार जिवाजी विनायक यानें आरमारास ऐवज व गल्ला नेमल्याप्रमाणें पावता केला नाहीं. ही गोष्ट शिवाजीच्या कानावर गेली, तेव्हां त्याला अत्यंत राग आला व त्यानें सुभेदारास एक खरमरीत पत्र लिहिलें. त्या पत्रावरून शिवाजीची आरमाराबद्दल दक्षता व सुभेदारावरील जरब चांगली व्यक्त होते. तें पत्र येणेंप्रमाणें. ]

"राजश्री जिवाजी विनायक सुभेदार व कारकून सुभे मामले प्रभावळी, प्रती राजश्री शिवाजीराजे दंडवत. दौलतखान व दरियासारंग यांसी ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंत पेशवे यांणीं वराता[१] सुभे मजकुरावरी दिधल्या. त्यास तुम्हीं कांहीं पाठविलें नाहीं म्हणोन कळोन आलें. त्यावरून अजब[२] वाटलें

---

३४ तर. ३५ अब्रू. ३६ क्षुद्र, नीच. ३७ समजून. ३८ कडक शिक्षा केल्यावाचून. ३९ चंद्र. बारावा–शुा द्वादशी. ४० सफर महिना.
१ हुंडी. २ अपूर्व.

कीं, ऐसे नादान थोडे असतील! तुम्हांस समजलें कीं, याला ऐवज कोठें तरी ऐवज खजाना रसद पाठविलिया मजरा[1] होईल म्हणत असाल.* तरी पद्मदुर्ग वसवून राजपुरीच्या (जंजिरा) उरावरी दुसरी राजपुरी केली आहे. त्याची मदत व्हावी, पाणी फाटी आदिकरून सामान पावावें, या कामास आरमार बेगीनें पावावें, तें नाहीं. पद्मदुर्ग हबशी फौजा चौफेर जेर करीत असतील; आणि तुम्ही ऐवज न पाववून, आरमार खोळंबून पाडाल! एवढी हरामखोरी तुम्ही कराल; आणि रसद पाठवून मजरा करूं म्हणाला त्यावरी साहेब रिझतील कीं काय? हे गोष्ट घडावयाची तऱ्ही होय न कळे कीं हबशियांनी कांहीं देऊन आपले चाकर तुम्हांला केले असतील! त्याकरितां ऐसी बुद्धि केली असेल! तरी असल्या चाकरास ठीकठीक केलें पाहिजेत! ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा[2] करूं पाहतो? याउपरी तऱ्ही त्याला ऐवज गल्ला राजश्री मोरोपंतांनीं देविला असेल तो देवितील. तो खजाना रसद पाविलियाहून अधिक जाणून तेणेंप्रमाणें आदा करणें कीं, ते तुमची फिर्याद न करीत व त्यांचे पोटास पावोन आरमार घेऊन पद्मदुर्गाचे मदतीस राहात तें करणें. याउपरी बोभाट आलियाउपरी तुमचा मुलाहिजा करणार नाहीं. गनिमाचे[3] चाकर, गनीम जालेस, ऐसें जाणून बरा नतीजा[4] तुम्हांस पावेल. ताकीद असे. रवाना छ २ जिल्काद."

---

ऐवज—द्रव्य. खजाना—खजिना, द्रव्यकोश. रसद—युद्धोपयोगी सामग्री. गल्ला—धान्य. बेगीनें—वेगानें. १ कमी. २ पर्वा. ३ चोर. ४ शिक्षा. आदा—भरणा.

*तुम्हांस वाटलें कीं कुठें द्रव्य तर कुठें धान्य असें पाठविलें म्हणजे भागेल, (मजरा होणें—भागणें) असा भावार्थ.

# २६. मराठीया लोकांचें बरें करावें

इतिहासमंजरी, पृ० ९८–९९ | इ० स० १६७६ श० १५७८ फाल्गुन

## शिवाजीचें आदिलशहाचे पदरीं असलेल्या मालोजी घोरपडयांस पत्र

[ पुढील उताऱ्यात शिवाजी दक्षिणेंतील मुसलमानांशीं कशीं वळणें बांधीत होता तें दिसून येईल. मराठ्यांचें हित साधावें, दक्षिणी मुसलमानांशी सख्य करावें व ' दक्षणची पादशाही आम्हा दक्षणियांच्या हातीं राहे तें करावें ' असा शिवाजीचा मनसुबा होता. ]

....ऐशियास, दक्षणचे पादशाहीस पठाण[1] जाला, हें गोष्टी बरी नव्हे ! पठाण बळावला म्हणजे एका उपरी एक कुली[2] दक्षिणियांचीं घरें बुडवील, कोणास तगो देणार नाहीं, असें आम्हीं समजोन हजरत कुतुबशाहा पादशाहा यांसी पहिलेपासून रुजुवात[3] राखिली होती. त्यावरून सांप्रत हजरत कुतुबशाहांनीं मेहरबानी करून ' हुजूर भेटीस ' येणें म्हणून दस्तखत[4] मुबारक[5] व दस्तपंजियानसी[6] फर्मान सादर केला. त्यावरून आम्ही येऊन हजरत कुतुबशाहाची भेटी घेतली. भेटीचे समई पादशाही आदब[7] आहे कीं शिरभोई धरावी, तसलीम[8] करावी. परंतु आम्हीं आपणावरी छत्र धरिलें असें ही गोष्ट कुतुबशाहास मान्य होऊन शिरभोई धरणें व तसलीम करणें हें माफ केलें. पादशाहा तिकडून आले; आम्ही इकडून गेलों, पादशाहांनीं बहुतच इज्जती होऊन[9], गळ्यास गळा लाऊन भेटले. आम्हांस हातीं धरून नेऊन जवळी बेसविलें. कितीएक मेहेरबानी जाहीर केली आणि कुतुबशाहाचा व आपला घटी[10]

---

१ परदेशी मुसलमानपक्षीय कारभारी झाला. २ सर्व. ३ निष्ठा. ४ स्वहस्ताक्षरीं पत्र. ५ शुभ. ६ हाताच्या तळव्याचा छाप असलेलें पत्र. ७ दरबारी पद्धत. ८ लवून सलाम. ९ प्रतिष्ठा करून. १० घट्ट.

बरेपणा करून घेतला. याउपरी राजकारण विषईं हजरत कुतुबशाहांनीं महादण्णापंतांस व आम्हांस एकचित करून ऐसा तह केला कीं, जो काय उभयवर्गी तह द्यावा तो आपण कबूल करावाच. ऐसा कुल मनसबा व मदार आम्हावरी टाकिला आहे कीं, 'आपली पादशाही जितकी वाढवं ये तितकी वाढवणें, पठाणाची नस्तनाबूत करणें; दक्षणची पादशाही आम्हा दक्षणियांच्या हातीं राहे तें करावें ' म्हणून. त्यास हा मनसुबा ये प्रसंगीं आमचे हातास आलियाउपरी आम्हीं हाच विचार केला कीं, जे कांहीं आपले जातीचे मराठ लोक आहेती ते आपले कटांत घेऊन कुतुबशाहासी त्यांची रुजुवात करावी, दौलत देवावी, त्यांचे हातें पादशाही काम घेऊन पादशाहाची पादशाही दराज[1] करावी; आणि तुम्हा लोकांच्या दौलताहि चालेत, घरें राहेत, तें करावें. आपल्या जातीच्या मराठिया लोकांचें बरें करावें हें आपणास उचित आहे ऐसें मनावरी आणून तुमचा आमचा वडिलापासून दावा वाढत आला तो आम्हीं मनांतून टाकून, निःकपट होऊन, तुम्ही मराठ लोक, कामाचे, तुमचें बरें करावें ऐसें मनीं धरून, हजरत कुतुबशाहासी बहुत रीती बोलोन, तुम्हांस हजरत कुतुबशाहाचा कौलाचा[2] फर्मान घेऊन पाठविला आहे.

---

## २७. आनंदवनभुवन

**श्रीरामदासवचनामृत** } { पृ० २०१–२०२

[ समर्थांच्या काव्यांतील हा एक निवडक उत्कृष्ट उतारा आहे. परिस्थितीचा थारेपालट झालेला पाहून समर्थांचें अंतःकरण भरून आलेलें आहे. या थारेपालटास देवांचा देव कारण आहे असा विचार येऊन पुढील ओंव्या सहजतेनें समर्थांच्या तोंडांतून एकामागून एक बाहेर पडत आहेत. ]

---

१ वाढवावी. २ इमान.

स्वधर्मा आड जें विघ्नें । तें तें सर्वत्र ऊठिलीं[1] ।
लाटिलीं[2] कुटिलीं[2] देवें । दापिलीं[3] कापिलीं बहु ।।
खौळले[4] लोक देवाचे । मुख्य देवचि[5] उठिला ।
कळेना कायरे होतें । आनंदवनभुवनीं ।।
कल्पांत[6] मांडला मोठा । म्लेंच्छ दैत्य बुडावया ।
कैपक्ष[7] घेतला देवीं । आनंदवनभुवनीं ।।
बुडाले सर्वही पापी । हिंदुस्तान बळावलें ।
अभक्तांचा क्षयो झाला । आनदवनभुवंनीं ।।
पूर्वी जे मारिले होते । तेचि आतां बळावले ।
कोपला देव देवांचा । आनंदवनभुवनीं ।।
येथून वाढिला धर्मु । रमा[8] धर्मसमागमें ।
संतोष मांडला मोठा । आनंदवनभुवनीं ।।
बुडाला औरंग्या पापी । म्लेंच्छ संहार जाहला ।
मोडिली[9] मांडिलीं क्षेत्रें । आनंदवनभुवनीं ।।
उदंड जाहलें पाणी । स्नानसंध्या करावया ।
जपतपअनुष्ठानें । आनंदवनभुवनीं ।।
लिहिला प्रत्ययो[10] आला । मोठा आनंद जाहला ।
चढता वाढता प्रेमा । आनंदवनभुवनीं ।।
रामवरदायिनी माता । गर्द[11] घेऊनि उठली ।
मर्दिले[12] पूर्विचे पापी । आनंदवनभुवनीं ।।
भक्तांसि रक्षिले मागें । आतांही रक्षिते पहा ।
भक्तांसि दिधलें सर्वै । आनंदवनभुवनीं ।।
देवभक्त येक जाले । मिळाले जीव सर्वही ।
संतोष पावले तेथें । आनंदवनभुवनीं ।।
मनासी प्रचीत[13] आली । शब्दीं विश्वास वाटला ।
कामना पुरती[14] सर्वै । आनंदवनभुवनीं ।।

---

१ दूर झालीं. २ नाश केला. ३ दडपलीं. ४ खवळले. ५ राम. रामास समर्थ 'देवांचा देव' म्हणत असत. ६ सर्वनाश. ७ सत्पक्ष. ८ लक्ष्मी. ९ मोडलेलीं, उध्वस्त झालेलीं. १० अनुभव. ११ नाश. १२ मर्दन केलें, नाश केला. १३ अनुभव. १४ पूर्ण होतात.

# २८. कर्नाटकावर स्वारी

पत्रसारसंग्रह, भा० २ रा
पत्र नं० २३३२

श० १५९८
इ० १६७६–७७

[ अलीकडील संशोधनानें शिवकालीन पत्रें पुष्कळ सापडली असलीं तरी खास शिवाजीची थोडींच आहेत. त्यांपैकी हें एक महत्त्वाचें आहे. यांत शिवाजीच्या जिंजीवरील स्वारीची हकीकत आली आहे. एकोजी हा शिवाजीचा धाकटा भाऊ. त्याच्याशी वागतांना राजकारण साधावें व भाऊपणा तुटूं नये, हा शिवाजीचा दुहेरी यत्न होता. तुंगभद्रेच्या दक्षिणेस दूर आपल्या राज्याची शाखा वसवावी हें शिवाजीचें राजकारण होतें. एकोजीनें अर्नी, बंगलूर, कोल्हार, होस्कोटे, तंजावर वगैरे ठाणीं दिल्यास त्याच्या मोबदला शिवाजी एकोजीस तुंगभद्रेच्या उत्तरेस पन्हाळा प्रांतीं मुलूख देण्यास तयार होता. वाढत्या विजयामुळें 'देवीची आपणावर कृपा आहे' असा विश्वास शिवाजीस वाटूं लागल्याचें या पत्रांत व्यक्त झालें आहे. ]

## शिवाजी-एकोजी संबंध

रा० शिवाजी राजे–रा० येकोजी राजे

आशीर्वाद उपरी, कैलासवासी साहेबीं कैलासवास केला त्यास आजी तेरा वर्षे जालीं. महाराजाचे पैके व जडाव व हाती व घोडे व मुलूख आवघेहि रा. रघुनाथपंतीं तुम्हाला राज्यावरी बैसवून संपूर्ण राज्य तुमचे हातीं दिल्हें. यैसियास आमचा अर्ध वांटा तेरा वर्षे तुम्हींच खादला. आम्ही जरी तुम्हा-जवळी मागावें तरी बहुत दूर होतों. बऱ्या बोलें तुम्ही देणार नव्हां. म्हणून तेरा वर्षे सबूरी केली. मनामधे यैसा विचार केला कीं, बरे, महाराजाचे पुत्र तेहि आहेत. खातो तोंवरी खात. मालाचे धनीच आहेत. जे समई आम्हाला फावेल ते समई आम्ही वेव्हार सांगोन घेऊन. यैसें मनी धरून होतों. यैसीयास

हाती–हत्ती. घेऊन–घेऊं.

राजकारणप्रसंगें आम्ही कुतुबशहाचे भेटीस भागानगरास गेलों. तेथून कर्नाटकांत गेलों. चंजी घेतली, व येलूरतर्फेचा मुलूख घेतला. व सेरखानास झगडियांत मोडून गर्देस मेलविलें. सेरखानाचे हातीं मुलूख होता तेवडाहि घेतला. त्यावरी मजल दरमजल कावेरीतीरास गेलों. तेथून तुम्हाला पत्रें लिहिलीं कीं, रा. गोविंदभट गो व रा० काकाजीपंत व रा. निलोबा नाईक व रा. रंगोबा नाईक व तिमाजी यक्षीयार राऊ येसे भले लोक आम्हापासी पाठवणे म्हणून तुम्हाला बहुता रीतीं लिहून पाठविलें त्यावरून तुम्ही सदरहू भले लोक आम्हापासी पाठवून दिल्हे, त्या भले लोकासीं बहुता रीतीं घरोबियाचा वेव्हार सांगोन आमचा अर्धा वांटा आम्हाला बऱ्या बोलें द्या म्हणोन सांगोन पाठविलें. त्याबराबरी रा. बालंभट गोसावी व रा. कृस्ण ज्योतिसी व कृस्णाजी सेखजी येसे आपले तर्फेनें भले लोक दिल्हे. हे भले लोक तुम्हाजवलीं जाऊन बहुतां रीतीं बोलिले कीं, गृहकलह करूं नये; आपला अर्धा वांटा मागतात तो द्यावा येसे बोलिले, परंतु कपटबुद्धी तुम्ही येसी मनी धरिली कीं, या समयांत आम्ही बहुत थोर राजे जालों आहों. आम्हासी आपण खासा भेटीस येऊनु हलभल नरमी बहुत दाखवावी, आणि आमचा वांटा बुडवावा. तेरा वर्षे सारें राज्य आपणच खादले; पुढेंहि सारें राज्य आपणच खावें; येसी बुद्धि मनी धरून वाटियाचा निवडियाची तह न करितां आपण खासाच आमचे भेटीस आलेस आमची व तुमची भेट जाली. त्याउपरी आम्हीं बहुता रीतीं तुम्हासी बोलिलो कीं, आमचा वांटा अरधा द्या. परंतु, तुम्ही वांटा द्यावा हा विचार मनी धराचना. मग जरूर जाले कीं तुम्ही धाकटे भाऊ आपण होऊन आमचे भेटीस आलेस आणि तुम्हाला धरावे आणि वांटा मागावा हे गोष्टी थोरपणाचे इज्जतीमध्यें ल्याख नव्हे. या निमित्य तुम्हाला चंजाउरास जावयाचा निरोप दिधला. ........

आम्ही स्वार होऊन तोरगल प्रांतास आलों. तेथें येसी खबर आइकिली कीं, तुम्ही तुरुक लोकांच्या बुधीस लागोन आमच्या लोकांसी झगडा करावा येसें मनीं धरून आपली सारे जमेत येकवट करून आमच्या

---

चंजी–जिजी. गर्देस–धुळीस. गो–गोसावी. हरभल नरमी–उतावीळपणानें नम्रता. वाटियाचा निवाडियाची–वांट्याचा निर्णय करण्याचा. इज्जत–प्रतिष्ठा. ल्याख–लायक, योग्य. जमेत–जमाव.

लोकांवरी पाठवून दिल्हेत. ते वालगोडपुरास आले. तुमचे लोक चालोन आल्यावरी तुमच्या आमच्या लोकांत थोर झगडा जाला. तुमचे लोक पराजय पावले. प्रतापजी राजे व भिवजी राजे व शिवाजी दबीर येसे तिघे धरिले व कितीयेक लोक मारिले; कितीयेक पलोन दाणादाण होऊन गेले. ऐसा समाचार आइकिला. हें ऐकोन बहुत नवल येसें वाटलें कीं, कें. महाराज त्यांचे तुम्ही पुत्र, बहुत थोर लोक, येसे असोन कांहीं विचार करीत नाहीं, व धर्माधर्म विचारीत नाहीं. येसे असता कस्टी† व्हाल याचें नवल काय? तुम्ही म्हणाल कीं, काये विचार करावा? तरी येसा विचार करावा होता कीं ... ...श्रीदेवाची व श्रीची कृपा त्यावरी पूर्ण जाली आहे. दुस्ट तुर्कांला ते मारितात. आपल्या सैन्यांतहि तुरुक लोकच असतां जयें कैसा होतों; आणि तुरुक लोक कैसे वाचों पहातात, हा विचार करावा होता.[१] आणि युध्याचा प्रसंग पाडावा न हता. परंतु, दुर्योधनासारखी बुधी धरुन युध्य केलें आणि लोक मारविले. जे जाले ते जाले. पुढें तरी हट न करणें. तेरा वर्षे तुम्ही सारे राज्य खादलें तें खादलें. याउपरी कितेक आमचे आम्ही घेतले असे. अरणी, बेगलूर, कोल्हार, होसकोट, सिरलकटे व किरकोल जागे व चंजाऊर येमे जे जागे तुमचे हातीं उरले आहेती ते आमचे लोकांचे हातीं देणे. आणि नकद[२] पैके व जडाव[३] व हाती व घोडे यांचा अरधा वाटा देणें. येसा विचार करुन आम्हासी संधी करणें. तुम्ही येसा संधी निर्मलपणें केलिया आम्ही आपणापासोन तुम्हाला तुंगभद्रे आलाड[४] पनालेप्रांते तिन्ही लक्ष होनांची दौलत देऊन;[५] अथवा आम्हा जवलील दौलत तुम्हाला मानेना तरी कुतुबशाहास अर्ज करून त्यापासून तुम्हाला ३ तीन लक्षांची दौलत देवऊनु.[६] येसे दोन्ही विचार तुम्हाला लिहिले आहेत. या दोन्हींमधील येक मनीं धरुन मान्य करणें. हटाचे हातीं ने देणें.[७] आपल्यांत आपण गृहकलह करावा आणि कस्टी व्हावें याचें कांहीं प्रयोजन नाहीं. याउपरी तऱ्ही आमचा आपला संधी व्हावा येसी बुधी मनीं धरुन वांटियाचा वेव्हार निर्गमून टाकणें.[८] आणि सुखें असणें. गृहकलह बरा

---

†कस्टी—कष्टी, दुःखी. १ तुमच्या सैन्यांत तुर्क असतां तुमचा जय कसा होईल? २ नगद, रोख. ३ सोन्याचे जिन्नस. ४ अलीकडे. ५ देऊ. ६ देववूं. ७ हट्टाच्या भरीस पडूं नका. ८ निकालांत काढणे.

नव्हे आम्ही तरी वडीलपणें आजीवरी[1] तुम्हाला सांगितलें; आतांहि सांगतो ऐकाल तरी बरें. तुम्हीच सुख पावाल. नाइकाल तरी तुम्हीच कस्टी व्हाल. आमचे काय चालतें? बहुत काय लिहिणें 'मर्यादेयं विराजते.'

---

## २९. संभाजी मोगलांस मिळाला

| | |
|---|---|
| **पत्रसारसंग्रह, भा० २ रा, पत्र नं० २११६** | **श० १६०१ श्रावण शु० २ इ० १६७९ जुलै २९** |

मुंबई-सुरत

दिलेरखान व संभाजी यांनी, पावसाळा संपतांच विजापूरच्या वजिरांना शिवाजीवर चालून जाण्यासाठीं आपल्याला मिळण्यास भाग पाडून, पन्हाळ्या-खालीं युद्ध देण्याची जोराची तयारी चालविली आहे. शिवाजी राजानें आपल्या सरहद्दीवर १२,००० घोडस्वार आणून ठेविले आहेत. पावसाळा संपतांच उभयपक्षीं हालचालींना सुरुवात होईल. सुंदा† व बिदनोरच्या राजा-मध्यें जोराच्या लढाया होऊन जमशत [शीर] खानाच्या मदतीनें सुंदाराजाला जय मिळाला. त्यामुळें झालेल्या तहानें बेदनूरच्या राणीला शिरसी व शिरें हे दोन किल्ले व कारवारच्या दक्षिणेकडील मिरजनचें बंदर सुंदाराजाला द्यावें लागलें.*

---

१ आजपर्यंत. † सोंधे (?). * या उताऱ्यांतील सर्व ठाणीं हुबळी ते श्रीरंगपट्टण या भागांत सांपडतील.

# ३०. दिलेरखानाविरुद्ध आदिलशाहास साह्य



पत्रसारसंग्रह, भा० २ रा, पत्र नं० २२१२ | श० १६०१ पौष व० ८ इ० १६८० जाने० १४

(ब्राह्मण वीर राघवय्याचें डेप्युटी गव्हर्नरास पत्र)

गोवळकोंडा-मद्रास

मोगलांचा सेनापती दिलेरखान यानें विजापूरला वेढा घातल्यामुळें त्यांचा कोंडमारा होऊन शिवाजी राजा व सिद्दी मसाऊद यांनीं कांहीं घोडे व सैन्य इतक्यांची मदत गोवळकोंड्याकडे मागितली. तेथूनहि मदत पाठविण्याकरितां सरलष्कर व इतर सेनापती तयार झाले. इतक्यांत मोंगलांचा हेजीब* येऊन त्यानें 'तुम्हीं विजापुरास मदत केल्यास मोगलांचें सैन्य विजापुरांत आहे तेंच पुढें येऊन गोवळकोंड्यावर स्वारी करील,' अशी धमकी दिल्यामुळें गोवळकोंड्याकडील मदत येण्याचें थांबलें. परंतु त्याच वेळीं गोवळकोंड्यानें शिवाजीकडे गुप्तपणें पैसा पाठविला व सैन्य उभें करण्यास सांगितलें. शिवाजीनें त्याप्रमाणें विजापूरच्या लोकांना कुमक केल्यामुळें तेथील स्थिति कांहींशी बरी झाली आहे.



* वकील.

# ३१. शिवाजीच्या मृत्यूसंबंधीं उलटसुलट बातम्या



पत्रसारसंग्रह, नं० २२५८ — १ — शा० १६०२ वैशाख व० ४ / इ० १६८० मे ७

सुरत-मुबई

शिवाजीच्या मृत्यूबद्दल* सर्व बाजूंनीं बातमी येत आहे. तथापि, कित्येकांना अजून संशय आहेच. एकादा मोठा प्रयत्न करण्याचे पूर्वी अशीच बातमी त्याच्याबद्दल पसरविली जाते. तेव्हां अधिक खात्री होईपर्यंत विश्वास येत नाहीं.

पत्रसारसंग्रह, नं० २२६० — २ — शा० १६०२ ज्यें० शु० ३ / इ० १६८० मे २०

सुरत-फो० सें० जॉर्ज

शिवाजी मेल्याची विश्वसनीय बातमी आली होती. परंतु आतां ती खोटी आहे असें म्हणत आहेत. संभाजी राजा, त्याचा ज्येष्ठ पुत्र, ह्याच्यावर तो फारच रागावला होता. त्याला पकडण्यासाठीं ही युक्ति त्यानें केली आहे असें लोकांना वाटतें.

पत्रसारसंग्रह, नं० २२६१ — ३ — शा० १६०२ ज्येष्ठ व० १ / इ० १६८० जून ३

मुंबई-सुरत

शिवाजी मेला हें अगदीं खरं असून संभाजीला बापाच्या सर्वस्वाचा ताबा मिळाला. तो अद्यापि पन्हाळयाला आहे.



*शिवाजीचा मृत्यु ५ एप्रिल १६८० रोजीं झाला होता ही गोष्ट हीं पत्रें वाचतांना लक्षांत ठेवावी.

# ३२. टोपीकर वरकड सावकारासारखे नव्हेत

इतिहासमंजरी } { पृ० १३९–१४१

[ हें राजनीतिविषयक प्रकरण कोल्हापूरकर संभाजी राजे यांचे अमात्य रामचंद्रपंत बावडेकर यांनीं लिहिलें होतें. या राजनीतीत अनुभवाच्या व व्यवहाराच्या कसोटीस उतरणारे बरेच नियम दिलेले आहेत व एकंदर प्रकरण चांगलें वाचनीय व विचारणीय आहे. रामचंद्रपतानें शिवाजीमहाराजांपासून तीन पिढ्यांपर्यंतच्या राजकीय घडामोडी पाहिल्या होत्या व त्यांत प्रामुख्यानें भागही घेतला होता. यामुळें राजनीतीचे नियम सांगण्यास तो सर्वतोपरी अधिकारी होता. याचीं एकंदर नऊ प्रकरणें आहेत. त्यांपैकीं येथें पांचवें प्रकरण दिलें आहे.]

साहुकार म्हणजे राज्याची व राजेश्रीची शोभा. साहुकाराच्या योगानें राज्य अबादान[१] होतें. न मिळे त्या वस्तुजात[२] राज्यांत येतात. तें राज्य श्रीमंत होतें. पडलें सकटप्रसंगीं पाहिजे तें कर्जवाम[३] मिळतें तेणेंकरून आलें संकट परिहार होतें. साहुकाराचे सरक्षणामध्यें बहुत फायदा आहे. याकरितां साहुकाराचा बहुमान चालवावा. कोणविषयीं त्याजवर जलाल[४] अथवा त्याचा अपमान होऊं न द्यावा. पेठांत दुकानें, वखारा घालवून हत्ती, घोडे, जरमिना[५], पशमी[६] आदिकरून वस्त्रजात, रत्नें, शस्त्रें, आदिकरून अशेष वस्तुजात यांचा उदीम चालवावा. हुजूर[७] बाजारामध्यें हि थोर थोर साहुकार आणून ठेवावे. वर्षसंबधें तसेच लग्नादि महोत्साहीं हि त्यांचे त्यांचे योग्यतेनुरूप प्रतिष्ठेनें बोलावून आणून वस्त्रपात्र देऊन समाधान करीत जावें. परमुलखीं जे जे सावकार असतील त्यांचीं समाधानें करून आणावें. त्यास अनुकूल न पडे च तर असतील तेथें च त्यांचें समाधान रक्षून आपली माया लावून त्यांचे मुतालीक[८] आणवून त्यांस अनुकूल जागा

---

१ समृद्ध. २ वस्तुसंग्रह. ३ वाम–ऋण. ४ क्षोभ. ५ जरीचें वस्त्र (?). ६. लोंकरीचें वस्त्र. ७ मुख्य. ८ प्रतिनिधि.

दुकानें देऊन ठेवावे. तसेंच दर्यावर्दी सावकार यांस हि बंदरोबंदरीं कौल* पाठवून आमदरफ्ती[९] करावी. साहुकारामध्यें फिरंगी[१०] व इंग्रज व वलंदेज[११] व फराशीस व डिंगमारादि[१२] टोपीकर हे हि लोक साहुकारी करितात, परंतु ते वरकड सावकारासारखे नव्हेत. यांचे खावंद प्रत्येक प्रत्येक राज्य च करीत आहेत. त्यांचे हुकुमानें त्यांचे होत्साते हे लोक या प्रांतीं साहुकारीस येतात. राज्य करणारास स्थळलोभ नाहीं असें काय घडों पाहतें? तथापि टोपीकरास या प्रांतीं प्रवेश करावा, राज्य वाढवावें, स्वमतें प्रतिष्ठावीं हा पूर्णाभिमान. तदनुरूप स्थळोस्थळीं कृतकार्य हि जाले आहेत-त्यास ही हट्टी जात; हातास आलें स्थळ मेल्यानें सोडावयाचे नव्हेत. यांची आमदरफ्ती आले गेले इतकी च असू द्यावी. त्यास केवळ नेहमीं जागा कधीं हि देऊं नये. जंजिऱ्यासमीप[१३] तों या लोकांचें येणें जाणें सहसा होऊं देऊं नये. कदाचित् वखारीस जागा देणें जाली तर खाडीचे मोवारी[१४] समुद्रतीरीं न द्यावी. तसें च ठिकाणीं जागा दिल्यानें जोंपर्यंत आपले मर्यादेनें आहेत तों आहेत. नाहीं ते समयीं आरमार, तोफा, दारूगोळी हेंच त्यांचें बळ. आरमार पाठीशीं देऊन त्याचे बळें त्या बंदरीं नूतन किल्ला च निर्माण करणार. तेव्हां इतकें स्थळ राज्यांतून गेलें. याकरितां जागा देणें च तर लांब खाडी गांव दोन गांवें राजापुरी सारखी असेल तेथें फराशिसास जागा दिल्हा होता त्या न्यायें दोन च्यार नामांकित थोर शहरें असतील त्यामध्यें जागा द्यावा. तो असा कीं तीच जागा शहराचे अहारीं, शहराचा उपद्रव चुकवून नेमून देऊन वखारा घालाव्या. त्यास इमारतीचें घर बांधूं देऊं नये. या प्रकारें राहिले तर बरें. नाहीं तर याविणें प्रयोजन नाहीं. आले गेले असून त्यांचे वाटे आपण न जावें; आपले वाटे त्याणीं न जावें इतकें च पुरे. गनीमाचे मुलुखांतील—गनीमाचा मुलूख मारिले यामुळें अथवा दर्यावर्दीमुळें—साहुकार सांपडले तर अवसर पाहून त्यांशीं खंड[१५] करावा. खंडाचा वसूल घेणें तो हि त्यास राखून घ्यावा. खंड फारीक[१६] जाल्यावर थोडी बहुत त्यांशीं मेहेमानी[१७] करून बहुमानें त्यास त्यांचें स्थळास पाठवून द्यावें. गनीमाकडील सेवक लोकांस जें शासन आहे तें सावकार लोकांस उचित नाहीं.

*अभयवचन. ९ दळणवळण. १० पोर्तुगीज. ११ डच. १२ डॅनिश आदि करून. १३ पाण्यांतील किल्ला. १४ तोंडाशीं (?). १५ करार. १६ चुकता, पुरा. १७ आतिथ्य.

# ३३. रयतांनीं झाडें लेंकरासारखीं वाढविलीं

अमात्यकृत } { राजनीति

"आरमारास तक्ते, सोंट, डोलाच्या काठ्या आदिकरून थोर लांकडें असावीं लागतात. आपले राज्यांत अरण्यांत सागवानादि वृक्ष आहेत, त्यांचें जें अनुकूल पडेल[1] ते हुजूरचे परवानगीनें तोडून न्यावें. याविरहित जें लागेल तें परमुलुखींहून खरेदी करून आणवीत जावें. स्वराज्यांतील आंबे, फणस आदिकरून हेही लांकडें आरमाराच्या प्रयोजनाचीं[2]; परंतु त्यांस हात लावूं देऊं नये. काय म्हणोन कीं, झाडें वर्षा दोन वर्षांनीं होतात असें नाहीं. रयतांनीं हीं झाडें लावून लेंकरांसारखीं बहुत काळ जतन करून वाढविलीं. तीं झाडें तोडल्यावर त्यांचे दुःखास पारावार काय? एकास दुःख देऊन जें कार्य करीन म्हणेल तें कार्य करणारास हित स्वल्प काळचें बुडोन नाहींसेंच होतें, किंबहुना धनियाचे पदरीं प्रजापीडनाचा दोष पडतो. या वृक्षांच्या अभावें हानिही होत्ये. याकरितां हे गोष्टी सर्वथैव होऊं न द्यावी. कदाचित् एकादें जें झाड बहुत जीर्ण होऊन कामांतून गेलें असलें तरी त्याचे धन्यास राजी करून घेऊन द्रव्य देऊन त्याचे संतोषें तोडून न्यावें. बलात्कार सर्वथैव न करावा."

**अभ्यास** :—*या उताऱ्यावरून शिवकालीन जंगलखात्याचें धोरण या विषयावर सुचणारे विचार लिहा.*

---

१ जरूर पडेल ते. २ उपयोग.

# ३४. शिवकालीन प्रधानमंडळ



काव्येतिहाससंग्रह, पृ० ३ पत्र नं० २

शा० १५९६ ज्ये० व० १३ ता० २१-६-१६७३

[ राज्याच्या कामाची खातेवार वांटणी करावी हें तत्त्व शिवकालींही परिचित होतें. त्या काळास अनुसरून बहुतेक प्रधान सेनासंपन्न आहेत. या कागदावरून सर्व प्रधानांच्या कामाचा नीटसा बोध होत नाहीं. उदा०, सचीव व मंत्री यांच्या कामांतील भेद कळत नाहीं. तरी कामाची वांटणी करावी, पण अधिकारी परस्परावलंबी राहावेत व सर्वांनीं हुजूरआज्ञेंत चालावें हे सूत्र या व्यवस्थेंत दिसून येते ]

श्री

कानूजाबता राज्याभिषेक शके १ आनंद नाम संवत्सरे ज्येष्ठ वद्य १३ त्रयोदशी भोमवासरे.

मुख्य प्रधान यांणीं सर्व राजकार्य करावें. राजपत्रावर शिक्का करावा. सेना घेऊन युद्धप्रसंग व स्वारी करावी व तालुका ताबिनांत स्वाधीन होईल त्याचा रक्षून बंदोबस्त करून आज्ञेंत वर्तावें. सर्व सरदार सेना [यांणीं] याजबरोबर जावें. त्यांणीं सर्वांसमत चालावें. येणेंप्रमाणें मोर्तब कलम १.

अमात्य यांणीं सर्व राज्यांतील जमाखर्च चौकशी करून दप्तरदार, फडणीस [हे] यांचे स्वाधीन असावें. लिहिणें चौकशीनें आकारावें. फडणिसी, चिटणिसी पत्रांवर निशाण करावें. युद्धप्रसंग करावे. तालुका जतन करून आज्ञेंत चालावें. मोर्तब कलम १.

सचीव यांणीं राजपत्रें शोध करून अधिक उणें अक्षर मजकूर शुद्ध करावा. युद्धप्रसंग करून तालुका स्वाधीन होईल तो रक्षून आज्ञेंत वर्तावें. राजपत्रवरां चिन्ह संमत करावें. मोर्तब कलम १.

---

कानू—कायदा. जाबता—यादी. ताबिनांत—अंकित. समेत—बरोबर. **मोर्तब**—तयार (असा शिक्का मारणें). आकारणें—हिशेब करणें. **निशाण—चिन्ह.**

मंत्री यांणीं सर्व मंत्रविचार राज्यकारणें, यांतील सावधतेनें विचार करावें. आमंत्रण, वांकनिसी त्यांच्या स्वाधीन. तालुका जतन करून युद्धादि प्रसंग करावे. राजपत्रांवर संमत चिन्ह करावें. मोर्तब कलम १.

चिटणीस यांणीं सर्व राज्यांतील राजपत्रें लिहावीं. राजकारणपत्रें उत्तरें लिहावीं. सनदा, दानपत्रें वगैरे महालीं हुकुमी यांचा जाबता फडणिसी अलाहिदा त्याप्रमाणें लिहावीं. हातरोखे नाजूक पत्रें यांजवर मोर्तब अथवा खास दस्तक मात्र. वरकडांचा दाखलाचिन्ह नाही. चिटणीसांनींच करावें. मोर्तब कलम १.

किल्ले, कोट, ठाणीं, जंजिरे येथील कायदे करून दिले त्याप्रमाणें हवालदार, सुभेदार, कारखानीस, सबनीस, सरनोबत, तटसरनोबत लोक यांचे जाबते करून दिले त्याप्रमाणें चालून सावधतेनें स्थळें रक्षावीत. तगिरी बदली हुजूरून व्हावी. बेजमी नेमणूक तालुकेदार यांजकडे. दरवाजा, किल्या [ यांजवर ] हवालदार याचा हुकूम शिक्के त्याच्या नांवचे. कारखानिसी, सबनिसी, जाबता अलाहिदा असे. मोर्तब कलम १.

आठरा कारखान्यांचे अधिकारी यांणीं खासगीचे अधिकारी यांच्या इतल्यांत चालून दफतरीं हिशेब गुजरावे. मोर्तब कलम १.

आबदारखाना चिटणीस यांजकडे सरफखानासुद्धां अधिकार सांगितला. मजालसी विडे, अत्तरगुलाब व हारतुरे, फळफळावळ खुषबई खरेदी, जमाखर्च यांणीं करून हिशेब दफतरीं गुजरावा. मोर्तब कलम १.

पागा जुमलेदार, सरदार यांणीं कैद करून दिली त्याप्रमाणें चालून सेनापती व प्रधान यांच्या समागमें कामकाजें करावीं. मोर्तब कलम १.

सेनापती यांणीं सर्व सैन्य संरक्षण करून युद्धप्रसंग स्वारी करावी. तालुका स्वाधीन होईल तो रक्षून हिशेब रुजू करून आज्ञेनें वर्तावें. फौजेच्या लोकांचे बोलणें बोलावें. सर्व फौजेचे सरदार यांणीं त्यांजबरोबर चालावें. मोर्तब कलम १.

---

वांकनिसी—वृत्तान्तलेखनाचें काम. अलाहिदा—निराळा. दस्तक—परवाना. तगिरी—बदली, बडतर्फी. बेजमी—पुरवठा, बेगमी. सबनिसी—लष्करची जमा, हजेरी घेण्याचें काम. इतल्ला—लोभ, लक्ष. आबदारखाना—पिण्याचें पाणी सांठविण्याचें टाकें. सरफ—सर्फ, खर्च. मजालस—दरबार. खुषबई—खुशबु—सुगंधी वस्तु. जुमलेदार—शें-दीडशें पायदळ किंवा बारगीर तुकडीचा अधिकारी. रुजू—दाखल.

पंडितराव यांणीं सर्व धर्माधिकार, धर्म अधर्म, पाहून शिक्षा करावी. शिष्टांचे सत्कार करावे. आचार, व्यवहार, प्रायश्चित्त पत्रें होतील त्यांजवर संमत चिन्ह करावें. दानप्रसंग, शांति अनुष्ठान तात्काल करावें. मोर्तब कलम १.

न्यायाधीश यांणीं सर्व राज्यांतील न्याय, अन्याय मनास आणून बहुत धर्में करून न्याय करावे. न्यायाचीं निवाडपत्रें यांजवर संमत चिन्ह करावें. मोर्तब कलम १.

सुमंत यांणीं परराज्यांतील विचार करावा. त्यांचे वकील येतील त्यांचे सत्कार करावे. युद्धादि प्रसंग करावे. राजपत्रांवर संमत चिन्ह करावें. मोर्तब कलम १.

फौजेचे सबनीस बक्षी यांणीं सर्व फौजेची हजेरी चौकशी करावी. यादी करून समजवावें. रोजमुरा वाटणें, सत्कार करावा. युद्धादि प्रसंग करावा मोर्तब कलम १.

सेनाधुरंधर यांणीं बिनी करावी, आघाडीस जावें, फडफर्मास करावी, लूट करणें, मना करणें, चौकशी, ताकीद त्यांजकडे, पुढें असून सेना रक्षण करावी. मोर्तब कलम १.

सुभे मामले तालुकेदार, यांस ज्याजकडे जें नेमलें तें त्यांणीं जाबत्याप्रमाणें चालावें. हुजूरचे दरखदार चिटणीस, फडणीस, मुजूमदार यांच्या इतल्यानें चालून हिशेब गुजरावे. मोर्तब. कलम १.

बारा† महालाचे अधिकारी यांणीं आपापलें काम दुरुस्त राखून हिशेब आकारून दफतरांत गुजरावे. मोर्तब कलम १.

दरुणी महालाचें कामकाज दिवाण नेमून दिले त्यांणीं सर्व पाहून करावें. चिटणीस, फडणीस यांणीं आपलाले दरखाचे कागद लिहावे. त्यांजवर निशाण-चिन्ह दिवाणांनीं करून त्यास समजून मोर्तब समक्ष करावे. मोर्तब कलम १.

---

बक्षी–सैन्यांत पगार वांटणारा, उमेदवाराची शिफारस करून मनसब देवविणारा. बिनी–सैन्याची आघाडी ( शब्दशः नाक ). फडफर्मास–सरबराई, पुरवठा. दरख–सरकारी काम. दरखदार–सरकारी अधिकारी. दफतर –कचेरी. दरुणी महाल–अन्तःपुर, जनानखाना.

† बारा महाल–पोतें, कोठी, पागा, दरजी (शिंपी), टंकसाळ, सौदागिरी, इमारत, हवेली, पालखी, थट्टी (गोशाळा), चौबिना (लांकूडकाम), शेरी (गांवसीमेच्या बाहेरील बागाईत जमीन). महाल–खातें.

पोतनीस यांणीं पोते जमाखर्च लिहिणें करावें. नजरपेशकशी जमा करावी. पोतदार यांणीं पारख करावी. मोर्तब कलम १

अष्टप्रधान यांजकडे पेटे व तालुके व स्वारीस जाणें त्यांस दरखदार सर्व हुजूरच्या नांवें, त्यांच्या दाखल्यांनीं पत्रव्यवहार करावा. स्वारीस जावें त्यास मुतालिक करून दिले त्यांणीं सर्व व्यवहार चालवावा. हुजूर राहवें. मोर्तब कलम १

एकूण कलमे वीस. मोर्तब.

---

## ३५. संभाजीचें राज्यारोहण

| | |
|---|---|
| **पत्रसारसंग्रह भाग २ रा, नं० २२६५** | **श० १६०२ आषाढ शु० १० इ० १६८० जून २६** |

[ संभाजीच्या स्वभावाबद्दल बरीच महत्त्वाची माहिती या पत्रांत मिळेल. ]

राजापूर-सुरत

संभाजी आतां रायरीला गेला आहे. बक्षिसाच्या करितां त्याच्याकडे पुनः अर्ज करीत आहों. आतां राज्यांत व्यवस्था होऊन त्याला थोडा स्वस्थपणा असल्यामुळें बहुधा आमच्या अडचणी समजून घेण्यास त्याला वेळ होऊन अधिक अनुकूल उत्तर येण्याची आशा आहे.

**ता. १२ जुलै**—संभाजी रायरीला आहे. धाकट्या भावाला त्यानें दयेनें वागविलें. अण्णाजीचें डोकें कापलें नसून त्याचे फक्त साखळया ( बेडया )

---

पोतनीस—जमाखर्च लिहिणारा. पोते—तिजोरी. पेश्कश—नजराणा. नजर पेशकशी—नजराणा. पोतदारी—नाणें पारखण्याचें काम. मुतालिक—प्रतिनिधि, मुख्त्यार. हुजूर राहवें—हुजूरच्या आज्ञेंत राहावें.

घालून हाल चालविले आहेत; अशी चौलच्या सुभेदाराकडील एका लायख माणसाकडून माहिती कळली. देशांत स्थिरता येऊन संभाजी राजा झाल्याचें जाहीर झालें आहे. त्याच्याजवळ आतां २० हजार सैन्य तयार आहे. तो फार मेहनती आणि सावध आहे असें लोक बोलतात.

---

## ३६. समर्थांचें संभाजीस पत्र

इतिहासमंजरी } { पृ० ११२-११३

[ या पत्रावरून संभाजीच्या हातून प्रारंभीं कांहीं अविचारीपणाचीं कृत्यें घडलीं व त्या योगानें शिवकालीन मुत्सद्दी दुखावले गेले हें निर्विवाद आहे. ]

छत्रपती संभाजीस समर्थांनीं पाठविलेल्या पत्रांत या ओंव्या आहेत :—

**अखंड सावधान असावें । दुश्चित कदापि नसावें ।**
**तजवीज करीत बसावें । एकांत स्थळीं ॥ १ ॥**

**कांहीं उग्र स्थिति सोडावी । कांहीं सौम्यता धरावी ।**
**चिंता पराची लागावी । अंतर्यामीं ॥ २ ॥**

**मागील अपराध क्षमा करावे । कारभारी हातीं धरावे ।**
**सुखी करून सोडावे । कामाकडे ॥ ३ ॥**

**पाणवठी तुंब निघेना । तरी मग पाणी चालेना ।**
**तैसें जनाच्या मना । कळलें पाहिजे ॥ ४ ॥**

---

दुश्चित–चित्त ठिकाणीं नसणें, बेसावध राहणें. पराची–दुसऱ्याची, लोकांची. तुंब–तुंवलेलें, सांचलेलें पाणी. लोकांचीं मनें तुंबू देऊं नये. त्यांना काम द्यावें, असा भावार्थ.

जनाचा प्रवाह चालिला । म्हणजे कार्यभाग आटोपला ।
जन ठाईं ठाईं तुंबला । म्हणिजे तें खोटें ॥ ५ ॥

श्रेष्ठीं जें जें मेळविलें । त्यासाठीं भांडत बैसलें ।
तरी मग जाणावें फावलें । गलीमासी ॥ ६ ॥

ऐसें सहसा करूं नये । दोघे भांडितां तिसऱ्यासी जाये ।
धीर धरुनि महत्कार्यें । समजूनि करावे ॥ ७ ॥

आधीं च पडली धास्ती । मग कार्यभाग होय नास्ती ।
या कारणें समस्तीं । बुद्धि शोधावी ॥ ८ ॥

राजीं राखतां जग । मग कार्यभागाची लगबग ।
ऐसें जाणोनियां सांग । समाधान राखावें ॥ ९ ॥

सकळ लोक एक करावे । गलीम निवटुनि काढावें ।
येणें करितां कीर्ति धावें । दिगंतरीं ॥ १० ॥

आधीं गाजवावे तडाके । तरी मग भूमंडळ धाके ।
ऐसें न करितां धक्के । राज्यास होती ॥ ११ ॥

समय प्रसंग ओळखावा । राग निपटुनि काढावा ।
आला तरी कळों न द्यावा । जगामाजीं ॥ १२ ॥

राज्यामध्यें सकळ लोक । सलगी देऊनि करावे सेवक ।
लोकांचे मनामध्यें धाक । उपजों चि नये ॥ १३ ॥

बहुत लोक मेळवावे । एकविचारें भरावे ।
कष्ट करोनि घसरावें । म्लेंच्छावरी ॥ १४ ॥

आहे तितुकें जतन करावें । पुढें आधीक मेळवावें ।
महाराष्ट्र राज्य करावें । जिकडे तिकडे ॥ १५ ॥

---

श्रेष्ठीं—वडील माणसांनीं. गलीम—शत्रु. धास्ती—घाबरटपणा. नास्ती—नासून जाणें. लगबग—त्वरा; त्वरेनें कार्यभाग होतो, असा भावार्थ. सांग—संपूर्ण. निवटून—निपटून. तडाके—पराक्रम.

लोकीं हिंमत धरावी । शर्तीची तरवार करावी ।
चढती वाढती पदवी । पावाल येणें ॥ १६ ॥

शिवराजास आठवावें । जीवित तृणवत् मानावें ।
इहलोकीं परलोकीं रहावें । कीर्तिरूपें ॥ १७ ॥

शिवराजाचें आठवावें रूप । शिवराजाचा आठवावा साक्षेप ।
शिवरायाचा आठवावा प्रताप । भूमंडळीं ॥ १८ ॥

शिवरायाचें कैसें बोलणें । शिवरायाचें कैसें चालणें ।
शिवरायाची सलगी देणें । कैसीं असे ॥ १९ ॥

सकळ सुखाचा केला त्याग । करूनि साधिजे तो योग ।
राज्यसाधनाची लगबग । कैसी केली ॥ २० ॥

त्याहुनि करावें विशेष । तरी च म्हणवावें पुरुष ।
याउपरी आतां विशेष । काय लिहावें ॥ २१ ॥

**अभ्यास**:—या ग्रंथांत आलेले समर्थविषयक उतारे नं. १, ८, २२, २७ वाचा व समर्थांचें राजकीय कार्य यावर चिकित्सक निबंध लिहा.

---

शर्त—पराकाष्टा. साक्षेप—दीर्घोद्योग. सलगी देणें—विश्वासांत घेणें.

# ३७. कोणाशीं सख्य ठेवावें ?



पत्रसारसंग्रह भाग २ रा, नं० २३०० } { श० १६०२ मार्ग० व० १३ इ० १६८० डिसें० ८

## इंग्रजांपुढील प्रश्न

[ या पत्रावरून इंग्रजांचें मन कोणत्या बाजूला होतें याचा अंदाज काढतां येईल काय ? ]

सुरत–मुंबई

राजाच्या† हितसंबंधांना विरोध येईल अशा रीतीनें सिद्दीला आमच्याकडून मिळणारा आश्रय व मदत हीं राष्ट्रांच्या कायद्याप्रमाणें समर्थनीय ठरणार नाहींत, हें उघड आहे. परंतु हल्लींच्या परिस्थितींत आम्हांला तो नियम मोडावा लागणार हेंहि तितकेंच स्पष्ट आहे. कांहींहि केलें तरी दोघांपैकीं कोणाचा तरी अस्नेह पत्करल्याशिवाय गत्यंतर नाही. आणि दोघांपैकीं कोणाला राखावयाचें व कोणाला दुखवावयाचें हें ठरविणें फार दुर्घट आहे. परंतु आतां आपलीं गलबतें भरून पाठवावयाची वेळ आल्यामुळें त्यांना कोणाचाहि अडथळा होऊं नये म्हणून तुम्हांला खालील हुकूम देणें भाग पडत आहे.—

संभाजीकडून आलेल्या मनुष्याला त्याचें कामाचें महत्व व त्याचा दर्जा यांना शोभेल असें वागवावें. मात्र त्यानें बातमीदाराचें काम करूं नये अशाकरितां त्याच्यावर नजर ठेवावी परंतु त्याला गैरविश्वास न वाटेल याची खबरदारी घ्यावी. जरा त्याला लवकरच घालवितां आला तर बरें होईल असें आम्हांला वाटतें. तथापि त्याला दिरंगाईवर टोलवीत ठेवल्यानें सिद्दीशीं अगदींच भांडण होण्याचा प्रसंग येत नसेल तर तसाहि त्याला राखून ठेवल्यास चालेल.

---

† संभाजी.

# ३८. कलुशाचे शिक्क्याची सनद



पेशवेदप्तर नं० ३१ | पत्र नं० ४४, पृ० ३९ | तारीख २२-४-१६८५

[संभाजीचे कारकीर्दींत कलुशाचा अधिकार केवढा होता याचा अंदाज या पत्रानें होतो. मूळ पत्रांतील कांहीं भाग गाळला आहे. पत्रांत जेथें 'ऐसियास' असा शब्द येतो तेथपर्यंत सदरहू पत्र ज्या पत्राला उत्तर असतें त्या पत्राचा सारांश असतो. मोरो विठ्ठलास ४०० होनांचें इनाम शहाजी-शिवाजीपासून चालत असे. सारा कमी येवो वा अधिक येवो इनामाचे ४०० होन चुकावयाचे नाहींत अशी सनद होती. तिचा अंमल होईना, म्हणून सदरहू मोरो विठ्ठलांनीं हुजूरकडे विदित केलें. त्यावरून ती तक्रार दूर करण्यासाठी कलुशा पुणें प्रांताच्या सुभेदारास लिहीत आहे.]

श्री

राजश्री बावाजी तानदेऊ सुबेदार व कारकून
प्रांत पुणें गोसावी यांसि

छ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहपूर्वक कविकलश छंदोगामात्य आसीर्वाद सुा सन खमस समानीन आलफ मोरो विठल देशकुलकर्णी प्रांत मजकूर हुजूर येऊनु विदित केले ...... ऐसियासि माहाराजसाहेब यांचे कारकीर्दीस व राजश्री कैलासवासी स्वामी यांचे कारकीर्दीस देशमुख देशकुलकर्णी याचा हक व इनामती दुबाले करून इनामती खंडणीची मोईन होनु पा ४०० च्यारिसे निा देशमुख ३०५ तीनसे पांच व निा देशकुलकर्णी होनु पा ९५ पंच्याणवद येकूण होनु पा चारिसें घेत असेत हकाचे व इनामतीचे दस्त कमतर पडेल तो सदरहू च्यारिसें होनु जो हक व इनामत दस्त होईल

---

छ—चंद्र. दुबाले करून—दुमाले करून—परत हवालीं करून. मोईन—नेमणूक, पगार. पा—पैकीं. निा—निसबत, मार्फत. दस्त—पट्टी, सारा.

त्याजवरी वांटून दस्त मवाफिक इनामती खंडणीची बेरीज बैसेल ते देसमुखाचे निसबतीने देसमुखापासून घेत जावे. देशकुलकर्णी याचे निसबतीने जे बैसेल ते देशकुलकर्णी यापासून घेत जावी म्हणून राजाज्ञेची सनद आलाहिदा सादर आहे तेणेप्रमाणे चालवणे देसाई देशकुलकर्णी यांचा हक व इनामती दुमाला करून दिवाणांत इनामती खंडणीचो मोईन च्यारिसे होनु पा घेत आहेत. येखादे माहाराज[1] साहेबाचे आज्ञापत्र व राजश्री कैलास स्वामीची[2] आज्ञापत्रें असतील ते रुजू घालून हाली राजाज्ञेकडून सनद सादर आहे, तेणेप्रमाणे वर्तणूक करणे. जाणिजे रा छ २५ रबिलाखर. या पत्राची तालीक लिहून घेऊनु असल सनद देशकुलकर्णी मानइलेकडे परतोन देणे. जाणिजे पा हुजूर.

(पत्राचे मागील बाजूस)

रा छ ९ रजब सन सीत समानीन अलफ

| |
|---|
| विधिरर्थिमनीषीणा-<br>मवधीर्नयवर्त्मनां<br>शेवधिः कार्यसिद्धीनां<br>मुद्रा कलशहस्तगा |

---

मवाफिक–माफक प्रमाणें. १ शहाजी. २ शिवाजी. रुजू घालून–मान्य करून. रा–रवाना. तालीक–नक्कल. मानइलेकडे–मशारनिल्हेकडे. पा–परवानगी.

# ३९. फोंड्याची लढाई

शिवचरित्रसाहित्य खं० २ रा, नं० ३९७, पृ० ३९९ | श० १६०७ आषाढ शु० २ इ० स० १६८५ जून २३

[ मावळांत ' वेळवंड खोरे ' म्हणून खोरें आहे. खोरें म्हणजे डोंगराळ मुलुखांतील भाग. तेथील 'कंक' आडनांवाच्या वतनदाराचे कागदपत्र सांपडले त्यांतील हा एक. या योगानें संभाजीची पोर्तुगीजांशीं झालेली फोंड्याची लढाई अस्सल मराठी कागदानें उजेडांत आली. मयत बापाचें नांव कृष्णाजी व मुलाचें नांवही कृष्णाजीच आहे. मुलाच्या नांवें मुभा चालवून वडील चाहूजीस त्याचा कारभारी नेमलें, असें अनेक वेळां होई. पुढें कायदेशीर वारस व त्याचा अधिकारी यांत हमेशा वाद होई, व तो निर्विवाद निकालांत निघणें दुर्घट असे. ]

श्री

श्री* । शंभोः शिव । जातस्य मुद्रा द्यौ । रिव राजते ।। यदं । क सेविनो लेखा । वर्तते कस्यनो । परि ।

(सात ओळींचा पंचदश दली किंवा बहुबुर्जी शिक्का)

श्री† ।। शभुनर पतिहर्ष
निदान मोरेश्वर सुत-
नीलकंठ मुख्य प्रधान

पत्रवतन कृष्णाजी कंक पदाती नायेक सेवक राज्यमंडल शके १२ क्रोधन-नाम संवत्सरे आषाढ शुध द्वितीया भोमवासर मानिलेचा बाप कृष्णाजी बिन येसजी कंक यास हशमाची हजारी होती. त्यावरी फोडियाच्या कोटास

* शिक्क्यांत ओळ संपली असें दाखविण्यासाठीं शब्द तोडले आहेत. पंचदशदली याचा अर्थ पंधरा पाकळ्यांचा. बहुबुर्जी—अनेक कोनांचा.

† या शिक्क्यांत अशुद्धें आहेत :—शभु—शंभु. निदान—निधान.

पदाती—पायदळ. मानिले—मशारनिल्हे, वर सांगितलेला. हशम—शिपाई, प्यादे. हजारी—हजार सैनिक बाळगण्याची मन्सब.

फिरंगियानी लगट केला. तेव्हा राजश्री स्वामि राजापुरीहून स्वार होऊन फोडियासि (गे) ले ते वख्ती खाडीवरी गनिमासीं गांठीं घालून जुंझ बहुतच केले ते वख्ती जखमा लागोन जरतुर जाला म्हणोन घरास जावया आज्ञा दिल्ही. घरास आलियावरी जखमा फुटोन मयत जाला त्याचा लेक मानिले त्याचे नांव कृष्णाजीच ठेविले आहे. तीन वरसाचा मूळ आहे. त्याच्या नावे सुभा चालवावा आणि लोकाच्या जमावास चाहुजी कंक आहे त्यास कारभारी करून ठेवावा म्हणोन येसजी कंक याणि विनंती केली त्यावरून स्वामि कृपालु होऊन कृष्णाजी कंक स्वामिकार्यावरी पडला याकरितां याच्या लेकास सुभा दिल्हा आणि लोकाचा जमाव करावा हमेशा चाकरीवरी आसिले पाहिजे म्हणोन चाहुजी कंक शंभर मावलियांत होता तो माकुल पाहोन कारभार चालवावयासि दिल्हा.

---

# ४०. भ्रष्ट ब्राह्मणाची प्रायश्चित्त-शुद्धि

| | |
|---|---|
| **राजवाडे खंड ८ लें० ४०** | **श० १६०८ चैत्र शु० २** |

श्रीमहालक्ष्मै नमः

॥ श्रीसकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री देशमुख देशपांडे व ज्योतिषी व उपाध्ये व समस्त वेदमूर्ती वस्ती कसबे हरसूल प्रांत औरंगाबाद व समस्त महाराष्ट्र कोंकण देशस्थ विद्वद्वैदिक गृहस्थ गोसावी यांसी :—

पौण्य उपाध्ये व मोरेश्वर पंडितराव आशीर्वाद अनुक्रमें नमस्कार. उपरि. गंगाधर रंगनाथ कुळकरणी कसबे हरसूल हा ब्राह्मण मोंगलापासी सेवेसी

---

वख्ती—वेळीं. जरतुर—जखमी. मूळ—मूल. हमेशा—नेहमीं. माकुल—शाहणा.

होता. कित्येक दिवस चाकरी करीत असतां मोंगली† यावरी बलात्कार करून बाटविला. भ्रष्ट करून यांस तीन महिने बंदखानी निर्बंध ठेविला होता. तेथें यवनासी अन्नोदक संसर्ग घडला. त्यानंतर यास भाग्य अडीच सद्दी मनसब देऊन चाकर करून ठेविला. पांच वर्षे चाकरी करीत होता. स्नानसंध्यादिक कर्मे करितां न ये यास्तव राहिले. पांच वर्षांत अन्नोदक संसर्ग केला नाहीं. दौलत करीत असतां भाग्याचें सुख टाकून, अंतःकरणीं अनुताप मानून आपले जातींत यावें यास्तव दौलत संपत्ती सर्व टाकून, अनुतापास्तव राजश्री छत्रपती स्वामीपाशी रायगडास येऊन एक वर्ष गंगाधर रंगनाथ "दरबारीं आपणास प्रायश्चित्त द्या" म्हणऊन सरकारकून व न्यायाधीश व उपाध्ये व दानाध्यक्ष व भलेभले व ब्राह्मण व समस्त आपले ज्ञातीस शरण येऊन प्रायश्चित्त मागत होता. त्या उपरि राजश्री समस्तराजकार्यधुरंधर वर्णाश्रमधर्मप्रतिपालक राजश्री छंदोगामात्य¹ स्वामी यास सर्व वर्तमान विदित जाले. त्यानंतर त्याहीं ब्राह्मणाचें कष्ट व अनुताप बहुत देखोनी राजश्री छत्रपती स्वामीस याचा वृत्तान्त विदित केला. छत्रपती कृपाळु होऊन प्रायश्चित्त द्यावयासी आज्ञा दिल्ही. त्या उपरि आम्हीं राजश्री छंदोगामात्य यांचे सभेसी समस्त विद्वद्वैदिक ब्राह्मणांचे समतीने मिताक्षरादि निबंध पाहोन, प्रायश्चित्त निर्वाह² करून गंगाधर रंगनाथ यासी प्रायश्चित्त संकल्प सांगोन श्रीयात्रेस पाठविला... यथाशास्त्र प्रायश्चित्त विध्युक्त प्रकारे केलें....त्यावरून आम्हीं आपले पंक्तीस भोजन देऊन यासी शुद्धिपत्र दिलें. हा ब्राह्मण शुद्ध जाला, संव्यवहार्य³ जाहला ....जो कोणी याचा ब्राह्मण्याविषयीं संदेह मानील तो देवब्राह्मण द्रोही, महापातकी जाणिजे. शके १६०८ सोळा शतें आठ क्षय संवत्सर चैत्र शुद्ध द्वितीया भौमवार हे विज्ञप्ति* मोर्तब.

---

† मोगलांनीं. सद्दी—शें. अडीचशें स्वारांची नेमणूक मिळाली असा अर्थ

१ कलुशाची पदवी. २ निर्णय. ३ व्यवहार करण्यालायक.

* याखालीं मोरेश्वर पंडितराय, कविकलश, वैदिक व प्रल्हाद निराजी वगैरे पंचवीस सह्या आहेत.

# ४१. संभाजीच्या कारकीर्दींतील महत्त्वाचीं टिपणें

शिवचरित्रप्रदीप, पृ० ३१ } { जेधे शकावली

## अकबराचें दक्षिणेंत आगमन

[जेधे शकावलीत संभाजीच्या कारकीर्दीसंबंधी जे त्रोटक उल्लेख आहेत त्यांवर अधिक माहिती मिळाली पाहिजे. उदाहरणार्थ, हरजी माहाडीक याची स्वारी कर्नाटकांत तिरुवन्नमलईपर्यंत गेली होती, तिचें काय झालें? 'कविकलश व सिरखे (शिर्के)' पारखे झाले म्हणजे भांडले. या भांडणाचें कारण काय? या शिर्के-कलुशा-भांडणांतूनच अखेर संभाजीवर दुर्धर प्रसंग उद्‌भवला काय?

जेधे शकावलीची भाषा मराठमोळ्याची बोली आहे. यांतील अनेक अपरिचित शब्द खेड्यांतील मराठ्यांशी बोलण्याचा सराव असल्यास कळतील.]

चैत्रमासी हरजी राजे माहाडीक व शामजी नाईक यांस संभाजी राजे याणी बा। जईतजी कांटकर व वादजी कांडे हे फौज देऊन कर्णाटकांत रवाना केली १

ज्येष्ट मासी सुलतान अकबर शाहा जाला औरंगजेबावर यागी होऊन त्रिंबकास आले त्यास संभाजी राजे याणी कोकणात पालीस ठाव दिल्हा १

कार्तिक शुध १३ रविवारी पातशाहापुरीं[१] संभाजी राजे यांची व अकबरांची भेटी जाली अगदी सेना समुदाये लष्कर व इशाम देखील समागमे होते अकबरा समागमें दुर्गादास[२] होता बहुत सन्मान केला तेच मासी अजमशाहा औरंगाबादेस आला पौष मासी क्षय संवछरामध्यें औरंगजेब ब-हाणपुरास आला माघ मासी हसन अलीखान कल्याण भिवडी जाळून फिरोन गेला १

---

बा।—बरोबर, सहित. यागी—कष्टी. ठाव—आश्रय. जाला—झाला, अकबर शाहा झाला, स्वतंत्र झाला. १ हें ठिकाण कोठें आहे? २ हा राजपुतांचा सरदार.

भाद्रपद मासीं सभाजी राजे याणी कवि कलशाचा बोले मागती आणाजी दतो सचीव यांजवर ईतराजी करून मार दिल्हा त्या माराने राजश्री आनाजीपंत व बाळप्रभु व सोमाजी दतो व हिराजी फर्जेद परळीखाले कैद करून मारिले कर्णाटकांत शामजी नाईक यास कैईद करविले १

---

# ४२. औरंगजेबाची विजापूर-गोवळकोंड्यावर स्वारी

**शिवचरित्रप्रदीप, पृ० ३३** } { **जेधे शकावली**

शके १६०८ क्षये नाम संवछरे आशाढ मासीं अवरंगजब सोळापुरीहून येऊन विजापुरासी लगट केला

अश्वीन सुध ७ सोमवारी विजापूर अवरंगजबे घेतले सुलतान सिकिंदर भेटला यासी नदरबंद केले सरजाखान व बहलोलखानाचा लेक यासी पंच हजारी दिल्ही १

केसो त्रिमल कार्तीक मासी करनाटकात रवाना केले माघ मासी कुतुबशाहा बसबपटण अदी करून भागानगर अवरंगजबास दिल्ही कासिमखानाचे विद्यमाने तेच मासी अवरंगजब भागानगरास येऊन वेढा घातला करनाटकात व देशात दुकाल पडिला फाल्गुण मासी अकबर जाहजात बैसोन विरानात गेला १

चैत्र[1] मासी मिरज मोगली घेतली केसोपंत फाल्गुण सुध १० करनाटकात गेले १

---

बोले—बोलण्यावरून, सांगीवरून. लगट—हल्ला. नदरबंद—कैद. विरानात—इराणांत. १ हा चैत्र श. १६०९ चा असावा.

# ४३. संभाजीस अटक व त्याचा वध

शिवचरित्रप्रदीप, पृ० ३४ } { जेधे शकावली

शके १६१० विभव सवछरे

चैत्र सुध प्रतिपदा हरजी माहडीक त्रिणामलीहून कचीवर गेले १

अश्वीन मासी विजापुरास माहामारी आली १

कार्तीक मासी कवि कलश याजवरी सिरके पारखे जाले १

कलश पळोन खिलणियांवर गेला तेच मासी सभाजी राजे रायेगडाहून कलशाचे मदतीस आले संगमेस्वरी सिरकियांसी युध्य करून त्यास पलऊन खलणियास आले १

मार्गसीर्प मासी संभाजी राजे यांणी कलशाच्या बोले प्रल्हादपंत व सर कारकून व कितेक लोकास धरिले तेच मासी औरंगजेब विजापुरीहून तुलापुर नजीक भीमातीर येथ आले १

माघ वद्य ७ शुक्रवासरी संभाजी राजे व कविकलश रायेगडास जावयास संगमेस्वरास अले असता सेक निजाम दौड करून येऊन उभयेतांस जीवतच धरून नेले वरकड लोक रायेगडास गेले १

फालगुन शुध ३ राजारामास रायेगडचा किलेदार चांगोजी काटकर व येसजी कंक यांणी माघ वद्य ३० अदबखानाहून काडून बाहेर आणून मंचकी बैसविले मानाजी मोरे व वरकड सरकारकून धरिले होते ते सोडिले ज्यांचें कायेभाग त्यासी देऊन राजाराम राज्य करू लागले येसाजी व मिदोजी फर्जंद यास कडेलोट केले १

फालगुण वद्य १३ त्रयोदसी हरजी माहडीक यांणी केसो त्रिमल यांस संभाजी राजे याचे विपरीत वर्तमान येकोन त्रिणामली धरिलें १

---

खिलणिया–खेळणा. त्रिणामली–तिरुवन्न मलई. कची–कांची, कांजीवरम्. समगे–मिळून अदबखानाहून–कैदेंतून. फर्जंद–पुत्र, दासीपुत्र.

फाल्गुण वद्य ३० अवरंगजेब तुळापुरी संभाजी राजे व कवि कलश यास जिवे मारून सिरछेद केले १

---

**इ. स. १६८९–१७०७ हीं अठरा वर्षे मराठ्यांच्या इतिहासांतील अत्यंत मोठ्या संकटाचीं पण तितकींच मराठ्यांचें उज्ज्वल स्वरूप दाखविणारीं, हुरूपाचीं, धैर्याचीं, व स्फूर्तिदायक अशीं आहेत. या विभागांतील अस्सल पत्रांतून ' अस्मान कडाडलें तरी डगमगणार नाहीं ' ही वृत्ति स्पष्टपणें दिसून येते.**

## ४४. मऱ्हाट राज्याबद्दल मराठ्यांचा हुरूप

राजवाडे खंड १५, लें० ३४७ | इ० स० १६९० श० १६१२ चैत्र व० ८

[ राजाराम कर्नाटकाकडे गेल्यावर पुणें ते तुंगभद्रा या प्रदेशांत सर्वत्र अवधान राखावें लागत असे. अशा वेळी आपल्याकडे आलेल्या सरदारास उत्तेजन व इनामाचें आश्वासन देऊन राखून ठेवणें व त्यास कार्यप्रवृत्त करणें अशीं कामें चालू होती. ]

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके १६ प्रमोद नाम संवत्सरे चैत्र बहुल अष्टमी मंदवासरे राजमान्य राजश्री बाजी सर्जाराऊ जेधे देशमुख यासि राजाआज्ञा (अभय दिल्हे) ऐसी जे मा रतनोजी सिंदे व शंकराजी ढगा याजबराबरी कितेक एकनिष्टपणाचा गोस्टी सांगोन पाठविल्या. सांगितल्याप्रमाणें विदित जालें. ऐसियासि हे मऱ्हाट राज्य आहे. तुम्ही लोक या राज्याची पोटतिडीक

---

बहुल–वद्य. मा–मशारूल (प्रसिद्ध, राजश्री). पोटतिडीक–काळजी.

धरितां तरि ते प्रांते कितेक राजकारणें आहे ते चालणा करून + + ण जमाव करून सावधानपणें राहोन स्वामीकार्य जे दृष्टीस पडेल तें मनांत आणून हस्तगत करून ठेवणें. हुजूर लेहोन पाठविणें. तेणेंप्रमाणें हुजूरून विल्हे केली जाईल. या प्रांतीचें वर्तमान तरी राजश्री छत्रपति स्वामी स्वारी करून कर्नाटक प्रांतें गेलियावरी तिकडे जमाव लस्कर चाळीस हजार व हशम एक लाख पंचवीस हजार जमाव जाला आहे. पुढें हि आणखी जमाव होतच आहे. ते प्रांतीं कुल पुंड पाळेगार तमाम एऊन भेटले आहेती. जमेती पोख्ती जाली आहे. तुर्त पुढे राजश्री केसो त्रिमळ या प्रांतें रवाना केले आहेती. या बरोबर संगिनात स्वार पंधरा हजार व हशम पंचवीस हजार देऊन रवाना केले आहेती. ते हि कादळ प्रांते तुगभद्रेच्या तीरास आले आहेत. खजाना हि एक लाख होनु या बराबरी आहे. त्यास आणावयास राजश्री धनाजी जाधव व संताजी घोरपडे सेनापंचसहस्त्री पाठविले आहेती. ते हि आठा पंधरा दिवसीं एतील. ते आलियावरी तो जमाव व हुजूरचा जमाव ऐसे करून त्या प्रांतें स्वारी होईल. तरी हें पत्र तुम्हास सादर केलें असे. तेणेंप्रमाणें जमावानसी सावध असणें. त्या प्रांते आलियावरी तुमची हि सरंजामी एथें मा॥ रतनोजी सिंदे व शंकरजी ढगे एही रदबदल केली त्याप्रमाणें चालऊन बिता॥

| तैनाती सालीना होनु | | गांव | |
|---|---|---|---|
| ५००८० | खासा | ४ | इसाती |
| ५०० | मताजी जेधे | २ | वेतनांत गांव |
| १०००८० | | ६ | |

सदरहु प्रमाणें हजार होनु तैनाती व गांव इसाती व मुकासे मिळोन सा

---

विल्हे—व्यवस्था. हशम—शिपाई. कुल—सर्व. पुंड—स्वतंत्र वृत्तीचे पाळेगार—छोटे संस्थानिक, कर्नाटकांतील मूळ हिंदु राजांचे वंशज. तमाम—सर्व. जमेती—जमाव. पोख्ती—मोठा, पोक्त. संगिनात—संगिनी घेतलेले. सेनापंचसहस्त्री—पांच हजारी स्वारांचे मुख्य. रदबदल—शिफारस. चालऊन—चालवू. बिता॥—बितपशील, त्याचा तपशील येणेप्रमाणें. तैनाती—पगार. खासा—खुद्दास (म्हणजे सर्जाराऊ यास). इसाती (इसाफती)—इनाम गांव. वेतनांत गांव—वेतन म्हणून गांवचें उत्पन्न. मुकासा—सरकारी वसूल करून बंदोबस्त राखावा या अटीवर अधिकार चालविण्यासाठीं दिलेलें गांव. सा—सहा.

गांव कार्यभाग जालीया देऊन. तरी तुम्ही आपली खातरनिशा राखोन स्वामीच्या पायासी एकनिस्टता धरून स्वामिकार्य साध्य होए ते गोस्टी करणें गनीमाचा हिसाब काय आहे ? तुम्ही लोक जेव्हां मनावरी धरितां तेव्हां गनीम तो काय आहे ? गनीमसा तुम्ही लोकीं केला आहे. ते तुम्हीच लोक या राज्याची पोटतिडीक धरितां तेव्हां औरंगजेबाचा हिसाब धरीत नाहीं ऐसें बरें समजोन लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें. व औरंगजेबानें मऱ्हाटे लोक आहेती त्यास मुसलमान करावे ऐसे केले आहे. त्यापैकीं मुसलमान केले मा॥ नेतोजी राजे व साबाजी घाटगे व जानोजी राजे व कित्येक ब्राह्मण हि ए प्रांतींचे वाटविले पुढें हि तलबा गेला आहेती. तिकडून तमाम मऱ्हाटे लोक होते ते आपला जमावानसी आम्हाकडे एताती. हालीं रा। हाणवंतराऊ निंबाळकर व सटवोजी निंबाळकर बाजे सरदार आले आहेती. पुढें हि कितेक एताती. ऐसे गनीमाचे लश्कर उटोन हुजूर जमाव होत आहे. ईस्वर करितो तरी फते च आहे. लिहिले प्रमाणें हिमती धरणें. जाणिजे छ २० जमादिलाखर सु॥ तिसैन अलफ. आज्ञा प्रमाण.

---

# ४५. राजारामाच्या हालचाली

| शिवचरित्रप्रदीप, पृ० ४८ | जेधे करीना |
| --- | --- |

राजश्री राजाराम रायेगडी अटकेत होते ते बाहेर काढून मंचकावरी बैसऊन राज्याभिषेक केला शके १६११ शुक्ल सवछरी जुलपुकारास रवाना केले राजश्री राजाराम निघोन रायगडीहून प्रतापगडास आले दुस्काल बहुत पडिला चैत्र

देऊन—देऊं. खातरनिशा—खातरी. हिसाब—प्रतिष्ठा. मा॥—मशरुल, राजश्री. तलबा—बोलावणें. रा॥—राजश्री. बाजे—वरकड. जुलपुकारास—झुल्फिकारखानास.

मासी शुध १५ पौर्णिमेस जुल्पुकारखान नाव इतकादखान होते ते रायेगडास वेढा घालून बैसले राजश्री राजाराम निघोन मजल दरमजल कर्नाटकात चंदीस गेले मार्गशीर्ष शुध २ रविवारी रायेगड मोगलास दिल्हा राजश्री संभाजी राजे याचे पुत्र राजश्री सिवाजी राजे यांस तुलापुरास नेऊन पातशाहास भेटविले पातशाहा मेहरवान होऊन हफ्त हजारी सांगितली नाव शाहुराजे† नाव ठेविले आणि आपल्या संनिध जालीमध्ये ठेविले त्यावरी किले गनी-माने घेतले सर्जाराऊ जेध व त्याचे भाऊ देखील राजमाचीहून निरोप घेऊन वतनावरी आले.*

---

## ४६. रायगडाहून जिंजीकडे

स्थिरबुद्धि राजाराम, पृ० २५ } { मराठी रिसायत

[ राजारामचरित या काव्याचा लेखक 'केशव दामोदर पुरोहित, संगमेश्वर तालुक्यात पुन्यें नांवाचा गांव साखरप्यास लागून आहे तेथचा राहणारा, शिवाजीजवळ रामायण-महाभारतादि ग्रंथांचें पुराण सांगत असे. पुढें संभाजी व राजाराम यांनीं त्यास दानाध्यक्षाचे काम दिलें. ता. ४–१–१६९० रोजीं त्यानें राजारामचरित हा ग्रंथ पुरा केल्याचें तो लिहितो. यानंतर लौकरच तो वारला असावा.' (स्थिरबुद्धि राजाराम, पृ. २७ टीप).

राजारामादि मंडळी जिंजीकडे जातांना सन्याशाच्या वगैरे वेषानें गेलं असें आजपर्यंत बखरींत व कादंबऱ्यांतून वर्णन येई, पण या समकालीन काव्यांतही त्याचा उल्लेख आहे हें विशेष आहे. ]

---

चंदी–जिजी. हफ्त–सात. † अर्थात् हें नांव औरंगजेबानें त्यास दिलें हें सिद्ध. जाली–जाळी, नजरकैद (?). *येथें हा करीना संपलेला आहे, यावरून तो या सुमारास लिहिलेला असण्याचा संभव.

अग्रे सेनापतिः पश्चान्मार्नसिंघो[1]ऽरिमर्दनः ।
सत्यप्रतिज्ञः प्रल्हादः[2] नृपसेवाविशारदः ।
तद्धस्तकोऽनंतसुतः कृष्णशर्मा[3] महामतिः ।
तथा प्रधानः सुमतिर्नीलकंठश्च सानुजः ।
कृष्णात्मजो नीलकंठः[4] महीपालहिते रतः ।
खंडोबल्लाळमुख्याश्च कायस्थाश्चित्रगुप्तजाः[5] ।
बाजीकदमनामाथ खंडोजीकोदमस्तथा ।
एते चान्ये च तं भूपमनुजग्मुः पुरंदरं[6] ।
सर्वे तुरंगमारूढाः प्रलपंतः परस्परं ।
ततः श्रीरामसेवायै भैरजीकः[7] समागमत् ।
युतो मल्लजिता[8] भ्रात्रा वरघोरपडान्वयः[9] ।
भवशालो[10] रूपसिंहः स्वसैन्येन समन्वितः ।
जगत्स्थापक[11]संताजिर्धीरो वीरबलाधिकः ।
केचित्कार्पटिका[12] वेषा दीनवेष[13] धराः परे ।
मुनिवेषधराश्चान्ये वैश्यवेष[14] धरास्तथा ।
म्लेंच्छकासीमसेनायां स्वसीमामत्यजन्नृपः[15] ।
अंबूर[16] नगरस्यायं देवालयमुपाययौ ।
नारायणसुते श्रीमच्छंकरे लोकशंकरे ।
राज्यैकदेशं निदधे[17] कारि दुर्गसमाश्रयं[18] ।

---

१ हा मार्नासग कोण? २ प्रल्हाद निराजी. ३ कृष्णाजी अनंत. हा सभासदी बखरीचा कर्ता असेल काय? ४ नीळकंठ कृष्ण. हें व अशीं बरीच नावे समकालीनांच्या परिचयाची असली तरी आतां विस्मृतिप्राय आहेत. ५ चित्रगुप्त म्हणजे 'चित्रे' आडनांवाचा असा अर्थ. ६ पुरंदर म्हणजे किल्ला. त्या नांवाचा किल्ला नव्हे. ७ बहिर्जी. ८ मालोजी. ९ घोरपडे या श्रेष्ठ वंशांतील. १० भोसले. ११ जगताप (?). प्रसिद्ध संताजीचें आडनांव घोरपडे होतें. १२ कार्पटिक–कापडी, संन्याशाचा एक प्रकार. १३ गरीबाचा वेष धारण करून. १४ व्यापाऱ्याचा वेष. १५ आपल्या राज्याची सीमा सोडून कासीमच्या सेनेंतून राजाराम पुढें चालला. १६ उत्तर अर्काट जिल्ह्यांतील शहराचें नांव. १७ शंकराजी नारायणाच्या ताब्यांत राज्याचा एक भाग दिला. १८ कारीचा किल्ला (कोठें आहे?).

रामचंद्रे[19] तु सकलं राज्यं विन्यस्य गूढधीः ।
तस्य हस्ते धनाजीकं संताजीकं च शंकरं ।
अश्वसेनाधिपान्सर्वान् तथा पत्ति[20]गणाधिपान् ।।

—'राजारामचरितम्' केशव पुरोहितकृत

---

# ४७. राज्यरक्षणाची विभागणी

## सचिवाचा जाहीरनामा

भारत इतिहास संशोधक मंडळ त्रैमासिक व० ९ अं० ४ पृ० ६६

श० १६१२ पौष शु० २
इ० २२-१२-१६९०

[ संभाजीच्या वधानंतर तात्पुरती घडी बसविण्याचा हा यत्न आहे. रायगड ते गोकर्ण ही कोंकणपट्टी रामचंद्रपंताकडे व सातारा ते मुलूख काबीज होईल तो देश शंकराजी नारायणाकडे अशी व्यवस्था केली. संताजीस रामचंद्रपंताकडे दिलें; धनाजीस शंकराजीकडे दिलें. यांसंबंधींचीं जाहीरपत्रें ठिकठिकाणच्या देशमुख देशकुळकर्ण्यांकडे माहितीसाठीं रवाना होत आहेत. ]

श्रीशंकर

छ मा। अनाम देशमुख व देशपाडीये पा। खटांऊ यासि शंकराजी नारायेण सचीव सुहूर सन इहिदे तिसैन अ (लफ) + + (वर) घाट पटी सातार्‍यापासून.........पावेतो व पुढे जेथ पर्यंत ×××× स्वामीच्या पुण्यप्रभावें-करून देश व दुर्गे कबज होतील तेथ पर्यंत राजश्री स्वामीने आमच्या स्वाधीन

---

१९ रामचंद्रपंत अमात्य. २० पायदळाचे मुख्य. मा।-मशरूल-प्रसिद्ध. अनाम-सर्व लोक. पा।-परगणे. पटी-पट्टी, जमिनीचा भाग.

## शंकराजी नारायण सचिव यांचे हस्ताक्षर

(पत्राचा काळ इ० स० १७०३)

श्री

श्री
शंकराजी
नारायण

।। छ मा। अनाम देशमुख व देशकु
लकर्णी ता। उत्रोली ना। रोहिडखोरे
यास शंकराजी नारायण सचीव
सुहूर सन आर्बा मया अलफ चिमणा
जी थोपटे याचा बाप सिदोजी
थोपटे यास माची पदमावती
किले राजगड येथील सदर सरनोबती
होती त्यास औरंगजेब पादशाहा
राजगडास वेढा घालून बैसला
होता ते प्रसंगी वेढियात याणी
कष्ट मेहनती केली पातशाही मोर
चा सुवेळच्या बरश्यास होता
तेथे सुलतानढवा[1] जाला आणि
बरसा घेतला ते समई याणी यु
ध्य शर्तीनसी केले त्या युध्यास
ध्ये भांड्याचा[2] गोळा लागोन जा
(गाच ठार जाले......इ०)[3]

१ एकदम चालून जाणें. २ तोफेचा. ३ कंसांतील मजकूर ब्लॉकमध्यें नाहीं.

राज्यभार केलाच आहे. सांप्रत राजश्री स्वामी कृपाळू होऊन आह्मास सुरनिशीचा कार्येभाग सांगितला रायेगडापासून कोंकणपट्टीही स्वाधीन केली सनदा व वस्त्रे व अलंकारभूषणें रा म्हालोजी काशीद राजसेवक व संताजी पडवल यांबा पाठविली राजश्री रामचंद्रपंतास मजमूचा कार्यभाग सांगोन त्याच्या स्वाधीन करहाडापासून पलीकडे वरघाट (रा)येगडापासून अलीकडील कोकण ×× गोकर्णपावेतो केली त्यांच्या ×× सनदा व पत्रे व अलंकारभूषणें या उभयेताबा पाठविली लस्कर दुतर्फा वांटून दिल्हे रा धनाजी जाधव यांणी आम्हाकडे असावे रा संताजी घोरपडे यांणी रा रामचद्रपंताकडे आसावे ऐसा तह केला असें हे वर्तमान तुम्हां वतनदारास कलावें याकरितां लिहिले असे याउपरी यामागे तुम्ही मनास माने त्याच्या हुकमाप्रमाणे राहाटी करीत होतेस व टकापैकाही भलत्यासच देत होतेस तैसेच आतांही करावया कारणे लागाल तरी हे गोष्ट × × × याउपरी रुजू पडणार नाही हुजूरच्या हुकमांखेरीज वर्तणूक केलियास तुमचे बरे होणार नाही टकापैका घ्याल तो गैरमजुरा निघेल हें बरें समजोन हुजूराच्या हुकमाप्रमाणें राहाटी करीत जाणें जाणिजे छ २० (३०) रालौवल पा हुजूर.

कागदावर
श्री
शंकराजी
नारायण
( अष्टदली शिक्का )

सुरू सुद
(मो.) पत्रा वधिरयं भाति

---

मुरनिशी—सनदा वगैरे नोंदवून शिक्का मारण्याचें काम. रा—राजश्री. यांबा—यांबरोबर. मजमू—वसुलीचें काम. दुतर्फा—दोहों बाजूंस. रहाटी करणे—वागणें. टकापैका—वसूल, खंडणी वगैरे. रुजू—मान्य. गैरमजुरा—गैरमंजूर. बरे—पक्के. रालौवल—रबिलावल. पा—परवानगी. सुद—झाले. मो—मोर्तब. पत्रा वधिरयं भाति—हा पत्राचा शेवट वाटतो.

# ४८. संताजीस देशमुखीचें वतन

काव्येतिहाससंग्रह, पृ० ६ ले० ४ | श० १६१४ श्रावण व० ११ ता० २९ जुलै १६९२

श्री

तालीक फरिस्त नं. १३

राजश्री संताजी घोरपडे गोसांवि यांस

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित रामचंद्र नीळकंट अमात्य आशीर्वाद सुरुसन सल्लास तिस्सैन मय्या' व अल्लफ. राजश्री छत्रपति स्वामी कर्नाटकांत जातेसमयीं तुम्हांस या प्रांतांत टेऊन गेले त्यासमयी इकडे गलिमाची धामधूम बहुत होऊन कुल देशदुर्ग हस्तगत केलीं होतीं तीं गेलीं. राज्यामध्यें कांही अर्थ उरला नाहीं. कुल् मराटे यांणीं इमान खत्ता करून गलिमाकडे गेले परंतु तुम्ही इमान खत्ता न करतां राजश्रीच्या पायाशी बहुतच एकनिष्ठा धरून जमाव करून शेख निजाम व सर्जाखान व रणमस्त-खान व जानसरखान असे उमदे वजीर बुडविले. जागोजाग गलीमास कोट घालून नेस्तनाबूद केलें आणि देश सोडविला. राज्य संरक्षणाच्या प्रसगास असाधारण श्रम केले, अवरंगजबास दहशत लाविली. पुढेंही कित्येक स्वामी-कार्याच्या ठायीं हिम्मत धरितां. या करितां तुम्हांवरि राजश्री स्वामी संतोष होऊन मामले मिरज कर्याती २२ बेवीस एथील देशमुख होते ते नेस्तनाबूद झाले, त्याच्या वंशीं कोणी नाहीं, त्याचे मुतालिक होते ते बळावून देशमुखी वतन खात होते तेही दुर्बुद्धि धरून गलिमाशीं मिळून फिसालत केली, एकनिष्ठा धरून इकडे येऊन भेटले नाहींत, म्हणून त्यांसि देशमुखी दूर करून तुम्हांस

तालीक–नक्कल. १ हा शब्द चुकून पडला आहे. गलीम–गनीम, शत्रु, लुटारू. कुल–सर्व. खत्ता–बिघडलेलें. उमदा–मातबर. कोट–बन्ध, बांध. नेस्तनाबूद–नष्ट. दहशत लाविली–भीतीनें अस्वस्थ केलें. मामला–वसुली तालुका. कर्याँत–दहा बारा गांवांचा पेटा. मतालिक–संबंधी, प्रतिनिधि. फिसालत–कारस्थान.

अजरामरामत देशमुखी मामले मजकूरची अवलाद अफलाद वतन करून दिली असे ... ...

---

# ४९. संताजीस सेनापतिपद

| | |
|---|---|
| काव्येतिहाससंग्रह, लें० ३ पृ० ५ | श० १६५३ आषाढ शु० २ ता० २५–६–१७३१ |

[ संताजीचा वंशज (मुलाचा मुलगा) राणोजी यास २५–६–१७३१ मध्यें शंभू छत्रपती (कोल्हापूर) यानीं सरंजाम दिला. त्या प्रसगानें लिहिलेल्या हकीकतीत हा उतारा आहे. यावरून संताजीने बादशाहाच्या तबूचे सोन्याचे कळस कापून आणले हें खरें दिसतें. ]

श्री

सन १०९८ फसली. श्रीमन्महाराज शंभु छत्रपती

यादी[1] श्रीमन्महाराज शंभुछत्रपति[2] यांची स्वारी संगमेश्वर मुकामीं होती ते समयीं अवरंगजेब पादशहा याची फौज शके १६१० विभवनामसंवत्सरे ज्येष्ठ शुद्ध १० रोज मंदवासरीं[3] येऊन लढाई जहाली. त्या लढाईत म्हालोजी घोरपडे फौज सुद्धां लढून ठार झाले. त्यास पुत्र तीन

१ संताजी घोरपडे वडील पुत्र   १ बहीरजी घोरपडे दुसरे पुत्र

१ मालोजी घोरपडे तिसरे पुत्र ... ... ...

एकूण ३

या तीन आसामींनी व विठोजी चव्हाण यांणीं फौज सुद्धां तुळापूर मुक्कामीं अवरंजेब पादशाहाचे लश्करावर छापा घालून पादशहाच्या डेऱ्याचे

---

अजरामरामत (अज्रामऱ्हामत)–बक्षीस. अवलाद–पुत्र. अफलाद–नातवंड. अवलाद व अफलाद–वंशपरंपरा.

१ सरकारीपत्र, हें मूळ विनतिपत्रास उत्तर म्हणून असतें. २ संभाजी. ३ या तिथीला मंगळवार येतो. (मंदवार–शनवार).

सोन्याचे कळस आणून श्रीमन्महाराज राजेसाहेब विशाळगड मुक्कामीं होते त्यांच्यापुढें ठेविले. ते समयीं महाराजांची मर्जी संतोष होऊन चौघांचा सन्मान करून व वस्त्रें, भूषणें, जवाहीर देऊन संताजी घोरपडे यास ममलकतमदार हा किताब दिला. बहीरजी घोरपडे यास हिंदूराव म्हणून किताब दिला; व मालोजी घोरपडे यास अमिरुलउमराव म्हणून किताब दिला व विठोजी चव्हाण यास हिम्मतबहाद्दर हा किताब दिला. नंतर विशाळगड मुक्कामीं रामचंद्र पंडित आमात्य यांणी महाराजांच्या सेवेशीं विनंति करून संताजी घोरपडे यास सेनापतिपद देविलें.

---

## ५०. धनाजी जाधवाबद्दल समाधान

शिवचरित्रसाहित्य खं० ५
पृ० २३ ले० ७७८
भा०इ०सं०मं०त्रै०मा०व०१६अं०३

श० १६१५ आषाढ शु० १५
इ० १६९३ जुलै ७

राजश्री बाबाजी नारायण सुभेदार व कारकून वर्तमान व भावी सुभा सातारा गोसावी यांस

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य शेवक शंकराजी नारायण सचीव निसबत[1] सरकार सुहूर सन आर्बा तिसैन अलफ राजश्री धनाजी जाधवराऊ हे साल गुदस्त चंदीस जाऊन चंदीस वेढा पडला होता तेथे गनिमासी गाटी घालून चौकी मारिली चौकीस इस्माईलखान होता तो मारून गर्दस[2] मेलऊन दस्त[3] करून राजश्री छत्रपती स्वामीपासी नेला त्यावरून राजश्री छत्रपती स्वामी बहुत संतोश पावले आणि मशारनिल्हेवरी[4] कृपाळू होऊन प्रांत सातारे तर्फेस[5] दोनी गाव इनाम दिल्हे ... —संशोधक वा. दा. मुंडले

---

१ मार्फत. २ धूळ. गर्दस मेळविणें—नाश करणें. ३ हात, कैद. ४ उपरिनिर्दिष्ट, अर्थात् धनाजी जाधव. ५ गांवाचा समुदाय, तालुका, पेटा.

# ५१. मोगलांकडून मराठे सरदार फोडण्याची खटपट



सनदापत्रें, पृ० १६६, सनद नं० ९ | १२–४–१६९१ श० १६१३ चैत्र व० ९

## म्हसवडचे नागोजी माने

श्री

"स्वस्तिश्री राज्याभिषेक शके १७ प्रजापती नाम संवत्सरे चैत्र बहुल* नवमी मंदवार क्षत्रिय कुलावतंस श्रीराजाराम छत्रपति स्वामी यांणीं राजश्री नागोजी बिन† रताजी माने यांसी दिल्हें अभयपत्र ऐसीजे :—

तुम्ही पूर्वी तांब्रकाडे[1] होतेत. ऐसियासी स्वामींचें राज्य म्हणजे देवताभूमि या राज्यास तांब्रांचा उपद्रव न व्हावा, महाराष्ट्रधर्म राहावा, स्वामींच्या राज्याची अभिवृद्धि व्हावी, या उद्देशें, स्वामींच्या पायांपाशीं एकनिष्ठता धरून, कर्नाटकांत चंदीचे मुक्कामीं स्वामीपासीं आलेती. येऊन विनंति केली कीं, आपणास देशांत सरदेशमुखीचें वतन करून दिल्हें पाहिजे. ता[2] :—

| | |
|---|---|
| १ कसबे म्हसवड येथील बारा वाडिया[3] | १ कर्यात दहीगांव |
| १ कर्यात[4] सांगोलें | १ कर्यात भालवणी |
| १ कर्यात आडपाडी | १ कर्यात नाझरें |
| १ कर्यात ब्रह्मपुरी | १ कर्यात......? |
| १ कर्यात अकलूज | १ कर्यात कलेढोण |
| १ कर्यात मंगळवेढें | १ ...... |
| ६ | ६ |

एकूण महाल १२ बारा महालाचें वतन द्यावया आज्ञापत्र देविलें पाहिजे

---

* वद्य. †चा पुत्र. १ मोगल, पठाण. संदर्भानें, इंग्रज असाही अर्थ. तांबूस दिसणारे. २ तपशील. ३ गांवाला जोडून लहान गांव. ४ तालुका, पेटा.

म्हणोन विदित केलें. ऐसियासी तुम्ही स्वामिसेवेवर एकचित्ते वर्तत आहां. तुम्हांवरी स्वामी कृपाळु होऊन नूतन सरदेशमुखीचें वतन सदहू बारा महालचें करून दिल्हें असे. तुम्हीं व तुमचे पुत्रपौत्र अनुभवून सुखरूप खाणें. निदेश* समक्ष. मोर्तब.''

---

## ५२. संताजीची अमात्यांविरुद्ध तक्रार

राजवाडे खं० ८, लें० ४७ पृ० ४९ } { इ० स० १६९५

[ प्राणांतिक संकटांतून स्वराज्य वांचवावें या एकाच हेतूनें अमात्य, सचिव, संताजी, धनाजी हे सर्व लोक झगडत असता एकमेकांत कसे गैरसमज उत्पन्न होतात तें पहा. हें व पुढील दोन पत्रें वाचून वाचकांस हळहळ वाटेल यांत शंका नाही. ]

श्री

राजश्री पंत अमात्य स्वामीचे सेवेसी :—

छ सकळ गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित संताजी घोरपडे सेनापती जप्तनमुलूक दंडवत. विनंति. येथील कुशल तो प्रताप स्वामीचा जाणऊन स्वानंदवैभवलेखन केलें पाहिजे.' विशेष. स्वामींनी राजश्री सेखोजी बरगे व बाजी शिंदे याजबराबरी कितेक बुद्धिवाद सांगोन पाठविला कीं आपली भेट घेतली नाहीं, परस्पर निघोन गेलेत, म्हणून शब्द

---

* हुकुम. जप्तनमुलूक–प्रदेशजेता संताजी घोरपडे यास हा किताब होता. १ 'येथील कुशलता (सुस्थिति) ही स्वामींच्या पराक्रमाचें फल हें लक्षांत घेऊन, त्यामुळें होणारा आनंद व्यक्त केला पाहिजे' असा भावार्थ. हें गौरवार्थी लिहिणें आहे.

लाविला. ऐसियास, स्वामीचो आमची क्रिया ऐसी नाहीं जे स्वामींसी द्वैत-भाव[2] धरावा आम्हीं त्या प्रांतें असतां दहाविसांचे साक्षीनसी ऐकीलें कीं संताजी घोरपडे यास त्याप्रांतें ठेऊन राजश्री धनाजी जाधवराऊ यांस पाठवून देणें. म्हणवून पत्रें राजश्रींस[3] लिहिलीं. त्यावरूनच द्वैत प्रकार दिसून आला. स्वामीचे आज्ञेवितरिक्त आम्ही कांहींच नव्हतों. विश्वासाची जाती म्हणावी तरी स्वामीचे आमचे शफत तुळशबेलाचे श्रीवरील आहे. स्वामीचे मांडी-वरी आम्ही उसें ठेवून निजावें, आमचे मांडीवरी स्वामींनीं ठवावें, शरीर मात्र भिन्न, आत्मा एक, ऐसे असतां ही गोष्ट द्वैताची होऊन आली. म्हणूनच वितरागें[4] येणें जालें. गतवर्षापासून श्रमाची जाती म्हणावी तर कागदीं लिहीतां पुरवत नाहीं. बरें! जे गोष्टी जाहाली ते जाहाली. याउपरि तऱ्ही राज्यांत डोहणा[5] न होय तो पदार्थ केला पाहिजे......स्वामिवितरिक्त आम्हीं कांहीं नाहीं. जैसी पूर्वीं आज्ञप्रमाणेंच वर्तणूक केली तैसीच करू. कळलें पाहिजे.

श्री राजाराम चरणीं
तत्पर । संताजी
घोरपडे निरंतर.

विलसति
लेखनावधिः

---

# ५३. संताजी सेनापतिपदाहून दूर

---

**पेशवेदप्तर, भा० ३१, पृ० ६१, नं० ६८** } { २७-१०-१६९६

श्री

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके २३ धातृनाम संवत्सरे कार्तिक शुा १२ भौमवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजाराम छत्रपति यांणीं समस्तराजकार्यधुरंधर

---

२ भिन्नभाव. ३ सचिव (?). ४ विरक्ति आली, मन विटलें असा अर्थ. ५ बखेडा.

विश्वासनिधि राजमान्य राजश्री रामचंद्र पंडित आमात्य हुकुमतपन्हा* यास आज्ञा केली ऐसीजे संताजी घोरपडे याणी स्वामीच्या पायासी हरामखोरी केली, याकरितां त्यास सेनापतिपणाचा कार्यभाग होता तो दूर करून फौज हुजूर आणविली.' त्यावरून राजश्री मकाजी हटकरराऊ देवकाते हे आपले जमावानसी स्वामीसंनिध आले. येकनिष्ठपणें स्वामिसेवा करीत आहेती. याकडील जमावास राजश्री शंकराजी नारायण याणी पहिले मुकासे[२] नेमून दिल्हे आहेती, ते स्वामीने करार करून दिल्हे असेती; व इनामे पहिले स्वामीने दिल्ही आहेती ते चालत आहेती तेणप्रमाणें चालवावयाची आज्ञा केली असे.

---

# ५४. संताजी-धनाजी युद्ध

सनदापत्रें, पृ० १७७, लें० २३　　　इ० स० १६९६

हणमंतराऊ बिन कृष्णाजी घोरपडे देशमुख यांस इनाम गांवाबद्दल आज्ञापत्र.

"स्वस्तिश्री राज्याभिषेक शके २३ धातृ (धाता) नाम संवत्सरे, पौष शुद्ध ११ गुरुवासरे, क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपति यांणीं राजश्री हणमतराऊ बिन कृष्णाजी घोरपडे देशमुख, किल्ले वंदन, कसबे आंगापूर यांस आज्ञा केली ऐसीजे:—

तुम्हीं चंदीचे मुक्कामीं आपणांस नूतन इनाम गांव कर्याती[३] आंगापूर, प्रांत सातारा पैकीं आपले देशमुखीचे वतनाचे गांव आहे. ऐसीयास स्वामींच्या पायाशीं एकनिष्ठता धरून, कर्नाटक प्रांतास स्वामीसन्निध आलों. त्यावरी

---

* हुकमत—अंमल, पन्हा—आश्रय, हुकुमाखालच्या प्रजेचा रक्षणकर्ता. ही पदवी आहे. १ आमचेकडे दाखल केली. २ मुकासा-मोकासा—लष्करी नोकरीची अट घालून दिलेलें गांव. ३ कर्यात—दहा बारा गांवांचा पेटा, लहान तालुका.

आयेवारकुटीयाचे' मुक्कामीं संताजी घोरपडे व राजश्री धनाजी जाधवराव या उभयतांमध्यें झुंज जाहलें. त्या समयीं आपण कष्ट मेहनत बहुतच केली. ते स्वामींस विदित आहे. स्वामींनीं कृपाळू होऊन आपणांस इनाम गांव ठेविले पाहिजे. .... म्हणोन विनंति केली. त्याजवरून .... स्वामी तुम्हावर कृपाळू होऊन, तुम्हास येणेंप्रमाणें करून दिधले असे......

### जेधे शकावलींतील पुरवणी उतारा

शके १६१८, धाता संवछरे

चैत्र मासी राजारामाच्या दर्पणास संताजी घोरपडे चंदीस गेले जेष्ट मासी बिघडोन कची आलिकडेस भांडण जाले धनाजी जाधव पलोन देशास आला अमृतराव निंबालकर पडिला संताजीची फते जाली१

---

## ५५. संताजीचा खून

| | |
|---|---|
| सनदापत्रें, पृ० ८५ | श० १६१९ श्रावण शु० १<br>इ० स० १६९७ जुलै ९ |

[ सदरहू पत्र मोगल सरदार नागोजीस लिहीत आहे. नागोजीच्या कामगिरीबद्दल त्याची प्रतिष्ठा व्हावी व त्यास जहागीर मिळावी म्हणून त्यानें औरंगजेबास लिहिलें आहे. ]

### नागोजी माने यांचे नांवचा कौलनामा[२]

तुम्हीं पेशजी[३] विनंति केली ती व हल्लीं विनंति केली ती कबूल झाली आहे. तुमचे नांवें फर्मान यावयाकरितां व तुमचे अपराध क्षमा व्हावयाकरितां व आणखी तुमची विनंति असेल ती करून द्यावयाकरितां सरकारांत लिहिलें

---

१ हें ठिकाण कोठे आहे ? २ करारनामा, आश्वासन. ३ पूर्वी.

आहे. तुम्हीं स्वस्थ असावें व आमचे खताची[1] वाट पहावी कीं, आमचें खत सरकारांत पोंचल्यावर तुमचे नांवचें फर्मान व तुमचे अपराध क्षमा व्हावया-करितां व तुमचे मतलब व तुमचे इनामची मनद लिहून येईल. र(ण)-दुल्लाखान यांचे समागमें तुम्हीं लष्करांत यावें. तुमचा मोटेपणा व इतबार[2] तुमचे उत्तम होणेंबद्दल हल्लीं व पुढें जरूर आहे तें होऊन येईल......

**जेधे शकावलींतील पुरवणी उतारा**

शके १६१९

आषाड मासी संताजी घोरपडे यासी नागोजी माने याणी माहादेवा-जवल दगा देऊन मारिले १

---

## ५६. कान्होजींचें कोंकणांत धर्मरक्षण

**कुलाबकर आंग्रे सरखेल, पृ० १२** — इ० स० १६९७

[ मोगलांशी चालू असणाऱ्या ऐन दगलींतही समुद्रकिनाऱ्याकडे मराठ्यांचें दुर्लक्ष नव्हतें. ]

श्रीमंत राजेश्री कान्होजी आंगरे सरखेल जजीरा[3] कुलाबा यासी — तळ कोंकणांत पुडावे होऊन प्रांत वयराण* पडिला महाराष्ट्र-धर्म राहावा येसे नव्हते त्या वेलेस फीरंगी[4] व हपसी[5] याही प्रांतांत धर्म-उच्छेद करावयास प्राप्त जाले होते तेव्हां सरखेल साहेबांचे पुण्यप्रतापे व स्वरक्षणार्थ थोर थोर मातबर सरदार जमा होऊन शामलाची[6] क्षिती[7] केली. सक्रोजी मोहिते व राणोजी गोले व खंडोजी नाळकर व रुमाजीराव खराडे व कृष्णाजी मोड व हसनखान

---

१ पत्र. २ प्रतिष्ठा. सरखेल–सेनापति. ३ पाण्यांतील किल्ला. * उजाड. ४ पोर्तुगीज. ५ सिद्दी. ६ मूळ अर्थ काळा, सिद्दी. ७ नाश.

जमादार याही सरखेल साहेबांचे समागमे युद्ध-प्रसंग करून शामलाची क्षिती केली आणि श्रम पावोन कोंकणांत धर्म राहिला....मातबर सरदार यांहीं राज्य-रक्षण केलें म्हणोन आपल्याबरोबर वेतनें देऊन राज्यांत राखिले. सरखेल-साहेब याही धर्म-स्थापना केली ही कीर्त या लोकीं परलोकीं भरोन उरली आहे.

—शंकर श्रीकृष्ण देव
भा० इ० सं० मंडळ
इतिवृत्त श० १८३५, पृ० १६५

---

# ५७. राजारामाची शाहूबद्दलची वृत्ति

राजवाडे खं० १५
पृ० २९४, ले० २८६

श० १६१९ भाद्रपद वद्य ४
इ० स० १६९७

[ शाहू केव्हा तरी निश्चित स्वदेशी येईल, आपण केवळ त्याचे तर्फे अधिकार पाहात आहोंत असें राजारामास वाटत होतें. पण त्यास कसेंही वाटलें तरी कांहीं सरदार 'भलत्या भरीस पडून' कारस्थान करीत, हे या पत्रावरून स्पष्ट होतें. ]

श्री

राजमान्य राजश्री शंकराजी नारायण पंडित यासि आज्ञा ऐसीजे राजश्री दादाजी नरस प्रभु देशकुलकर्णी व गावकुलकर्णी देहाये[1] तर्फ[2] रोहिडखोरे व वेलवंडखोरे याचे वतन तुम्ही जप्त केले......हे वतन परत देणे मावळ-मजकुरी स्वारी येण्याचे पूर्वी वतन दिल्याचा मजकूर लिहिणे या उपरी वतन न दिल्या हा बोभाटा आल्यास तुमचे अबरूस व पदास धका येईल असे स्वामीस भासत आहे व पुढे नानाप्रकारच्या अडचणी तुम्हास अशा करणीच्या[3]

---

१ गांव. २ तालुका, पेटा. ३ कृत्य.

येतील कारण चिरंजीव[1] कालेकरून तरी श्री देसी[2] आणील तेव्हां संकटी जो माणसे उपयोगी पडली त्याच्या तसनर्सा[3] आम्ही करविल्या हे इकडे यावे त्याचे चित्ती द्वेश यावा[4] व राज्यकर्त्यास इनसाफ[5] पाहाणे जरूर, त्यात हे तरी अविचाराचे कलम[6] भलाई जाली ती सारी आमची एकीकडे जाऊन असी करणी तुम्ही केली यास स्वामीद्रोहाचेच करणे, ते मुख्य सर्व राज्यास अधिकारी, आम्ही करितो तरी त्याचे साठी च आहे, प्रसंगास सर्व लोकास तिकडे च पाहणे येईल, व वागतील हे कारण[7] ईश्वरी च नेमले आहे, उगी च भलते भरी न भरणे[8] पुढे उर्जित होय ते करणे हे न केलिया केले कामाची फळे ज्याचे ते भरतील असी श्रीची इच्छा च असली तरी तुम्ही तरी का समजाल, तरी नीट चालीने वागणे म्हणजे पुढे सर्वोपरी[9] उर्जीताचे च करणे जाणजे जाणिजे[10] निदेश[11] समक्ष मो[12] असे

तेरीख १७ सफर सुा समान तिसेन अलफ

रुजु[13] सुरनीस बार[14] बार बार सूद

(असल पत्र सचिवपंतास दिल्हे त्याची नकल टेविली त्याची नकल.)

---

१ शाहू त्या वेळीं कैदेंत होता. २ या देशांत, इकडे. ३ नाश. ४ शाहू इकडे येईल तेव्हां त्यांना आमच्याबद्दल राग यावा, असा भावार्थ. ५ न्याय. ६ ही तर अविचाराचीच बाब. अशा करण्यानें आम्ही केलेल्या चांगल्या गोष्टी वांया जातील. ७ सूत्र. ८ भलत्या नादीं न लागणें. ९ सर्व प्रकारें. १० जाणावें. ११ हुकूम, निर्देश. १२ मोर्तब, तयार. १३ दाखल. १४ सरकारदप्तरीं दाखल झाल्याची खूण म्हणून पत्रावर 'बार' असें लिहीत. लिहिणारास 'बारनिस' म्हणत.

# ५८. बाळाजीचें पूर्ववृत्त

इतिहाससंग्रह, वर्ष ६, अं०१०।११।१२, पृ० १२२ | इ०स० १६९९–१७००

[ बाळाजी विश्वनाथ सरसुभेदार यांस पत्र कीं, श्रीपांडेश्वर व भुलेश्वर हीं दोन्ही जागृत देवस्थानें आहेत, त्याचे सनदा बरहुकूम चालवणें. या पत्रावरून बाळाजी हा मराठ्यांचे दरबारीं फारा दिवसांपासून होता हें लक्षांत येतें. ]

"श्रीसकलगुणमंडित अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री बाळाजी विश्वनाथ, सरसुभेदार व कारकून, प्रांत पुणें यांसी:—प्रति श्रीकराचार्य पंडितराव, आशीर्वाद राज्याभिषेक शके २५ प्रमाथीनाम संवत्सरे, आषाढ बहुल चतुर्दशी, मंदवासरे, देवस्थानानी[1] वास्तव्य देहाय[2].

श्रीपांडवेश्वर मुक्काम मौजे पांडवे, तर्फ करेपठार, येथें अभिषेकी ब्राह्मणांस व देवास मोईन[3] पुरातन आहे. त्याची सनद अलाहिदा[4] सादर आहे. त्याप्रमाणें पाववीत जाणें.

श्रीभुलेश्वर मुक्काम मौजे माळशिरस, परगणे सुपें, येथें देवासी व अभिषेकी ब्राह्मणांस मोईन पुरातन आहे. त्याची सनद अलाहिदा सादर आहे. त्याप्रमाणें पाववीत जाणें.

दोन्ही देवस्थानें जागृत. येथें देवांसी व अभिषेकी ब्राह्मणांस कांहीं पावत नाहीं, उर्जा[5] चालत नाहीं, म्हणोन विदित जाहलें. त्यावरून हें पत्र सादर केलें आहे. तरी तुम्हीं उभयतां देवस्थानांचे, पेशजी[6] सनदा आहेत त्यांप्रमाणें पाववणें, आणि देवाची पूजा चाले ते गोष्टी करणें. जाणिजे. छ २७ मोहरम सुरसन मया व अलफ. हे आशीर्वाद."

---

१ 'देवस्थान'चें फारशी पद्धतीचें अनेकवचन. २ (पुढें दिलेल्या) गांवीं वसलेलीं देवालयें असा भावार्थ. ३ नेमणूक. ४ निराळी. ५ संरक्षण. ६ पूर्वींच्या.

# ५९. जिंजीहून परत

पुरंदरेदप्तर, भा० १ ला, लें० ३, पृ० ३

श० १६२१ चैत्र शु० ४
इ० स० १६९९ मार्च २५

श्री
राजारा
म भजनो
त्कंट मोरेश्व
र सुतनील
कंठ
( बदामी शिक्का )

॥ ०
श्रीआई
आदिपुरुष प्रस
न्न ॥ श्रीराजाराम
स्वामि कृपानिधि
परशराम त्र्यंबक
प्रतिनिधी ( अष्टकोनी शिक्का )

स्वस्तिश्री राज्याभिषेक शक २५ प्रमाथी नाम संवत्सर चैत्र शुध चतुर्थी मदवासरे* क्षत्रियकुलावतंस श्रीराजाराम छत्रपती यांणी देशाधिकारी प्रात राजपुरी यासी आज्ञा केली ऐसीजे सांप्रत स्वामी कर्नाटक प्रांतीहून परतोन या प्रांते आले या प्रसगे राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यासी त्या प्रांते पाठवावे येसा विचार जाहाला याकरितां राजश्री शकराजीपंत सचीव यास हुजूर यावयाची आज्ञा करून राजश्री रामचंद्र पंडित आमात्य त्या प्रातीचा मख्तीयार[1] देऊन पाठविले आहेत तरी तुम्ही याचे आज्ञेत राहोन वर्तणूक करीत जाणें तुम्ही आमात्य पंडित याचे सनदेखेरीज दुसरीयाची सनद पत्र काही न चालवणे जाणिजे लेखनालंकार[2] (मर्या देयं विरा जते)

पौ छ जिलकाद
मुा सुधागड

रुजू सुरू सुद

---

*शनिवार. १ मख्तीयार-मख्त्यार-अख्त्यार–अधिकार. २ यापुढील मजकर निराळया वळणाचा.

# ६०. औरंगजेबाचा सातारचा वेढा



सनदापत्रें, पृ० १८० } { इ० स० १६९९

## चंदनी राऊ कादटकर वगैरे बंधु यांस दिलेलें इनामपत्र

[ मराठे सरदार एकीकडे जीव धोक्यांत घालीत असतां दुसरीकडे त्याच वेळीं आपलें इनाम परत मिळविण्याचा यत्न करीत आहेत. संकट निघन गेल्यावर वचन पाळलें जाईल याचा भरंवसा काय ? ]

" राजश्री मुरो विठ्ठल हवालदार व कारकून, तर्फ[1] वामणोली, गोसावी यांसी.

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य सेवक त्र्यंबक कृष्ण सभासद, नामजाद[2], सरसुभा, प्रांत व्याघ्रगड, नमस्कार. सुरुसन मया अलफ, मौजे कादट पेशजी कैलासवासी स्वामींपासून कादटकरास इनाम आहे. हल्लीं दरम्यान चालिलें नाहीं. हल्लीं औरंगजेब गनीम[3] येऊन साताऱ्यास वेढा घालून बेसला आहे. यास मारून हाकून काढावा. कादटकर चंदनीराऊ व यमाजीराऊ व तानाजीराऊ गेले आहेत व सुभानजीराऊ जमावानसीं आंबवला घाट राखावया ठेविले आहेत. त्यांणी अर्ज केला जे, पुरातन आपलें इनाम-गांव कादट आहे, ते आपले दुमाला[4] केलें पाहिजे. आपण स्वामीकार्यावर एकनिष्ठ आहों. त्याजवरून मनास आणून मौजे कादट, पुरातन इनाम होतें, तें कादटकरास इनाम दिल्हें असे. दुमाला करणें. . .



१ तालुका, पेटा. २ अधिकारी. ३ शत्रु. ४ परत हवालीं करणें.

# ६१. दुसरा शिवाजी व ताराबाई यांचें सरदारांस उत्तेजन

ऐतिहासिक पत्रव्यवहार, पत्र २, पृ० २ — शके १६२३ सन १७०१

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २८ वृषनाम सवत्सरे भृगुवासरे* क्षत्रियकुलावतंस श्री राजा शिवछत्रपति यांणी राजमान्य राजश्री प्रतापराव मोरे यांसी आज्ञा केली ऐसीजे, तुम्हीं व राजश्री संताजी पांढरे फौजनशीं मलकापुरानजीक औरंगजेबाची चौकी होती ते मारली, हें वर्तमान कळल्यावरी स्वामीने तुम्हांस आज्ञापत्रें पाठविलीं आहेत तीं पाऊन वर्तमान कळलें.[1] औरंगजेब विशाळगडास बिलगला[2] याजकरितां त्याचे कबिला[3] बाड[4] मारून हमेशा[5] गोटावर[6] हल्ले करावे, तरीच तो बलकुबल[7] राहतो. याजकरितां तुम्हीं व जे सरदार फौज घेऊन मुकाबला[8] केला, आपले अवघे एकदिल होऊन औरंगजेबास जडून राहणें.[9] तुम्हीं स्वामींचे एकनिष्ठ सेवक मायेचे विश्वासू आहां, तरीच या प्रसंगीं साहस करून मुख्य शत्रूच्या मुकाबल्यास आलेत, ये गोष्टीनें औरंगजेब दिक[10] होऊन थोरच कार्य होऊ आलें. प्रस्तुत स्वामींचा मुक्काम किल्ले प्रतापगडीं जाला आहे. बलकुबलीच्या प्रसंगास स्वामींचे तोलदार[11] फौज असली पाहिजे. औरंगजेब गनीम दगेखोर[12] आहे. कोणे समयीं काय विचार करील तोही कळत नाहीं. त्यास तुम्ही बळकट फौजेनिशीं या तोंडें राहिले तरी त्याचे वस्तु[13] चळवळ करवत नाहीं.

---

*शुक्रवार. १ कळलें असेलच. २ घेण्याची पराकाष्ठा केली. ३ कुटुंबपरिवार ४ डेरे, राहुटया वगैरे सामान. ५ एकसारखे. ६ छावणीचा मुक्काम. ७ वाईट प्रसंग (त्यांत सांपडलेला). ८ लढाई. ९ पिच्छा सोडूं नये असा अर्थ. १० क्षीण, त्रस्त. ११ बलाढ्य, वजनदार. १२ विश्वासघातकी. १३ स्वभाव, चळवळ करण्याची छाती नाहीं असा भावार्थ.

आजीचे प्रसंगीं भरंवसा तुम्हां लोकांचा आहे, व स्वामींचे मायेचे आहां, याकरितां ये गोष्टीचे अगत्य धरून फौजेनशीं या तोंडें राहोन, औरंगजेबाचा कबिला बाड मारून हैराण करणें. तो विशाळगडचा ख्याल[1] सोडी, तुम्हां लोकांच्या कीर्ति होऊन स्वामी समाधान पावेत ऐसी गोष्टी करणें. दूर प्रांतें स्वारीस जाल तर हें तोंड सहजच मोकळें जाईल. म्हणजे औरंगजेब येखादी फौज या तोंडें पाठवावयास उशीर लावणार नाहीं. समयीं स्वामीसमीप तुम्हांस यावया गांठ पडणार[2] नाहीं, याकरितां अवरंगजेबास सोडून दुसरे [कडे] सर्वथा नच जाणें. समीपच राहोन स्वामी खुशाल[3] या जागां रहात तें करणें. राज्य राखणें. तुमचे सेवेचा मजरा[4] होय असी गोष्ट करणें. जाणिजे बहुत काय लिहिणें ? मोर्तब[5] असे.

---

# ६२. दिल्ली झाली दीनवाणी

स्थिरबुद्धि राजाराम, } { पृ० १२२

## ताराबाईचें स्तुतिकाव्य

[ हें त्रुटित काव्य गोविंद याचें आहे. हा गोविंद कवि शिवभारतकार परमानंद याचा नातु. याचें आडनांव कवींद्र. परमानंदाचे पुत्र श्रीधर व देवदत्त. देवदत्ताचा पुत्र गोविंद. इ. स. १७१२ त शाहूच्या पदरच्या पंडितांत श्रीधर व देवदत्त यांचीं नांवें आहेत. प्रस्तुतच्या काव्यास परमानंदाच्या काव्याची सर नाही. काव्य सामान्य आहे. ]

---

१ विचार. २ गांठ पडणें—सवड सांपडणें. ३ सुरक्षित. ४ मजरा (मुजरा)—मोबदला चीज. ५ राजचिन्ह. राजाच्या शिक्क्यानिशी हुकूम झाला असा अर्थ.

तुजला प्रसन्न झाली । पातशाही हातीं आली ।
जयलक्ष्मी माळ घाली । शिवाजीस आदरें ॥ १ ॥

दिल्ली झाली दीनवाणी । दिल्लीशाचें गेलें पाणी ।
ताराबाई रामराणी[१] । भद्रकाली[२] कोपली ॥ २ ॥

जाणा तुम्ही आजि साची[३] । आज्ञा आली शंकराची ।
सर्व सेना दिल्लीशाची । अंतकास[४] वोपली[५] ॥ ३ ॥

मानहानि दिल्लींद्राची । सभा हांसते इंद्राची ।
आजि काल कवींद्राची । सर्व चिंता हारली ॥ ४ ॥

रामराणी भद्रकाली । रणरंगीं क्रुद्ध झाली ।
प्रलयाची वेळ आली । मुगल[६] हो सांभाळा ॥ ५ ॥

वसे रत्नसिंहासनीं । भोसल्यांचा शिरोमणी[७] ।
शिवराज चिंतामणी[८] । दिनमणि[९] उदये[१०] ॥ ६ ॥

---

१ राजारामाची स्त्री. २ कल्याण करणारी देवी. ३ खरोखर. ४ यम. ५ विकली, अर्पण केली. ६ मोगल. ७ श्रेष्ठ. ८ चिंता हरण करणारा ९ सूर्य. १० उदय पावतो. शिवराज ( शिवाजी ) हा सूर्य उदय पावतो असा भावार्थ.

# ६३. आमची फौज परत जाईल

स्थिरबुद्धि राजाराम, पृ० ११८ | २७ मे इ० स० १७०२

## औरंगजेबाचें आश्वासन

[ प्रस्तुत पत्र म्हणजे बादशाही आब राखून पद्धतशीर पीछेहाटीचा एक नमुनाच होय. ]

मुसलमानी धर्मावर निष्ठा ठेवून परशुराम यानें जाणावें कीं, तुमचे गुन्हे माफ करावया जोगे नाहींत. तत्राप शहाजादा बेदरबख्तानें तुमच्याबद्दल मोठी शिफारस करून लिहिलें आहे कीं, तुम्ही खेळणा किल्ला आमच्या स्वाधीन करण्यास तयार आहां, मात्र ( १ ) हा किल्ला घेतल्यावर दुसरे आणखी किल्ले न घेतां बादशहानें परत आपल्या मुलखांत जावें, ( २ ) आमच्यापैकीं कोणाच्याही जिवास अपाय करणार नाहीं, असें लेखी वचन द्यावें, आणि ( ३ ) ही विनंति कबूल असल्याबद्दल शहाजाद्यास लिहून यावें. त्यावरून कळविण्याचें कीं, तुम्हीं किल्ला खालीं करून बादशहास शरण यावें; म्हणजे तुमच्या जिवास धक्का न लावतां आमची फौज परत जाईल. या आमच्या वचनावर भरंवसा ठेवून, किल्ला स्वाधीन करावा, विलंब लावूं नये.. कळावें. . .

# ६४. औरंगजेबाची कानउघाडणी

इतिहासमंजरी, पृ० १५५ — इ० स० १७०३

## शहाजादा अकबर याचें पत्र

बाबा, तुमचेंच उदाहरण मी नेहमीं डोळयांपुढें ठेविलें आहे. इतकें चांगलें उदाहरण दुसऱ्या कोणाचें सांपडणार ? ज्या रजपुतांनीं अकबर, जहांगीर व शहाजहान यांस मनापासून साहय केलें त्यांचा आश्रय मी केला यांत वाईट तें काय केलें ? जसवंतसिंग तुमच्या भुलथापास भुलला नसता तर तुम्हीं आज हिंदुस्थानचे बादशहा झाले नसता. असे हे रजपूत लोक आपल्या राज्याचे खांब होते. पूर्वी फौजेंत रजपूत पाहिजे असले म्हणजे एकाचे ठिकाणीं शंभर उमेदवार येत. हल्लीं तुम्हीं तीन तीन वर्षे डांगोरा पिटून सुद्धां दहा पांच माणसें जमा होत नाहींत. हा प्रभाव कशाचा ? आज इतके तुमचे अंमलदार आहेत, पण एकाची तरी तुमच्यावर खरी भक्ति आहे काय ? फौजेतील सर्व लोक दरिद्री झाले आहेत. कोणापाशीं हत्यार नाहीं. एक कवि किंवा ग्रंथकार निपजत नाहीं. व्यापाऱ्यांची व धनिकांची लूट होते व खून होतात. रयत धुळीस मिळाली. दक्षिणचा प्रदेश जो पूर्वी केवळ स्वर्गतुल्य वाटत होता तो हल्लीं ओसाड, निर्जन व निर्धन झाला आहे ! विजापूर, औरंगाबाद हीं केवढीं मोठीं व सुंदर शहरें, पण हल्लीं मातीशिवाय तेथें जास्त काय आहे. तुम्हींच सांगा, ह्या सर्वांचें कारण काय, तर तुमचा परधर्मद्वेष. तुम्हीं हिंदूंवर जिझिया बसविला, त्यानें सर्व लोक तुमच्यावर उठले; जाळपोळ व लूट करूं लागले, त्यानेंच देश धुळीस मिळाला.

तुमच्या राज्यांत एक तरी प्रकार असा आहे काय, कीं ज्याची मला तारीफ करता येईल ? थोर थोर पुरातन घराणीं सर्व धुळीस मिळालीं. सर्वत्र लुच्चांचा बाजार भरला आहे. राज्यकारभार सर्व हलकट लोकांच्या हातांत आहे.

हातांत जपमाळ, काखेत कुराण आणि डोक्यास मोठेसें पागोटें असलें म्हणजे तुमचा त्यावर पूर्ण भरंवसा. अशी मंडळी तुमच्या राज्याचे आधारस्तंभ !

असा सर्व राज्याचा नाश झालेला मला पाहवेना. तेव्हां अत्यंत कष्टानें मी देशत्याग करून इकडे आलों. आतां मी शांत आहे. परमेश्वर तुम्हांला दीर्घायुष्य देवो. मीच परत येऊन राज्य करावें म्हणतां, त्यास तुम्ही राज्य सोडून मक्केस चालते व्हा म्हणजे मी येऊन दाखवितों कसें राज्य करावयाचें तें. आजपर्यंत काय करामत होती ती तुम्हीं करून दाखविलीत. आतां वृद्धापकाळी परमार्थसाधनच तुम्हांस योग्य आहे. जास्त लिहून तुम्हांस त्रास होईल म्हणून पत्र पुरें करतों. —मनूची 'स्टोरिया मोगार' भा. ४, पृ. १७१.

---

# ६५. बंदिवासांतील राजमाता येसूबाई

**भा० इ० स० मं०, वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, पृ० २९८**

**१६२७ वै० शु० ७**
**१९-४-१७०५**

[राजमाता येसूबाई हिनें आपला पुत्र शाहू याचेसह, इ. स. १६८९ सालीं रायगड काबीज झाल्यापासून १७ वर्षे औरंगजेबाच्या कैदेंत काढली. औरंगजेब शाहूस आपल्याबरोबर हिंडवी. येसूबाईस त्यानें अहमदनगरांत नेमणूक लावून देऊन ठेविलें. पण ती तिला वेळेवर पोंहोचत नसे. त्यायोगें तिला कर्ज झालें. अशा दीनवाण्या प्रसंगांत तिनें चिंचवडचे मोरया गोसावी यांस पुढील पत्र लिहिलें आहे.]

॥ श्रीशंकर ॥

राजश्री श्री देवस्वामींचे सेवेसी

॥ श्रीमत् परमपूज्य तपोनिधी मुक्तिदायक सकलगुणालंकरण देवमान्य वरद†मूर्तीपरायण राजमान्य राजश्री.

---

† वर देणारी, इष्ट हेतु पूर्ण करणारी.

आज्ञाधारक सेवेसी मातुश्री येसूबाईसाहेब दोनी करकमल जोडून चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विनंति. उपरि. येथील क्षम तागाईत वैशाख सुद्ध सप्तमी गुरुवार जाणऊन मुकाम अमदानगरीं दुर्गात[1] स्वामीच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे. स्वकीय कुशल–लेखन–आज्ञा केली पाहिजे. विशेष. बहुत दिवस जाले. स्वामींनीं आशीर्वाद पत्र पाठवून बालकाचा परामृश[2] केला नाहीं याकरितां चितास स्वस्थता होत नाहीं तें देव जाणं. तरी स्वामींनीं येणारा मनुश्या बराबरी प्रतिक्षणीं आशीर्वादपत्र पाठवीत गेले पाहिजे. विशेष आमचें वर्तमान तरी स्वामीपासी सत्य च लेखन केलें पाहिजे. चिरंजीव दाजी[3] तों पृथ्वीपती[4]समागमें गेले. आम्हांस सार्वभोमाची आज्ञा जाली की 'अहमदानगरास जावें'. आज्ञेप्रमाणें आम्हांस अहमदानगरास येऊन आले. तेथें आलियावरी आजी पांच मास जाले. परंतु खर्चाची बहुत तंगचाई[5] जाली. काय निमित्य तरी सार्वभोम दूर गेले. आमचा तनखा जो दिल्हा तेथें ताम्रांनीं व हरीभक्तांनीं[6] व कांहीं काळानें[7] करून प्रतिकूल जाली[8], यामुळें द्रव्य येणं राहिलें. येथें अंमदानगरी साहुकारांचें पांच सात सहस्र ब्रम्हस्व[9] जाले. आतां कोण्हीं देत नाहीं. मागिल्याच पैकियास तगादे लाविले आहेत. त्याच्यामुळें बहुत कष्टी होतों. तो दुःखसागर स्वामीस काय म्हणऊन ल्याहावा ? स्वामीच्या सेवेसी रायाजी जाधव पाठविला असे. तरी माहाराज कैलासवासी स्वामी गेल्या तागाईत आपणावरी हा कसाला[10] प्राप्त जाला. इंगळास वोळंबे लागले.[11] बरं, होणार भविष्य त्यास यत्न काय आहे ? आतां एक स्वामी वितरिक्त आणिक कोणाचा भरवसा या समयांत नाही. एक स्वामीच क्लेश परिहार करतील. इतराच्यानें कांहीं होणें नाहीं. तरी सारांश गोष्टी कीं ब्रह्मस्वापासून मुक्त केलियानें बहुत कीर्ति स्वामीची आहे. आणि पाऊसपाणी जालियावरी स्वामी ज्यापासून देवितील त्यास प्रविष्ट करून[12]....माझी उपेक्षा केली न पाहिजे. वरकड चिरंजिवाकडील

---

१ अहमदनगरच्या किल्ल्यांत. २ परामर्श, क्षेमकुशल चौकशी. ३ शाहू. ४ औरंगजेब. ५ टंचाई. ६ राजपूत (?). ७ प्रतिकूल परिस्थितीनें. ८ मोगल, राजपूत व दुर्दैव हीं आडवीं आलीं. ९ कर्ज. १० संकट. ११ या वाक्याचा अर्थ काय ? १२ स्वामी ज्याच्यापासून कर्ज देववतील त्यास तें परत देऊं.

सामराज' व आमचे वर्तमान रायाजीमुखांतरीं चरणापाशीं विनंति करितां'
श्रुत होईल, तें सत्यच मानणें. विशेष ल्याहावें तरी आपण अज्ञान, मूढ असे.
लिहितां येत नाहीं. अथवा ज्ञानहि नाहीं. त्याहि वरी आपणाजवळी
कोण्ही शाहणा कारकून नाहीं. आवाक्षराची' क्षमा केली पाहिजे. कृपा
आशीर्वाद निरंतर करीत गेलें पाहिजे. कृपा असो दीजे. जाणिजे मोर्तबसुद.
रा छ ११ माहे मोहरम सन ४९ हे विज्ञापना.

---

# ६६. औरंगजेबाचें अंतःकाळचें पत्र

लेनपूलकृत मोगल इतिहासाचीं साधनें, पृ० १४२–४३ } { इंग्रजीचें भाषांतर

[ इ. स. १७०७ मध्यें आपला मुलगा कामबक्ष यास औरंगजेबानें पाठविलेल्या पत्रांपैकीं एक पत्र पुढें दिले आहे. ]

माझ्या लाडक्या मुला,

माझ्या ऐन उमेदीच्या व भरभराटीच्या काळांत मीं तुला उपदेश केला व तुझ्यासाटीं कष्टही केले, पण त्या वेळीं ईश्वराची इच्छा नसल्यानें त्याकडे तं लक्ष दिलें नाहींस. आतां मी सर्व सोडून जाणार--माझ्या धडपडीबद्दल आतां मला वाईट वाटतें. कारण त्या धडपडीचा मला आज काय फायदा ? माझ्या पापांचीं व अदूरदर्शी कृत्यांची फळें मात्र माझ्याबरोबर येणार आहेत ! ईश्वरी लीला अतर्क्य आहे. मी एकटा येथें आलों आणि एकटाच निघून जात आहे ! या जगांत प्रवास करीत करीत पुढें जाणाऱ्या मानवी टोळीच्या पुढाऱ्यानें मला एकटेंच मागें ठेवल्यासारखें वाटत आहे.....छावणीची आणि सैनिकांची चिंता मी काय करूं ! माझेंच काय होत आहे तें मला

---

१ समाचार (?). २ करीत असतां. ३ अधिक-उणें लिहिल्याची.

कळत नाहीं. अशक्तपणामुळें पाठीस पोक निघून मी वांकून गेलों आहे, आणि पायांत तर दोन पावलें टाकण्याचेंही त्राण नाहीं !. . . .मी जीं असंख्य दुष्कृत्यें केलीं त्याबद्दल मला किती दंड भोगावा लागेल कोण जाणे !. . . . प्रजापालन करणें ही परमेश्वरानें माझ्या मुलांना दिलेली एक विश्वासाची ठेव आहे. तरी सद्धर्मीयांवर संकटें येणार नाहींत अशी त्यांनीं काळजी घ्यावी, नाहीं तर त्यांचे शाप मला भोंवतील ! मुला, तुझें, तुझ्या आईचें व मुलांचें ईश्वर रक्षण करो ! अंतकाळच्या वेदना आपला अंमल मजवर त्वरेनें बसवीत आहेत. . . .

सरदार लोक छळ कपट करणारे असले तरी त्यांना तोडून टाकूं नका. प्रेमाने आणि युक्तीनें आपलें म्हणणें त्यांना पटवा. अंथरुण पाहून पाय पसरा. सैन्याची पगार थकल्याची ओरड अद्याप आहेच. दारा शुको जरी मोठा धोरणी व विचारी होता व त्यानें कित्येकांना जहागिरी दिल्या तरी त्यानें पगार वेळेवर न दिल्यानें शिपाई लोक त्याजवर असंतुष्ट असत. मी आतां चाललों ! मी जें काय चांगलें अगर वाईट केलें तें तुमच्यासाठींच केलें. . . .तुम्ही माझे अपराध विसरून जा. आपला आत्मा शरीरांतून निघून जातांना कोणीं पाहिला नसेल, पण मी मात्र हें दृश्य पाहात आहें.

---

# ६७. बादशाहाचा शाहूवर लोभ

राजवाडे खंड ८, लें० ५६, पृ० ७८ — २३ जून १७०७

## अलीफ

[ बहादूरशाहाचें शाहूस पत्र :—या पत्रावरून ताराबाई ही बादशाही संरक्षण व मान्यता मिळविण्याची खटपट करीत होती हे उघड दिसतें. ताराबाई ही संपूर्ण स्वातंत्र्याची पक्षपाती व शाहू मात्र बादशाही अमलाखालील स्वराज्याचा पक्षपाती अशी कल्पना या पत्रानें निर्मूल ठरते. ]

सर्व शूरांत श्रेष्ठ, सर्व उमरावांत थोर, इस्लामी धर्मरक्षकाचे पुत्र, राजे शाहू याणीं पातशाही कृपेनें संतोषी होऊन जाणावें कीं, तुह्माकडील रायभान वकील याणीं विनंती केली जे, तुह्मी आपले जहागिरीचे महालीं आल्यानतर इकडे यावयाचा इरादा केला आहे, याजकरिता राणीनें[1] जमीदारीचा[2] फर्मान[3] मिळावा ह्मणोन कृत्रिमानें[4] अर्जी लिहिली होती. तिला व तिचे चिरंजीवास कपटी समजोन त्याचें उत्तर दिल्हें नाहीं. कारण कीं, आमचे[6] मुलकांतील राज्य व जमीदारी तुम्हांकडे असावी आणि तुह्मी आपले वडिलांप्रमाणें तेथें कायम राहावें. नंतर जे किल्ले थोरल पातशाहींतील त्या वेळेस हाती आले नव्हते[5] तेहि फौज पाठवून घ्यावे. जाणोन तुह्मी आत्मिक[6] असें समजोन हा फर्मान पज्यामुद्रां[7] लिहिला आहे. तरी तुम्हीं आपले फौजेसुद्धां जलद येथें येऊन पोहोचणें. ह्मणजे तुह्मावरी कृपा आणि लोभ वारंवार उत्कृष्ट होईल. छ ४ माहे रबिलाखर, सन १ जुलूस.[8]

---

१ ताराबाई. २ वतनदारी. ३ बादशाही सनद. ४ वरपांगीपणानें. ५ नव्हते. ६ आमचे. ७ तळहाताचा छाप. अस्सलपणाची खूण म्हणून केव्हां केव्हां फर्मानावर बादशाहाच्या तळहाताचा छाप उठवीत. ८ राज्यारोहण सन. हा प्रत्येक बादशाहा नव्यानें सुरू करी.

# ६८. शाहूस मिळालेला पहिला सरदार



पुरंदरेदप्तर भा० १ ला, लें० २३१, पृ० १६७

श० १६२९ पौष शु० ११ इ० स० १७०७ दिजेंबर २४

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३४ सर्वजित[1] संवत्सरे पौष्य शुध येकादसी सौम्य[2] वासरे क्षत्रीय कुलावतंस[3] श्री राजा शाहू छत्रपति स्वामि याणी मा* मळहार तुकदेऊ यास आज्ञा केली ऐसा जे स्वामीचे अगमन स्वदेशास[4] जाले तेव्हा तुम्ही औघिया[5] आगोधर स्वानदेशामध्ये लावकानीचे मुकामी येऊन स्वामिचे दर्शन घेतले कितेक कार्य प्रयोजने[6] केली एकनिष्ठेने सेवा करीत आहेत म्हणून स्वामी तुम्हावरी कृपालू होऊन पा[7] सुपे व का[8] सासवड ये महालीची सरदेशमुखीची मुतालकी[9] वतनी करून द्यावयाचा निर्वाह[10] करून हे आज्ञापत्र सादर केले असे.... ....



१ साठ संवत्सरांपैकीं एकाचे नांव. २ सोमवार. ३ अवतंस—श्रेष्ठ. *मशारूल, राजश्री. ४ स्वदेश. ५ सगळ्या. ६ योजना, कामें. ७ परगणे. ८ कसबे. ९ उपमंत्री. पदाधिकारी नाममात्र राहून मुतालिक हा त्या पदाची वहिवाट करणारा होतो. उदा० दाभाडे—गायकवाड यांचे संबंध. १० निवाडा, व्यवस्था.

# ६९. दुसऱ्या शिवाजीचें मराठे सरदारास आश्वासन



राजवाडे खंड ८, लें० ६६ पृ० ८७, | २३ मे १७०८

[ सरदाराना शाहूपासून फोडण्याचा हा यत्न असेल काय ? याच मजकुराचीं पत्रें प्रतिनिधि व जयसिंग जाधव यासही लिहिली आहेत. ]

श्री

स्वस्तिश्री राज्याभिषेक शक ३५ सर्वधारी संवत्सरे ज्येष्ठ शुद्ध चतुर्दशी मद्वासर क्षत्रियकुलावतंस श्री राजा शिवछत्रपति यांणी राजमान्य राजश्री स्वइप्रभृ चिटनवीस यास आज्ञा केली ऐसी जे :—तुमचेविशीं कित्येक* राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यांणीं विनंति केली त्यावरून कळों आलें. ऐसियास, तुम्ही स्वामीचे कदीम[1] विश्वासू सेवक आहां तुमचे हातें सेवा घेऊन तुमचे चालवणें स्वामीस अगत्य आहे. याकरितां कांहीं संदेह न धरितां, व अनमान न करितां, विलंब न लावितां, तेथून स्वार होऊन स्वामीसंनिध दर्शनास येणे. स्वामी तुमचें पूर्ववत चालवितील. येविशीं आनमारिसें[2] न मानितां सिताब[3] स्वार होऊन येणे. येविशीं सविस्तर पंडित मशारनिल्हेनीं लिहिलें आहे त्यावरून कळों येईल. जाणिजे. बहुत काय लिहिणें. मर्यादेयं[4] विराजते.[4]



* बहुप्रकारें. १ जुने, पुरातन. २ भिन्न असें न मानतां, संशय न धरतां. ३ जलद. ४ पत्र पुरे करण्याची त्या वेळची सरकारी पद्धत; अर्थ—ही मर्यादा शोभते.

# ७०. चंद्रसेनास फितुरीबद्दल शासन

पेशवेदप्तर ३१,
पत्र नं० ११०, पृ० ९६

१६-११-१७११

[ या व मागील पत्रांवरून इ. स. १७०७-११ या काळांत शाहूस आपलें आसन स्थिर राखण्यास व फितुरीचा बंदोबस्त करण्यास फार दक्षता घ्यावी लागे असें दिसतें. ]

स्वस्ति श्रीराज्याभि शके ३८ खरनाम संवछरे कार्तिक बहुल त्रितीया भृगवासरे[1] क्षेत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपती स्वामी याणी देसमुख व देसपांडे पा। सुपे बारामती यासी आज्ञा केली येसीजे. पा। मजकूरचे बाबतीपैकी[2] चौथाई चंद्रशेन जाधव याकडे पेसजी मुकासा[3] होता तो दूर करून हाली राजश्री संताजी जाधवराऊ सेनापति याकडे जमावाचे[4] बेगमीबद्दल[5] मोघम[6] येवजी[7] मुकासा दिल्हा असे. तरी तुम्ही यासी रुजू[8] होऊन सदरहू यैवज माइलेकडे[9] वसूल देणे जाणिजे.

१ शुक्रवार. २ वसुलाची बाब. ३ गांवच्या वसुलामध्यें हिस्सा. ४ फौज. ५ पुरवठा. ६ घाऊक. ७ रोख रकमेचा. ८ भेटणें. ९ मशारनिल्हेकडे.

# ७१. चिटणीस घराण्याची व खंडो बल्लाळाची एकनिष्ठा



सनदा पत्रें, पृ० २१८ } { इ० स० १७३४

## जिवाजी खंडेराव चिटनिवीस यांस इनाम गांवें दिल्याबद्दल पत्र

[ चिटणीस घराण्यास दिलेल्या या सनदेंत शिवाजी महाराजांच्या वेळच्या बाळाजी आवजीपासून शाहूकालीन जिवाजी खंडेरावापर्यंत झालेल्या चिटणीस घराण्यांतील पुरुषांच्या स्वामिभक्तीचें वर्णन केलें आहे. चिटणीस घराण्याच्या या स्वामिभक्तीस इतिहासांत तोड नाहीं. अद्‌भुत वाटणारे प्रसंग सनदेंत नमूद केलेले असल्यामुळें त्यांच्याबद्दल संशय घेण्यास जागा नाहीं. ]

स्वातिश्री राज्याभिषेक शके ६१ आनंदनाम संवत्सरे, चैत्र शुक्ल पंचमी, गुरुवासरे, क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी यांणीं, राजकार्य लेखन धुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री जिवाजी खंडेराव चिटनिवीस यांसी, आज्ञा केली ऐसी जे :—... ... तुमचे आजे बाळाजी अवजी, थोरले कैलासवासी स्वामींनीं[1] राज्य साधन केलें ते समयीं बहुतच श्रम साहस करून उपयोगी पडले. त्यानंतर दिल्लीस जाण्याचे प्रसंगी संकट पडलें असतां, बरोबर फार सेवा केली व राज्याभिषेकाचे समया उपयोगा पडोन स्वामींचे मनोरथ* सिद्धी केली. त्याजवरून संतोषी होऊन अष्ट प्रधानांतील पद द्यावयाची योजना केली असतां, चिटनिशीच वतनी परंपरेनें द्यावी ऐसी विनंती केली. यावरून प्रसन्न होऊन शपथ युक्त पत्र करून दिल्हें. नंतर थोरले

१ शिवाजी. *हा मनोरथ कोणता ? गागाभट्टास कोणीं आणलें ?

महाराज कैलासवासी जालीयावर कैलासवासी तीर्थरूप स्वामी[1] यांणी कोण्ही गैरवाका[2] समजाविल्यावरून राज्यभार[3] प्रसंगीं सरकारकून यासी शिक्षा केल्या. त्यांत यासही केली असतां, तुमचे वडील खंडो बल्लाळ यांणीं बहुत निष्ठेनें वागून, स्वामींस गोव्याचे लढाईंत शूरत्वें करून व समुद्राचे भरतीस स्वामीचा घोडा पाण्यांत पोहोणी लागला असतां धरून, उडी टाकून घेऊन निघाले. याजवरून बहुतच संतोषी होऊन, शपथ करून वचन दिल्हें. सर्फराज[4] केले. तोंही प्रसंग यवनाचें प्राबल्य होऊन विज्वर[5] जाला. स्वामींसही[6] यवनाचे संन्निध जाणें आले. तेथें गेलों असतां, कैलासवासी काकासाहेब[7] चंदीकडे जाऊन, राज्यरक्षण करण्याच्या प्रयत्नास लागले. तेव्हां जातेसमयीं त्यांसी संकट समय प्राप्त झाला असतां, त्यांस काढून देऊन आपण क्लेश भोगिले. त्यानंतर चंदीस जाऊन तेथेंही सेवा निष्ठेनें केली. तेथें संकटाचा प्रसंग प्राप्त होऊन, निघणें दुर्घट पडलें असतां, झुलपिकारखान व गणोजी शिर्के यांसी संधी करून दाभोळचे वतन दिल्हें होतें. तें शिर्के यांस देऊन त्यांचे मोर्च्यांतून[8] पाळण्यांत[9] बसवून, काढून घेऊन येऊन देशीं सेवा केली. त्यानंतर काकासाहेब समाप्त जाले[10]. यवनास दिल्लीचें व्यसन[11] प्राप्त जालें. तेव्हां स्वामींस त्यांनीं निरोप देऊन लाऊन दिल्हें. देशीं येणें घडलें असतां काकासाहेब यांची स्त्री आईसाहेब यांस, आपला पुत्र घेऊन राज्यभार करण्याची इच्छा होऊन, दुर्बुद्धि धरली. फौजा देऊन सेनापती व परशराम त्रिंबक प्रतिनिधी रवाना केले, त्याबरोबर खंडोबास दिल्हे असतां, स्वामींस गुप्तरूपें भेटून सेनापती व सरदार यांच्या खातरजमा[11] करून सर्वांस स्वामींचे लक्षी[12] आणिले. लढाई जाली. प्रतिनिधी पळून गेले. स्वामी विजयी होऊन, राज्यभार साधन प्रसंगांत सर्व स्थळें व सरदार व प्रतिनिधी सरकारकून यांस स्वामींचे लक्षी लागण्याचे उद्योग बहुत केले. पुढें तुम्हींही त्याअन्वयेंच[13] स्वामींचे ठायीं

---

१ संभाजी. २ बनावट. ३ राज्यकारभार करीत असतां. ४ उन्नत (सर्फराजी—बढती). ५ प्राणांतिक, भयंकर. ६ स्वतः शाहू. ७ राजाराम. ८ चौकी पहारा. ९ गाडीचा साटा. १० मृत्यु पावले. ११ मोगल बादशाहास दिल्लीची गादी मिळविण्याची चिंता लागली. ११ संदेहनिवृत्ति. १२ अवधान, अनुसंधान (सर्वांस स्वामीचे पक्षाकडे आणले असा भावार्थ). १३ त्याबरहुकम, त्याप्रमाणें.

एकनिष्ठता धरून आंगरे वगैरे मातुश्रीचे लक्षांतील सरदार स्थळें वगैरे स्वामींचे लक्षीं वागण्याचा उपयोग (उद्योग?) करीत आहां. याजवरून तुम्हावर कृपा करणें अवश्य जाणोन, चिटनिशी तुम्हांस पूर्वी शपथयुक्त दिल्ही आहे. ती व कारखानिशी[1], जमेनिशी[2] दोन धंद राज्यांतील दिल्हे. त्याप्रमाणें करार करून देऊन चिटनिशी वतनास गांव मोकासे व जमिनी लागले आहे. ते इनाम करार करून दिल्हें वितपशील:— ………… येणेंप्रमाणे महाल व गांव व जमिनीं तुम्हांस इनाम करून दिले असेत. तरी तुम्ही व तुमचे पौत्रपौत्रादि वंशपरंपरेनें सदरहूचा अनुभव करून[3], सेवा करून सुखरुप रहाणें. जाणिजे. येणेंप्रमाणें सेवा केली आहे. वतनी धंद करून इनाम खाणें. बहुत काय लिहिणें. मोर्तब.

---

# ७२. मराठ्यांच्या इतिहासांतील पन्नादाई

राजवाडे खंड ८.
ले० १६९, पृ० १९७

इ० स० १७४५

## श्रीराजाराम

[ इ. स. १७४५ चे आज्ञापत्र या ठिकाणी दिले आहे. शिवाजी व शाहू याचें भांडण चालू असतां त्याच वेळी शिवाजी-संभाजी या सावत्र भावांचे भांडण उद्भवले. शिवाजी व ताराबाई हीं कैद झालीं. संभाजी कोल्हापूर-पन्हाळा येथें गादीवर बसला. पुढें शिवाजीस दोन पुत्र झाले; पैकीं पहिला मृत्यु पावला. दुसरा राजसबाई-संभाजी यांचे पक्षाकडून मारला जाईल, म्हणून तो जन्मतांच कुणा भवानी बाईच्या त्याच वेळी जन्मलेल्या मुलाशी

---

१ कारखान्यांचा हिशेब ठेवण्याचा अधिकार (अठरा कारखाने असत). २ वसुलाचें लिहिणें. ३ उपभोग घेऊन.

त्याची अदलाबदल केली. पुढे बदला पुत्र मारला गेला. शिवाजीचा पुत्र जिवंत राहिला तोच रामराजा होय. त्यास शाहूनें दत्तक घ्यावें असें इ. स. १७४५ त ताराबाई शाहूस सुचवीत आहे. ही भवानी बाई म्हणजे मराठ्यांच्या इतिहासांतील पन्नादाईच होय. ]

समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री सरकारकुनानी व समस्त सैना हिंदुपत[1] सरदारानी यासी आज्ञा केली ऐसी जे—कालपरत्वें आमचा प्रसंग विस्कळित होऊन चिरंजीव राजश्री सभाजी राजे व राजसबाई यांणीं गिरजोजी यादव व अंताजी त्रिमळ व लोक खासकेल[2] गडकरी व तुळाजी सितोळे यासी पुढें करून किल्ले पनाळा येथें चिरंजीव राजश्री सभाजी राजे यांसि राज्यपदास बैसविलें, आम्हांस संकटीं घातलें, बहुत निकड[3] केली. ते प्रसगीं चिरंजीव राजश्री शिवाजी राजे यांसि संतान सौभाग्यवती पार्वतीबाई यांसि दोघे पुत्र झाले. त्यापैकी पहिला पुत्र क्रमला[4]. दुसरा पुत्र त्यासी देवी सगर्भ होती. प्रसूत जाली. त्याचा फेरमोबदला करून हा मूल देवीच्या स्वाधीन केला. पाळग्रहण करविलें. सौभाग्यवती भवानीबाई सगर्भ होती. त्यानतर चिरंजिवास देवी येऊन काळवशें समाप्त झाले. समागमें सौभाग्यवती पार्वतीबाईनीं सहगमन केलें. त्यांचा पुत्र देवीच्या स्वाधीन केला. तो अद्यापवर तिजपाशीं सुखरूप आहे. सौभाग्यवती भवानीबाई पोटीसी होती. ती प्रसूत झाली. पुत्र जाहला. तो चिरंजीव राजश्री संभाजी राजे व राजसबाई यानी कपटबुद्धि करून मारिला. काय निमित्य म्हणून पुसिलें. त्यास त्याणीं उत्तर दिलें जे—राजश्री शाहूराजे यांची आज्ञा आपणास आहे, त्यावरून आपण अपाय केला, ऐसे जनांत सांगो लागले. कांहीं दिवस तैसेच गेले. त्याउपरि उभयतां चिरंजीवांचा[5] विवेक होऊन भेटी जाल्या... ...

—ताराबाईच्या आज्ञापत्रांतील उतारा.

---

१ पत—नांवलौकिक, हिंदु म्हणून गाजलेले (?). २ खासकेल = खासखेल—सेनापति. खासकेल ही बहुमानार्थी पदवी आहे. ३ निकड—तगादा, नेट (शिवाजी व ताराबाई यांस राजसबाई-संभाजी पक्षानें कैद केलें. इ. स. १७१२). ४ मरण पावला. ५ शाहू व संभाजी यांचा.

# ७३. पेशवे-नोंद

शाहू महाराज यांची रोजनिशी } { पृ० ४२

... ... ...

७ बाळाजी विश्वनाथ भट :—

पेशजीं सेनाकर्ते म्हणोन हुद्दा होता तो दूर करून पेशवाई सांगितली छ ९ जिलकाद सुरुसन अर्बा अशर मया व अलफ. महाल १६ किल्ले २ सरंजामास.

८ बाजीराव बल्लाळ :—

पेशजीं बाळाजी विश्वनाथ मुख्य प्रधान होते ते मृत्यु पावले सबब त्यांचे पुत्र बाजीराव बल्लाळ यांस पेशवाईचा धंदा सांगितला. छ २० जमादिलाखर सुरुसन अशरीन मया व अलफ मुक्काम मसूर. १३००० सालिना होन, शिवाय सरंजामीं महाल वगैरे.

९ बाळाजी बाजीराव प्रधान :—

पेशजीं बाजीराव पंडित प्रधान होते ते वैशाख बहुल द्वादशी रौद्र नाम सवत्सरे रोजीं मृत्यु पावले सबब त्यांचे पुत्र बाळाजी बाजीराव पंडित प्रधान यांस पेशवाई सांगितली, छ ११ रबिलाखर सुरुसन इहिदे अर्बैन मया व अलफ राजशक ६७ रौद्र नाम संवत्सरे आषाढ बहुल द्वादशी सौम्यवासर मुक्काम शाहूनगर. १३००० सालिना होन, शिवाय सरंजामीं महाल वगैरे.

# ७४. दंग्यामुळें हैराण झालेल्या रयतेची मनधरणी



इतिहाससंग्रह, पुस्तक ७ वे, अ० १।२।३, पृ० २७७ | इ० स० १७१३-१४

[ या आज्ञापत्रावरून इ. स. १७१३-१४ चे सुमारास शाहूचे आसन स्थिर झालें होतें असें म्हणण्यास हरकत नाही. राज्यकर्ते रयतेची किती काळजी वाहात याचा हे पत्र एक नमुना आहे. ]

"स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ४० जयनाम संवत्सरे, चैत्र बहुल[१] त्रयोदशी, गुरुवासरे, क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शिव ( शाहू ) छत्रपति यांनीं पारपत्यगार[२] व लेखक, तर्फ कळंबें यांसी आज्ञा केली ऐसीजे:—धामधुमेच्या प्रसंगाकरितां सांप्रत ज्याच्या मनास आलें, तो रोख करून[३] रयतेस उपद्रव द्यावयास लागल्यामुळें रयत तजावजा[४] होऊन, कित्येक गांव फुटोन रयत देशांतरास गेली. राहिली तेही जाणार. मुलुख खराब होणार याकरितां पेस्तर[५] साल्लीचा तह[६] केला असे......

"येणेंप्रमाणें तह करून, रयतेस अभयपत्रें सादर केली आहेत. तरी तुम्ही रयतेचा दिलासा[७] करून सदरहू लिहिल्याप्रमाणें तह चालवून रयत कष्ट कामास लावणें. याउपरी रयतेस कोणी जेवा[८], तूप, कोंबडें मागों नये. वेट वेगारीचा[९] तगादा देऊं नये. ऐसी आज्ञा केली. याकरितां जो कोणी हुज रातचा अगर सरकारकुनांकडील अथवा गडा किल्ल्याचा अथवा गैरतीचा[१०] कामगारीमुळें[११] अगर आमदरफ्तीमुळें[१२] मुलखांत जाईल, आणि तो जेवा अगर तूप, कोंबडें मागेल कीं रयतेस वेठवेगारीचा तगादा लावील, त्याचा

---

१ वद्य. २ अंमलदार, किल्ल्याचा हवालदार. ३ उद्देश मनांत धरून. ४ गर्भगळित. ५ पुढील. ६ करार, व्यवस्था. ७ आश्वासन. ८ कोरडा शिधा. ९ सक्तीनें मजुरीला लावणें. १० फालतू, कोणी तरी. ११ सरकारी कामासाठीं. १२ (आमद-येणें + रफ्त-जाणें) दळणवळण.

परिच्छिन्न[1] मुलाहिजा[2] न करणें. नतीजा[3] पाववून रयतेस उपद्रव न दे ती गोष्ट करणें. लेखनालंकार.[4]

---

# ७५. बाळाजी विश्वनाथाचे पेशवाईतील टिपणें

धडफळे यादी भा० इ० सं० इतिवृत्त, शके १८३५ | पृ० ३८२

[ या यादीवरून बाळाजी विश्वनाथाचे पेशवाईतील बरीच महत्त्वाची टिपणें मिळतात. यादीतील शेवटलें टिपण इ. स. १७६२ मधील आहे. अशा टिपणांतील प्रारंभीचा शक हा बहुधा त्या टिपणाच्या अखेरीस असलेल्या नोंदीला लागू असतो. दमाजी थोराताचें बंड, बाळाजीची कैद व सुटका, सय्यद बंधूंशी दोस्ती, दिल्लीस जाणे, याचे उल्लेख येथे आहेत. ही टिपणे स्थूल स्वरूपाची असून त्यांचा बिनचूकपणा निर्दोष नाहीं.]

... ... ...

१ शके १६३७ मनमथनाम संवछरे कार्तिकमासीं बाळाजी विश्वनाथपंत प्रधान याजकडील बाकोजी ढमढेरे फौजेनसी येऊन रंभाजी निंबाळकर याजकडील ठाणेदार पुण्यांत होते ते उठवून दिल्हे आणि प्रधानपंतांचे ठाणें बसलें.

१ शके १६४० विलंबीनाम संवछरे बाळाजी विश्वनाथपंत प्रधान व आबाजीपंत पुरंधरे यांस दमाजी थोरात रुस्तुमराव[5] याणीं धरून नेले हिंगणी[6] गावी गढीमधे[7] ठेविले खंडणी कबूल करून बोलीस[8] आपाजी माणकेश्वर

---

१ कोणत्याही प्रकारे (नाहीं). २ क्षमा, गय. ३ शिक्षा. ४ पत्राचे अखेर-निदर्शक शब्द. ५ हा किताब आहे. ६ हें खेडें तळेगांव ढमढेरे-पासून तीन कोसांवर आहे. ७ गांवचा मातीचा किल्ला. ८ करार पुरा होईपर्यंत ताब्यांत ठेवलेले लोक.

आंबीकर घतले व खातरजमेविसी[1] जामीन मोरो विश्वनाथ व गणेश नारायेण धडफळे यांस रुस्तुमराव याणी घेऊन पंतप्रधान सोडले सुटून आल्यावर पंतप्रधान याणी बारा हजार फौजेनसी नबाब आसबज्या[2] यांजसमागमे दिलीस गेले.

१ शके १६४० विलंबी संवछरी बाळाजी विश्वनाथ प्रधान याणी मोगलाईकडील सैदाची[3] कुमक आणून दमाजी थोरात रुस्तुमराव यांस धरून कैद केले पुरंदरास ठेविले हिंगणगांवची गढी पाडून मुळानदीत टाकली पांढरीवर[4] गाढवाचा नागर फिरविला.[5]

१ शके १६४२ शार्वरीनाम संवछरे बाळाजी विश्वनाथ प्रधान यांची स्वारी दिलीहून देसी आली राजश्रीची[6] भेट सातारचे मुकामी जाली नंतर तेच साली पंतप्रधान यास देव आज्ञा जाली चैत्र शुा ७ शके[7] मजकूर.

... ... ...

---

# ७६. शाहूची प्रतिनिधीस सनद

| | |
|---|---|
| शाहूची रोजनिशी<br>पृ० ५५, कलम १२० | इ० स० १७१५–१६ |

[ अंतर्गत यादवीच्या काळांत एकादा सरदार प्रतिपक्षाकडे गेला असला तरी स्थिरस्थावर झाल्यावर त्यालाही वतन देऊन राजी राखणें हें शाहूचें राजकारणी धोरण पुढील वतनपत्रांत व्यक्त होतें. ]

---

१ आश्वासनासाठीं. २ आसफज्हा ( निजाम-उल्मुल्क ). ही नोंद चुकली आहे. बाळाजी विश्वनाथ सय्यदाबरोबर दिल्लीस गेला, निजामाबरोबर नव्हे. ३ सय्यद. ४ गांवठाणावरील लोकवस्ती. ५ उध्वस्त केली. ६ शाहूची. ७ अन्यत्र शु. ६ ही तिथि आढळतें.

किता* वतनपत्र छ ९ रमजान वतन सरदेशमुखी प्रांत कडेविलीत येथील पूर्वी कैलासवासी राजश्री काकासाहेबी[1] अजरामऱ्हामत[2] करून दिलें त्याप्रमाणें अनुभवीत आले. स्वामीनींही वतनाचीं पत्रें करून देऊन वतन चालविलें. त्यावरी छ २० सवाल† सन इसने मशारनिल्हेकडून स्वामीसेवेस अंतर पडलें.‡ हे सबबे[3] अमानत[4] करून हुजूर ठेवून[5] जोत्याजी केदारकर यांचे स्वाधीन केलें होतें; ऐशीयास मशारनिल्हे स्वामींचे पुरातन सेवक, या राज्यामध्यें सहसाहस[6] बहुतच करून राज्य अभिवृद्धीस पाविलें. प्रस्तुत स्वामींची सेवा निष्ठापूर्वक करितात; यांचें वंशपरंपरेनें चालवणें अगत्य जाणून स्वामी कृपाळू होऊन प्रांत मजकूरची सरदेशमुखीस वतन करार करून दिलें आहे. वतनाचा उपभोग करतील. या वतनास हक्कलाजिमा[7] इनामत[8] व हल्लीं पूर्वील सनदांप्रमाणें देत जाणें. प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप[9] न करणें म्हणोन पत्रें....

---

*ज्यांचा ठोकळ नामनिर्देश एके ठिकाणी केला असून बाकीचा तपशील दुसरीकडे लिहिलेला असतो अशा बाबी. १ राजारामानें. २ बक्षिस (अजरा–अज्राहे–पूर्वक, रीतीनें. मऱ्हामत–कृपा ). †अरबी वर्षाचा दहावा महिना. ‡प्रतिनिधि प्रथम राजारामाचे पक्षास होता. ३ या कारणास्तव. ४ जप्त, सरकारजमा. ५ खुद्दांकडे घेऊन. ६ श्रमसाहस. ७ पिढीजाद अधिकाऱ्याचे हक्क. ८ बक्षिस. ९ हरकत.

# ७७. मराठ्यांकडे खानदेश–वऱ्हाडचे मोकासे

पेशवेदप्तर ३०,
पृ०१०, नं०१७अ

२४-१-१७१७

हें पत्र बाळाजीनें दक्षिणच्या सहासुभ्याची चौथाई आणण्यापूर्वीच मराठे ती वसूल करीत असल्याचा पुरावा आहे. बादशाहानें सनद दिली याचा अर्थ जबरदस्तीनें घडतें त्यास कायद्याचें स्वरूप दिलें.

(शाहू रुमाल १)

गा[1] रोजकीर्द

छ २२ सफर सु॥ सबा अशर

ताकीदपत्रें[2] राजश्री कानोजी भोसले याजकडे पेशजी मुकासे[3] दिल्हे आहेत तेणेंप्रमाणें करार करून ताकीदपत्रें दिल्हीं. माघ बहुल नवमी गुरुवासरें.

| | | |
|---|---|---|
| प्रा[4] वराड पैकीं | सरकार मेहकर पैकीं | सरकार बेतालवाडीपैकीं |
| ५० परगणें | ३ | ३ |
| १५ कसबे[5] | | |

सरकार वासीम ५, सरकार नांदेड ८, भागानगर ८, अशेरी खानदेश ८, माहूर १३, अमदाबाद ३२, उज्जनी १७, भेलसा १५, इत्यादि.

---

१ रवाना. २ इशारतपत्र, हुकूम. ३ वसुलामध्यें हिस्सा. ४ प्रांत. ५ गांव.

# ७८. सहासुभ्याच्या चौथाईची सनद

तह व करारमदार } पृ० १ { Treaties, Agreements and Sanads

[ ही मूळ सनद नव्हे. निजाम उल्मुल्क दक्षिणचा सुभेदार झाला तेव्हा त्याजकडून ही मूळ प्रतीवरून संमत करून घेतलेली आहे. ]

....छ २५ रबिलावल सन दोन फई[1] दसखत[2] जाली त्याचा तपसील :—
" वकील राजे शाहू* अर्ज करितो कीं, सा[3] सुभे दक्षणची चवथाई, पंधरा हजार फौज सुभ्यासमागमें चाकरीस ठेवावी लागते, त्याचे सरंजामास हजरत रफीउद्दरजात यांच्या कारकीर्दीच्या फर्मानाप्रमाणें आमच्या यजमानाकडे मकरर[4] आहे. त्यास हल्लीं सनद नवी इनायत[5] करावी." दसखत जालें कीं सनद देणें.

कैफियत :—

" राजे शाहू यांच्या वकिलाजवळ हजरत रफीउद्दरजात यांचे कारकीर्दीचे फर्मानाची नक्कल आहे. त्यांत मजकूर कीं, पंधरा हजार फौज सुभेदारासांगातें चाकरीस ठेवावी. त्याचे सरंजामास सा सुभे दक्षणची चवथाई राजे शाहू यांस इनायत जाली. पेशजीं हुसेनअल्लीखां यांच्या कारकीर्दींत चवथाईचे परवाने दक्षणच्या दिवाणीच्या दप्तरांतून घेतले नव्हते. परवाने कांहीं अवरंगाबाद सुभ्याचे महालचे सुभ्याच्या दिवाणी दप्तरांतून घेतले होते."

महिपत आनंदराव वकील राजे शाहू यांणीं ताहोद[6] लिहून दिल्हा, त्याचा तपसील :—

" सा सुभे दक्षणच्या सरदेशमुखीची खिदमत[7] हजरत रफीउद्दरजात यांच्या कारकीर्दीच्या फर्मानाबमोजीब[8] व दिवाणी दप्तरच्या सनदाप्रमाणें

---

१ हा शब्द लागत नाहीं. २ सही. *शाहू राजाचा वकील. ३ सहा. ४ ठरवलेली. ५ मेहरबानी. ६ करार. ७ सेवा. ८ प्रमाणें, बरहुकूम.

आमचे यजमानाकडे करार जाली. सबब ताहोद लिहून दिल्हा ऐसा कीं, यजमान खिदमतीच्या लाजिम्याविशीं[1] कायावाचामनें सादर राहून, रयतीस आबादी विशेष होय व सरकारची दौलतख्वाई[2] व मुफसदाचे[3] पारपत्य घडतें करितील; व पंधरा हजार फौज सुभेदाराच्या समागमें चाकरीस ठेऊन, रयतीस आपल्याकडोन राजी राखितील, व उजाड गांवाची लावणी तीन सालांत करोन ऐसा बंदोबस्त करितील, जे[4] दुष्टाचा उपद्रव होणार नाहीं. कदाचित् कोणाचे घरीं चोरी जाली, किंवा कोणाचा माल चोरीस गेला, तरी चोरास शिक्षा व ज्याचा माल त्यास देतील. कदाचित् चोरास शिक्षा करोन चोरीचे ठिकाण न लागे, तरी चोरीचे मालाची निशा[5] आपण करितील. शिवाय चवथ वे सरदेशमुखी अधिक[6] लोभ धरणार नाहींत, अगर जाहिर[7] जाल्यास जे रुपये ज्यादा तलबीं[8] करोन घेतील, ते सरकार-आलींत[9] दाखल करितील. हा ताहोद लिहिला असे. छ २४ रबिलावल सन दोन जलूसी. ''

सुभा एक सरकारा[10] दहा १०.

| | |
|---|---|
| सरकार दौलताबाद १ | सरकार पैठण १ |
| सरकार अहमदनगर १ | सरकार बीड १ |
| सरकार धारूर १ | सरकार सोलापूर १ |
| सरकार परांडे १ | सरकार जुन्नर १ |
| सरकार संगमनेर १ | सरकार जालनापूर १. |

---

१ हक्क. २ राज्याचें मित्रत्व (दौलतखा–राज्याचा हितेच्छू). ३ पुण्ड, बखेडेखोर. ४ की. ५ हमी. ६ 'पेक्षां अधिक' असा अर्थ. ७ माहीत. ८ मागणी. ९ श्रेष्ठ, सरकार-आलीत–सार्वभौम सरकारकड. १० सुभ्यापेक्षा लहान व महालापेक्षां मोठा विभाग.

# ७९. येसूबाईच्या सुटकेबद्दल आतुरता

मराठी रियासत, मध्य-विभाग, भाग १ ला, प्रथमावृत्ति पृ० १०३-१०४ } { २४-२-१७१८

"स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबीनाम संवत्सरे फाल्गुन शु. ५ इंदुवासरे, क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहूछत्रपतिस्वामी याणीं रा. रा. यादवराऊ मुनशी यास आज्ञा केली ऐसीजे. तुम्हीं माघ बहुल १३ चें विनंतिपत्र पाठविलें तें फाल्गुन शु. ४ स प्रविष्ट होऊन वर्तमान विदित जालें....रा. शंकराजी पंताच्या व तुमच्या लिहिल्यावरून चौथाई व सरदेशमुखी परवाना[1] व स्वराज्याची सनद ऐसे तीनही मतलब तों विल्हे लागले.[2] राहिले मातुश्री येसूबाईसाहेब व चिरंजीव रा. मदनसिंग[3] यांचें आगमन (दिल्लीहून?) जाले आणि स्वामीची व त्यांची भेटी जाली, म्हणजे नबाबाच्या वचनाप्रमाणें रा. शंकराजीपंत दरम्यान पडिले आणि तुम्ही कष्ट मेहेनत केली त्याची सार्थकता होऊन अवघेच मतलब सिद्धीस पावले. तर मातुश्रीचेविशीं व चिरंजीवाचेविशीं प्रतिक्षणीं स्मरण देऊन त्यांचे अविलंबें आगमन होय ते गोष्टी करणें. विस्तारें राजश्री शंकराजीपंत यांचे पत्रीं लिहिलें आहे त्यावरून कळेल." —य. रा. गुप्ते यांजकडील संग्रह.

---

१ आज्ञापत्र, अनुज्ञापत्र. २ निकालांत निघाले, साध्य झाले. ३ हा संभाजीचा दासीपुत्र.

# ८०. बाळाजीपंत भानूंचा दिल्लींत मृत्यु

मराठी रियासत, मध्यविभाग, भा० १ ला, प्रथमावृत्ति, पृ० ११४ | १-८-१७१९

## शाहूची भानू घराण्यास सनद

"राजश्री बाळाजी महादेव भानू बाळाजी पंडीत प्रधान यांजबरोबर मजमूनिसबतीनें फडणिसी लिहिण्याचें प्रयोजन होतें, सबब पंडित प्रधान फौजेसहवर्तमान दिल्लीस गेले तेव्हां बाळाजी महादेव स्वारीस होते. दिल्लीचे मुक्कामीं युद्धप्रसंग जाला ते समयीं बाळाजी महादेव मृत्यु पावले. याजकरितां रामाजी महादेव व जनार्दन बल्लाळ यांचें चालवणें स्वामीस आवश्यक जाणोन स्वामी उभयतांवरी कृपाळु होऊन मौजे वांकसई गांव इनाम दिला असे. ( छ २६ रमजान सु. अशरीन मया व अलफ )

---

मजमू–वसुली, निसबत–संबंधीं. फडणिसी–हिशेब ठेवण्याचें काम, वसुली-संबंधीं हिशेब ठेवण्याचें काम.

## बाळाजी विश्वनाथ यांचें हस्ताक्षर

राजश्री आबाजी पंत
श्चामी गोसावी
सेवक बालाजी विश्वनाथ
नमस्कार विनंती उपर तुम्ही
पत्र पाठविले की रा
हिरोजी यादव यास
तुम्हास समध नाही
हे गोष्ट उचीत ना
ही × येथील प्रसंग तुम्हा

---

× ब्लॉकमध्यें येथें कागदाच्या घडीची रेघ उमटली आहे.

# ८१. स्वराज्याच्या अधिकाराची अंमलबजावणी

भा०इ०सं०त्रै०मा०व० १७; अं०२; पृ०३५

श०१६४० श्रावणशु०१४ इ०१७१८ जुलै ३०

श्री

॥ दं[1] मा[2] अनाम[3] देसमूख देस (पा) डे प्रांत पुणे यांसि बालाजी विश्वनाथ प्रधान सुा तिसा अशर मया अलफ प्रांत मजकूर देखील[4] ठाणे आम्हाकडे स्वराज्य नवाबापासून करार जाले आहे तरी तुम्ही राजश्री रंभाजी निंबालकर याकडील कमाविसदाराकडे[5] येक रुका वसूल न देणे जो वसूल द्याल तो दुपट घेतला जाईल मारिले जाल येसे समजोन वर्तणूक करणें या कामास जासूद पाठविले आसेत यांस रुपये ५ पांच देणे छ १२ रमजान पा[6] हुजूर.

लेखनसीमा

पे॥[7] छ १९ रमजान

---

१ डाव्या अंगास बाळाजी विश्वनाथाचा वाटोळा शिका. शिक्यांतील 'न' मुलटा. २ मजकूर. ३ मनुष्यमात्र, सर्व. ४ सह, सुद्धां. ५ वसूल गोळा करणारा, कलेक्टर. ६ परवानगी. ७–पौ–पैवस्ती–पत्र पोंहोचल्याची तारीख.

# ८२. कान्होजीचें इंग्रजांस पत्र

कुलाबकर आंग्रे सरखेल, पृ० ३९-४० | नोव्हेंबर १७२०

[ कान्होजीचें हें पत्र राजकारणी पत्रव्यवहाराचा एक निवडक नमुना आहे. ]

मशारनिल्हे गव्हर्नर यांचें पत्र मिळालें. सर्व मजकूर विदीत झाला. ( निष्कर्ष एकच कीं ) आज तागायत तुमच्या आमच्यामध्यें जें वैर उत्पन्न झालेलें दिसत आहे तें माझ्या प्रयत्नामुळेंच. जें दुसऱ्याच्या मालकीचें तें आपल्या आधीन करून घेण्याची इच्छा करणें समंजस बुद्धीला वावगें वाटत नाहीं. तसेंच अशा प्रकारचे अपमान म्हणजे पर्यायानें चांचेगिरीच आहे*......

दुसऱ्याच्या मालकीची वस्तु आपल्या आधीन करून घेण्याचे बाबतींत म्हणायचें तर असल्या महत्त्वाकांक्षेपासून ( आपल्यासारखे ) तागडीधर व्यापारी अलिप्त आहेत असें मला वाटत नाहीं याचें कारणहि उघड आहे. जगाचा हा शिरस्ताच आहे. परमेश्वर स्वतःचें असें कांहींही अविलंबानें[1] देत नसतो; तो एकाचें काढून दुसऱ्यास देत असतो. हें परमेश्वराचें करणें वाईट कीं चांगलें हें कोण ठरविणार ? एक विवक्षित राजसत्ता हिंसा, अपमान व चांचेगिरी या त्रयीच्या बळावर चालली आहे ( अशी निंदा करून ) असें म्हणणें हें व्यापारी लोकांना तर मुळींच शोभत नाहीं. कारण याचा अवलंब चार पातशाहीशीं टक्कर खेळणाऱ्या महाराज शिवाजींनींही केला व स्वराज्यस्थापना केली. याच उपन्यासानें[2] आमची सत्ता सुरू झाली. आणि कोणी खरें मानो वा न मानो याच साधनामुळें ती टिकूं शकली आहे.

---

* येथपर्यंत ज्या पत्राला उत्तर लिहिलें जात आहे त्याचा निष्कर्ष सांगितला.
१ सत्वर. २ उपक्रम.

आमची सत्ता चिरस्थायी झाली इतकेंच नव्हे तर ती पुढें तशी राहील किंवा नाहीं याची जाणीव गव्हर्नर साहेब यांना त्याचप्रमाणें त्यांचे मागें होऊन गेलेल्या अधिकाऱ्यांना बरोबर आहे. माझा आग्रह मशारनिल्हेंना कीं त्यांनीं आपल्याशींच जरूर विचार करावा.

या जगांत कोणत्तेंहि तत्त्व चिरंतन नाहीं याविषयीं ( उगाच ) वाद कशाला ?

---

## ८३. कान्होजीचें राधाबाईस पत्र

पे० द० ९, पत्र ५२, पृ० ३४ } { काळ अनिश्चित

[ सबंध पत्र एकहातचें, कान्होजी आंगऱ्याचें बाळाजी विश्वनाथाची स्त्री राधाबाई यांस, बहुधा कान्होजीचें हस्ताक्षरच असावें. पत्रावरून पेशवे व आंगरे यांचा घरोबा व्यक्त होतो. पत्र बाळाजीच्या मृत्यूनंतरचें आहे. कान्होजीचा मृत्यु ४ जुलै १७२९ कुलाबकर आंग्रे, पृ० ४८ पहा. ]

श्री

गंगाभागिरथी समान राधाबाई यांसी

प्रीतिपूर्वक कान्होजी आंगरे सरखेल दंडवत उपरी येथील कुशल वैशाख बहुल पंचमीपर्यंत जाणून आपले क्षेम वर्तमान लिहित जाणे. सांप्रत तुमचें पत्र येत नाही ऐसे तर नसावे. आपले सर्वदा कुशल वर्तमान लिहीत जाणे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

# ८४. धार काबीज



पे० द० १३, पृ० ३, प० ४ } { ३-९-१७२४ (?)

## दिल्लीच्या वकिलाचें बाजीरावास पत्र

पो[1] छ २५ जिल्हेज (पुरवणी)
श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती. धारेचा किल्ला घेतला म्हणोन पृथ्वीपती[2] सक्रोध होऊन खान-दौराचे पुत्र समसामुद्दौलास व अजमखाना यांसी पांच हजार रुपये रोज करून व सवाईजीस सात हजार रुपये रोज द्यावेसा करार करून आज्ञा केली की तुम्ही उभयेतां गनीमास तंबी[3] करून चमेल[4] उतरों न देणें. दिल्लीच्या बाहेर समसामुद्दौलानीं डेरे[5] केले, तेही सत्वरींच सवाईजीस सामील होणार. सेवेसी श्रुत व्हावे म्हणून लिहिलें असें. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असो दिल्हा पाहिजे. हे विज्ञप्ति.



१ पैवस्ती. २ दिल्लीचा बादशाहा. ३ मार. ४ चंबळा. ५ कूचानंतरची छावणी.

# ८५. शाहूची दाभाड्यावर गैरमर्जी

पे० द० १२, पृ० ४, प० ५ } { १४-८-१७२४

## खंडेराव दाभाडे-शाहू

[ छत्रपति व दाभाडे यांचे संबंध पेशव्यांचे धोरणामुळें बिघडले ह्या कांहीं लोकांचा खराखोटा समज या पत्रानें बदलावा लागेल. शाहूचें फत्तेसिंग भोसल्यावर विशेष प्रेम असे. दाभाड्यास सेनापतिपद दिलें, पण त्याचा सरंजाम फत्तेसिंगास दिला. सेनापतीनें फौज ठेवायची तर पैसा पाहिजे. तो त्यानें मागितल्यावरून शाहूनें फत्तेसिंगाच्या अंमलाखालचे मोकासे खडेरावाकडे लावून दिले. पण फत्तेसिंगानें तें न मानून आपल्या गांवांचा वसूल आपण घेणें चालू ठेवलें अशीं सातआठ वर्षे गेलीं. तेव्हां दाभाड्यानें दुसरीकडचे महाल आपल्याकडे लावून घेतले तों शाहूनें ते खाजगतसाठीं आपणांकडे घेऊन त्याचा वसूल करण्यास आपलीं माणसें पाठविलीं. अशा स्थितींत माझा अपराध तरी काय ? असा प्रश्न खंडेराव शाहूस मोठ्या अजीजीनें विचारीत आहे. ]

श्री

......माहाराजांनी कृपालु होऊन सेवकास सेनापति हें पद येथास्थित देऊन गौरविलें. त्याप्रा स्वामीचे प्रतापे सेवाहि येथाशक्ति करून दाखविली. जैसे तैसे सा[१] महिन होते. पुढें राजश्री फत्तेसिंग भोसले याजवर कृपालु होऊन सरंजाम त्यास दिल्हा. उपनांव सेनापति सेवकास दिल्ही. त्या उपनांवाचे आश्रयावर माहाराजाचे पुण्यें जें जालें तें केलें. त्याजउपर सेनापतीस सरंजाम कांहीं तरी असावा येसे महाराजाचेच चित्तांत आले ते समई थोडासा दिल्हा. तो मानिलेकडील[२] अमलांत दिल्हा. असो. जे धण्याने दिल्हे तेच लक्षाचे[३] जागा मानून समाधाने येथील अमल मागतां मागतां सात आठ वर्षे अति-

१ सहा. २ मशारनिल्हे ( फत्तेसिंग ). ३ बहुमोलाचे.

क्रमिली. परंतु रुपयास संबंध नाहीं.[1] अगदीं[2] येवज[3] राजश्री फत्तेसिंगबावा याजकडेच गेला. निदान उपाय नाहीं तेव्हां मग त्याचे वलणाचा[4] सरंजाम त्याणी ठेविला. आम्ही इकडे[5] तीन माहाल गतवर्षी लोकांस देऊन दोनी हजार फौज देऊन स्वामीकार्यावर आणिली. आतांही फौज सिद्धच आहे. जे समई कार्य उपस्थित होईल ते समई कार्याची आहे येसे असतां सांप्रत महाराजानीं आज्ञापत्र सादर केले कीं निंबाईत[6] खाजगीकडे मुकासा ठेऊन कमाविसदार विठल रंगनाथ पाठविले आहेत, आपले लोकास ताकीद करून माहालीचा अमल[7] सुरलित देणें म्हणून आज्ञा केली. येविषईची विनती सेवेसी पूर्वीही केलीच होती कीं, सात आठ वर्षे भागानगराकडील माहाल राजश्री फत्तेसिंगबावानीं अमल करून येवज घेतला त्याप्रा इकडील माहालीचा येवज आपण[8] घेऊन फौज ठेविली आहे, माहाराजानीं दया करून चालवणार धणी समर्थ आहेत म्हणून विनती केली. तिचा अनादर करून प्रस्तुत आज्ञापत्र सादर केले. याजवरून पूर्व वृत्तांताचा विशदे[9] लेख सेवेसी करणें लागला आणि चितातही सेवकाच्या उदासीनता आली. निमित्य[10] कीं समुद्रवलयांकित पृथ्वी धण्याची, धण्याने जे ज्यास दिल्हे तें सर्वत्र चालावे आणि सेवकास दिल्हे तें न चालावे येसा सेनापतिपदाचे ठाई अपराध कोणता आहे हें न कलेसे[11] झाले. कदाचित पदाचे[12] ठाई अपराध असिला तर आम्ही सेवक निरपराधी असता अपराधीपदाचे योगे अपराधी व्हावें यात विशेष काय आहे ? याजकरिता सेवकावर कृपा पूर्वीपासून धण्याची अनुपम[13] आहे तेणेंप्रा कूर्मावलोकन[14] करून सेनापतीचे ठाई अपराध असेल तो दूर करून निरपराधी सेवकास निरपराधपदी स्थापना करून सेवा घेणार महाराज धणी समर्थ आहेत. तेथें सेवकाने विशेष काय लिहिणें. विठल रंगनाथ सेवेसी निवेदन करितील. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

---

१ वसूल मिळाला नाहीं. २ एकूण एक. ३ ऐवज, वसूल, उत्पन्न. ४ वळणाचा, परिचयाचा. ५ या प्रांतीं. ६ महालाचें नांव. ७ सारावसुलीतील हक्क. ८ मी स्वतः (खंडेरावानें). ९ सविस्तर. १० कारण. ११ कळेनासें. १२ अपराध व्यक्तीचा नसून जागेचा असेल तर. १३ निरतिशय. १४ कूर्म—कांसव, आपल्या मनाशीं नीट विचार करून.

# ८६. शाहूचा सिसोदे संबंध

पे०द०३०, नं०३८, पृ०२७ } { ३१-५-१७२५ नकल

## स्वतः राजपूत असल्याचा विश्वास

श्री

पूर्वील राजपत्र राजमुद्रासहित शाहूमहाराज यांचे व बाजीराव बलाल प्रधान व श्रीनिवास परशराम प्रतिनिधि यांचे सिक्क्यासुधा त्याचा तर्जुमा.

स्वति श्रीराज्याभिषेक शके ५२ विश्वावसु संवछरे अधिक आशाढ शुा १ इंदुवासरे[1] क्षत्रिय कुलावतंस श्रीमंत स्वामी राजा शाहू छत्रपति राजश्री उतर देशाधिकारी वर्तमान भावी माहासंस्थानी[2] शोभासंपन्नयुक्त राहाणारे देवस्थाने[3] मालव[4] देश दक्षणदेशचे राहाणार प्रधान सिंदे व होलकर व पंडित माहाराष्ट्र देशचे व देवदैत्य यासी आज्ञा करितो. सिसोदे आमचे चुलतबंधु हाटसिन्ह याचे अवरस पुत्र व्याघ्रजित[5] सत्तावंत देश मेवाळ[6] येथें पिंपळगांवीं राहाणार ते रसज्ञविनय गुणेकरून मीमांसादिशास्त्रसंपन्न सत्पुरूष येकान्वय-उत्पन्न[7] प्रभु यास याजवर सर्व उपद्रव दूर करण्यास सर्वांनीं सर्व काल यास अखेर करून रक्षण करावे याकरितां आज्ञापत्र लिहिलें व अष्टप्रधान याणी सदैव प्रतिवर्षी बंधुपेक्षा उत्कृष्ट संभाळावे हें आमचें वाक्य रक्षण करावें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा अक्षेप[8] न करावा हेंच पत्र प्रिय मानावे. पिपले संस्थान लक्ष रुपयाचे आहे तेथें च्यार वर्ण राहातात याजकरितां आम्ही

---

१ सोमवार. २ मोठ्या संस्थानांत. ३ देवालय, संस्थानिक, पुजारी, माळ-व्याचे रहिवासी या सर्वांस. ४ माळवा. ५ आमचे चुलतबंधु हटसिंह सिसोदे यांचे औरस पुत्र व्याघ्रजित. ६ मेवाड. ७ एकाच वंशांत उत्पन्न झालेले. ८ हरकत, नवें पत्र नाहीं म्हणून हरकत घेऊं नये.

उपद्रव दूर करितो. या गावची मर्यादा सीमा खंडण करू नये. जो करील त्याचे पूर्वज नर्काप्रति पावतील. यवन याणी उपद्रव केल्यास डुकर भक्षिल्या सारिखे होईल हे आज्ञापत्र अधी पाहून वागावे. मोर्तब असे.

---

## ८७. माळव्याची वांटणी

धार संस्थानचा इतिहास, लेखक लेले. ओककृत, भाग २ रा, पृ० २९ | २६ मे १७२८

श्री

मा[१] अनाम[२] देशमूख व देशपांडे पा[३]
रतलाम सुबे मालवा यांसी

बाजीराउ बलाळ. प्रधान सुहूरसन तिसा आशरेन मया व अलफ पा मजकूर पेशजीच्या मुकाशियाकडून[४] दूर करून हल्लीं चिमणाजी बलाळ यांजकडे दिला आहे त्यांणीं आपले तर्फेने मुकासा वाटून दिला बीा[५]—

राजश्री उदाजी पवार याजकडे पा ।।· | राजश्री मल्हारजी होळकर याजकडे पा निमे ।।·

येणेप्रमाणे निमे निम दोघाजणास मुकासा दिला आहे; तरी तुम्ही यांशी रूजू[६] होऊन मुकास बाबेचा वसूल सुरळीत यांजकडे देणें छ २७ सवाल आज्ञा प्रमाण.

---

१ मशरूल-प्रसिद्ध. २ मनुष्यमात्र. ३ परगणे. ४ मोकाशाकडून, मोकासा गोळा करणाऱ्या अधिकाऱ्याकडून. ५ बित–बितपशील, तपशील येणे-प्रमाणें. ६ सादर.

# ८८. राजबंधूंचा समेट

इतिहासमंजरी, पृ० १७७, का० संपल्या० जुनी प्रत, पृ० ३९३ } { २७–२–१७३१

## सातारकर शाहू व कोल्हापूरकर संभाजी

[ राजबंधूंच्या भेटीच्या समारंभाचे वर्णनावरून तत्कालीन स्वागत-समारंभांतील चालीरीति चांगल्या प्रकारें कळून येतात.]

तह जाहला त्या समयीं प्रथम स्वारी साधारण नाम संवत्सरी सन इहिद्दे सल्लासीन माघमासीं साताऱ्याहून श्रीमन्महाराज शाहू राजे यांजकडून श्रीमन्महाराजा राजश्री संभाजीमहाराज छत्रपति यांसी न्यावयास आले...... नामी नामी लोकानिशीं शाहूमहाराज घोड्यावर स्वार होऊन आले. श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपतींची स्वारी हत्तीवर होती ते घोड्यावर स्वार होऊन बनवा बिछावल्या[1] होत्या तेथें येऊन उभयतां महाराज घोड्यावरून उतरले. परस्पर संनिध येऊन, ऐक्यता होऊन शाहूमहाराज यांच्या पायावरि डोई श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति याणीं ठेविली. महाराजांनीं परस्परें उभयतां बंधूंनीं अलिंगनें केलीं त्या वेळेस मोहरा व रुपये व सोन्याचीं फुलें व रुप्याचीं फुलें परस्पर सत्के[2] जहालें. त्या समयीं तोफेची सरबत्ती व नानाप्रकारचीं वाद्यें व शहाजाने[3] वाजवून आनंद जाहला. फाल्गुन शुद्ध ३ मंदवारीं[4] दोन प्रहरा याप्रमाणें भेटीचा समारंभ जाहला. तदनंतर शाहूमहाराज याणीं श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति यांचा हात धरून उभयतां बंधू एक अंबारीमध्यें हत्तीवर स्वार झाले, खवासखान्यांत[5] दोन मोर्चले[6] घेऊन संभूसिंग जाधवराव बसले. संपूर्ण फौजेच्या कोरगिरीमध्यें[7] जोहार[8] घेत कऱ्हाडापर्यंत गेले कऱ्हाडानजिक कृष्णातीरीं.

---

१·बनवा बिछावल्या—बसण्यासाठी मांडलेली बिछायत. २ ओवाळणी. ३ मंगलवाद्यें. ४ शनिवार. ५ अंबारींत खासे बसतात त्याच्यामागील जागा. ६ मोराच्या पिसांची चवरी. ७ कोरबंदी, रांग. ८ मुजरा.

मुक्काम जाहला. दक्षिणतीरीं श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपतींचा मुक्काम, उत्तर भागीं श्रीमन्महाराज राजश्री शाहूराजांचा मुक्काम होता, त्या डेरियापर्यंत[1] उभयतां महाराज गेले....शाहूमहाराजांच्या आग्रहानें उभयतां ऐक्यता असून साताऱ्यासि शिमगी पौर्णिमा व्हावी म्हणून ममतायुक्त बोलून श्रीमन्महाराज राजश्री संभाजीमहाराज छत्रपति यांसि घेऊन सातारियासि गेले, त्या समयीं संपूर्ण शहरचे लोक बाहेर येऊन उभयतां बंधूंचा समारंभ पाहून सल्के व खैरात[2] बहूत झाली. आणि साताऱ्यांत पेशव्यांच्या वाड्यांत मुक्काम जाहला. दोन महिने मुक्काम होता....शाहूमहाराज यांणीं रवानगी समयीं हत्ती व रंगविलेले घोडे सामानसुद्धां व ढालतलवार व जडावाचा खंजीर व दुस्तबादली[3] दिली, व रोख दोन लक्ष रुपये दिले, आणि रवानगी केली. बरोबर सरकारकून फत्तेसिंग भोसले फौजेनिशी देऊन श्रीमन्महाराज यांची स्वारी पन्हाळियासि पावती केली. शाहूमहाराज चार कोस घालवीत येऊन माघारे सातारियासि गेले. त्या वेळेस तहनामा जहाला त्याची यादी अलाहिदा असे. कलम.

---

## ८९. चिमाजीचें बाजीरावास पत्र

| | |
|---|---|
| पे० द० १३, पृ० ४९, प० ५६ | पो[4] १०-१०-१७२९ |

### पवाराशीं धोरण

[ व्यवहार साधावयाचा तर अशी चतुराई करावीच लागते. या पत्रावरून चिमाजीची हुषारी दिसून येते. ]

---

१ मोठा तंबू. २ दानधर्म. ३ दुस्ता—मानाचीं पांच वस्त्रें; बादली—भरजरीचें वस्त्र. ४ पैन्नस्ती—पत्र दाखल झाल्याची मिति.

पा[१] छ २७ रावल.
संध्याकाल

श्री

पुा[२] अपत्ये चिमणाजीनें कृतानेक नमस्कार उपरी. येथील क्षेम ता[३] छ २६ रबिलोवल यथास्थित असे. पहिल्या तहनामियात पवारास मालवा तिजाई[४] मोकासा होता त्याप्रमाणे आम्ही त्यास द्यावयास सिध आहो. येसें असता हाली त्यानी निमे मालवा मोकास द्यावा येसा आड[५] घातला आहे. त्यास सुभेदाराचेहि[६] विचारे त्यास निमे मालवा मोकास द्यावा येसे आहे. परंतु आमचे विचारास हे गोस्ट येत नाही. परंतु सुभेदारादेखता आम्ही स्वामीस पत्र* लिहिले आहे त्याचे उतर पस्ट[७] येक स्वामीनी ल्याहावे जे तिजाई मालवा जो पहिले मुकासा आहे त्या प्रमाणे हाली देऊ, जाजती देत नाही. आणि हवाला[८] अगर येक रुपया नख्त[९] द्यावयासी मिलत नाही येसे ल्याहावे व पोकळ समाधानाच्या थोरपणाच्या गोष्टी ज्या लिहिणे त्या कागदात ल्याहाव्या. परंतु कारभाराचा जाब पष्ट ल्याहावा. तो त्यास दाखऊ व स्वामीचे विचारे निमे मालवा कबूल करावा येसेच आले तर ते पत्र निरालेच आम्हास ल्याहावे. मग जैसा विचार बनेल तैसा करू. पैकीयाची गोष्ट तो स्वामीनी मान्य केलीच आहे. परंतु त्यास दाखवावयाचे पत्र ल्याहाल त्यात येक रुपया द्यावयास अनकूल पडत[१०] नाही येसे ल्याहावे. ये गोस्टीचा विचार तात्यास बोलाऊन करणे. विचार तो करून उतर पाठवावे.

---

१ पाठविलें. २ पुरवणीपत्र. ३ तागाईत, पर्यंत. ४ तिसरा हिस्सा. ५ अडचणीचा प्रश्न, आड घालणें—हट्ट धरणें. ६ मल्हारराव होळकर. *जें दुसरें पत्र असा अर्थ. ७ स्पष्ट. ८ मुखत्यारी, अधिकार. ९ रोख. १० परवडत नाहीं.

# ९०. माळव्यांत दयाबहादरचा पाडाव



ब्रह्मेंद्रस्वामी पत्रव्यवहार, पृ० ६८, लेखांक ४३ — ४ मे १७२९

## चिमाजी अप्पाचें पत्र

श्री

श्रीमत् परमहंस स्वामीचे सेवेसी :—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक सा० नमस्कार येथील क्षेम ताा वैशाख वद्य तीया पावेतो स्वामींच्या आशीर्वादेंकरून सुखरूप असो विशेष. तीर्थरूप राजश्री रायांनीं[1] माळवा प्रांतांत पाठविलें होतें. त्यास दयाबहादूर[2] युद्धास आला. स्वामीच्या आशीर्वादानें त्यास पराभवातें पाठविलें. सांप्रत फिरोन देशास आलों. आजच पुण्यास आलों. तीर्थरूप राजश्री राऊ बुंदेलखंडांत छत्रसालच्या साह्यास गेले आहेत. महमदखान बंगसाचें यांचें युद्ध मांडलें आहे.[3] स्वामीचा आशीर्वाद मस्तकीं आहे तेणेंकरून तेही यश घेऊन लौकरच माघारे येतील. स्वामींचें आशीर्वादपत्र आल्यानें फार संतोष होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. पौ. छ ५ जिल्काद सन सलासीन.



१ बाजीराव. २ दिल्लीच्या बादशाहातर्फे माळव्याचा सुभेदार गिरिधर याचा पुतण्या. ३ सुरू आहे.

# ९१. बंगषाचा पाडाव

राजवाडे खं० ३, ले० १४ } { ३०-४-१७२९

## पिलाजी जाधवाचें इंदूरच्या वकिलास पत्र

[ बाजीरावानें इ. स. १७२९ त महंमदखान बंगष या दिल्लीच्या बादशहातर्फें बुंदेलखंडावर चालून आलेल्या सरदाराचा जैतपूर येथें पराभव केला व छत्रसालाचें रक्षण केलें. छत्रसालानें याबद्दल बाजीरावास अडीच लक्षांचा मुलूख दिला. ]

' महमदखान बंगश प्रयागचा सुभा[1] छत्रसाल राजस्थान बुंदेलखंड यांजवर मसलत करोन चालोन आला होता त्यास आम्हीं व ते (छत्रसाल) एकच होऊन वेढा घालून बसलो होतो. इतक्यांत बंगसाचा लेक कायमखा तीस हजार फौजेनिशी छ ९ रोजीं आम्हावर चालून आला. त्याशीं लढाई झाली. ईश्वर इच्छेनें फौजनिशी हा बुडविला. तीन हजार घोडे व तेरा हत्ती पाडाव केले. अंताजी मानकेश्वर व दावलजी सोमवंशी सरलष्कर यांजकडे दोन हत्ती आले. वरकड आमच्या लष्करांतील सुखरूप आहेत. झुंजांत ठार झाले, त्यांची यादी लिहिली आहे, त्याप्रमाणें ज्याच्या त्याच्या घरीं वर्तमान पावतें करणें. आम्हीही मजल दरमजल येतो.

[1] सुभेदार.

# १२. डभईची लढाई

पेशवेदप्तर १२,
पृ० ३६, नं० ४६

२-४-१७३१

## बाजीरावाचें पत्र

[ बाजीराव एकीकडे आपण जिंकलेल्या लढाईची हकीकत देत असतां त्याबरोबरच दुसरीकडील लष्करी हालचालीना सूचना देत आहे. ]

तेरीख ११ सवाल

श्री

राजश्री कृष्णाजी कदम गोसावी यांसी

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो[1] बाजीराऊ बलाल प्रधान आसीर्वाद. सुहूर सन इहिदे सलासीन मया अलफ. राजश्री त्रिंबकराऊ दाभाडे सेनापति व बांडे, गाइकवाड, उदाजी पवार व निजामनमुलुकाची फौज येसी डबईस आली. आम्हीहि आपलेच फौजेनसी डबईनजीक दो कोसावरी दोन रोज मुकाम केला. नित्य सेनापति कोसावरी येऊन युध्यांस उभे राहात. तेथें युध्यास न बने यास्तव छ ४ सवाली कूच करून थवाई प्रा[2] डबई येथें आलो. सेनापति कुल[3] फौज जमा करून युध्यास आले. युध्य जाले. सेनापति ठार पडले. मलोजी पवार पडले; जावजी दाभाडे पडले, पिलाजी गाईकवाडाचा लेक पडला; उदाजी पवार पाडाव जाले; चिमाजीपंत धरून आणिले. पंधरा सतरा हत्ती व नगारे निशाणें पाडाव जाली. बाडे* गाईकवाड, आनदराऊ पलोन गेले. कुवर बाहादर जखमी आहेत; पलाले. तुम्हास कलावें यास्तव लिहिलें असे. तेथें मुस्तफीखान आहे त्यास व पिलाजीचे फौजेस ताराज[4] करणें. आपला अमल मुस्त[5] करणें. पैका मेलवणें[6]. जाणिजे छ ५ सवाल.

बाजीरावाचा
शिक्का

लेखन सीमा

---

१ स्नो—स्नेहांकित. २ परगणे. ३ सर्व. *बांडे. ४ हैराण. ५ भक्कम. ६ मिळविणें.

# ९३. पिलाजी गायकवाडाचा खून

शाहूमहाराज यांची रोजनिशी पृ० ८० } { १८-४-१७३२

[जोधपूरचा राणा अभयसिंग यास बादशाहानें गुजराथचा सुभेदार नेमलें. यानें मराठ्यांतर्फे गुजराथेंत अंमल बसविणारा पिलाजी गायकवाड यास तहाच्या वाटाघाटीच्या निमित्तानें बोलावून त्याचा दग्यानें खून केला.]

इसन्ने सलासीन मया व अलफ. जिलकाद ४.

[ १६१ ] राजश्री दमाजी गायकवाड यास समाधान पत्र जे, पिलाजी गायकवाड यासी धोगडसिंगानें[1] दगा[2] केला त्यामागें तुह्मीं हिंमत धरून अंगजणी[3] बरीच केली ह्मणून राजश्री यशवंतराव दाभाडे सेनापतीनें लिहिलें त्यावरून विदित जालें. तरी होणार ते गोष्ट झाली. त्याचा खेद न करणें. तुह्माविषयीं सेनापति यासी आज्ञा केली आहे, ते तुमचे उभारणी[4] करून चालवतील. तुह्मी त्यांचे हुकुमाप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणून पत्र १ वैशाख शुद्ध प्रतिपदा.

---

१ अभयसिंगाचा हस्तक. २ नाश. ३ पराक्रम. ४ ऊर्जितावस्थेस आणतील.

# ९४. राजपुत-मराठे स्नेह

मराठीरियासत, मध्यविभाग, भा० १, आवृत्ति १ ली, ३७०–३७१ | ६ ऑगस्ट १७३२ श्रावण व० १२, श० १६५४

## सवाई जयसिंगाचें नंदलालजीस पत्र

[ दिल्लीच्या बादशाहानें माळव्याच्या सुभेदारीवर गिरिधर बहाद्दर व त्याचा चुलत भाऊ दयाबहाद्दर यांची एकामागून एक नेमणूक केली. ते मराठ्यांस विरोध करीत. त्यांचा पाडाव करण्यासाठीं सवाई जयसिंगा-मार्फत नंदलाल मंडलोईसारख्या जमीनदाराशी मराठ्यांनी स्नेह संपादन केला. राजपूत-मराठे या हिंदूंनीं एक व्हावें असा त्या वेळचा मनसुबा होता. नर्मदेच्या उताराची व्यवस्था नंदलाल मंडलोईकडे असे. या पत्रांत जयसिंग नंदलालजीस बाजीरावाच्या पत्रांतील मजकूर कळवून आश्वासन देत आहे. गिरिधर व दयाबहाद्दर या दोघांचाही मराठ्यांनी पाडाव केल्या-वर खुद्द सवाई जयसिंगाचीच माळव्याच्या सुभेदारीवर नेमणूक झाली. ]

'सिधेश्री' १०८[१] महाराव[३] भाई नंदलालजी प्रधान ठाकर नरहर-दासजी कानुनगो[४] सवस्थान इंदोर. योगश्री[५] जेपुरसे[६] श्रीमहाराजा सवाई जेसिंगजीकृत प्रणाम बंचना[७]. अत्रकुशल, तत्रकुशल, श्रीजीकी कृपासे चाहिजेजी[८] आपरंच[९] हकीकत ऐसी के. ता. ५ जमादिलआवल सन गुदस्तका पत्र आपकु लिखा था कि जैसे आप मल्हाररावजी होळकर व राणोजी शिंदे कुल दखनसे वकील भेजकर[१०] बुलाये, ओर आपने भाईबेटे सरदार हजारो अदमी कटाकर[११] इनकु मालवेमें स्थापित किये ओर हमारे ( जयसिंगाच्या ) लिखनेपर इनकू पुरी मदत देकर टांकेदारोंसे[१२] ओर महालोंसे वसूल

१ सिद्धिश्री (सिद्ध आहे श्री ज्यास तो). २ एकशेंआठ श्री सिद्ध आहेत तो. पत्राचा मायना. ३ मोठा सरदार. ४ वसूलखात्याचा अधिकारी, ५ 'योगश्री' हें आदरार्थी उपपद. ६ जैपुराहून. ७ वाचावें. ८ श्रीकृपेनें सर्व यथास्थित असो, असा भावार्थ. ९ दुसरें असें की. १० पाठवून. ११ मारून. १२ ठेकेदार, मक्तेदार.

पोता* सुरू करा दिया. ये खबर दिल्लीके दरबारमें पोहोंचनेसे बादशहा सलामत[१] हमसे बहोत नाराज होकर लिखी है कि, रावसाहेबने ( जयसिंग ) कुल मालवेके सरदारोंका दिल आपने हातमें लेकर आप उनसे[२] मिले, इससे[३] हमारा ( बादशहाचा ) सुभा गारद करवाया, ओर मुलुक दुष्मनोंके दिलवाकर[४] तोजी[५] करा दी, तो कुच फिकीर नहीं. इसका बदला[६] सबको मिलेगा, ओर मरेटे तीन दफे[७] मालवेमें आये, ओर मारकर निकाल[८] दिये. एसा फिर[९] उसिमाफिक[१०] सजा[११] होकर निकाले जाते है. समालो[१२], यहांसे ( दिल्लीहून ) चढाईकी तारीख मुक्रर है एसा लिखा आया, सो[१३] हमने प्रधान बाजीरावजीको लिखा. उसपरसे बाजीरावजी पेशवा लिखते है, की, " ये सब मालवेमें हमारा जमाव डालना[१४], ये काम प्रधान रावनंदलालजी, ठाकोर नरहर दासजी ओर उनके[१५] सरदारोंका है. इन्होंका मालवेमें हक्क प्रधानी[१६], चोधरात[१७], व चोथान[१८] कानुनगोइ[१९], व भाईबेटे हक्कदार जो, मालवेमें है, उनके सवस्थानोका हक्क महाराजा गिरिधर बहादुरके खानदानसे[२०] मिला हुवा चला आया, वो निर्वेध हम चलाके[२१] जास्ती परवरसी[२२] करेंगे. दुसरे रावसाहेबसे एसा कोल[२३] है की, राजासाहेब गिरिधर बहादुर ये मालवेके मालवीराजा, इनोनें पादशहाके मदतगार होकर हमारे भाई चिमनाजी आपासे लढे. ये शके १६४८ के सालमें सारंगपुर मुकामपर रणमें झूज[२४] गये. इनके वंशमें मालवेका जो उत्पन्न आता था, उसका हिसाब हमने देखा. उनकी गादी कायम करके वेसाही[२५] बंदोबस्त चलावेंगे, एसा श्री नर्मदाके तीरपर कोल है " एसा लिखा आया. सौ[२६] आपको लिखते है की बादशहाने चढाई की है, तो

---

*स्वत: (हा गुजराथी शब्द आहे). १ ईश्वराकडून रक्षित असा. २ जयसिंगानें आपल्या सरदारांचें चित्त आपल्याकडे वेधून तो बाजीरावास मिळाला. ३ यासाठीं. ४ देऊन. ५ उजाड. ६ याचा परिणाम. ७ वेळां. ८ घालवून दिलें. ९ फिरून. १० त्याचप्रमाणें. ११ शिक्षा होऊन घालवून दिले जातील. १२ सांभाळा. १३ म्हणून. १४ आमचा जमाव घालावा, जमवावा. १५ त्यांच्या. १६ प्रधानकीचा. १७ पाटिलकीचा हक्क. १८ चौथाई. १९ धारा, वसूल ठरविण्याचा हक्क. २० घराण्यापासून. २१ जे हक्क चालत आले आहेत ते आम्ही निर्वेध चालवू. २२ आश्रय. २३ करार. २४ लढाईत ठार झाले. २५ तसाच २६ तर.

कुछ चिंता नही. श्रीपरमात्मा पार लगावेगा. बाजीरावजी पेशवासे हमने आपके निसबत[1] धर्मकर्म कोल वचन कर लिया है. अब किसी तरेका शक[2] न रखतें, इनका जमाव मालवेमें अच्छी तरेसे डालना. ओर हमेशा पत्र कुशलताका लिखता रहना. मालवेका बंदोबस्त सब आपके भरोसे[3] है.

---

## ९५. उत्तरेंतील अस्वस्थता

पेशवेदप्तर १४, पृ० १६, ले० ९ — १६-६-१७३३

[ या पत्राचा लेखक मुधाजी हरि बुंदेलखंडांत छत्रसालाचे मृत्यूनंतर जी अस्वस्थता माजली तिचें वर्णन करून या वेळीं आणखी फांयदा करून घेण्याची संधि आहे असें लिहितो. छत्रसालाने मरतेसमयीं (५-१२-१७३१) बाजीरावास ३३ लक्षांची जहागीर दिल्याचें प्रसिद्ध आहे. ती छत्रसालाने मरतेसमयीं दिली, कीं बाजीरावास छत्रसालाच्या मृत्यूनंतर मिळाली ? ]

स्वामीच्या पुन्यप्रतापे इकडे आगमन जालियाने इबरतीनेंच[4] बहुत कार्यें होतील. सवादोन लक्षाची जागीर दिधली आहे ती कांहीं विशेष नाहीं. येथील प्रसंग ऐसा दिसोन आला आहे कीं जे जागीर मागाल ते देतील. याच्या घरामध्ये[5] फितवा बहुत आहे. स्वज्ञा[6] मात्र लिहिली आहे. येथें स्वामी आलियावर सविस्तर विदित केले जाईल. निरधसिंगास[7] येक पत्र लिहिले पाहिजे कीं तुमचेविशाई मुधो हरीने लिहिले होते; तरी तुम्ही आपले समाधान राखून आपल्या कार्यास तत्पर असने. आपण येऊन[8] तेव्हा भेटीस येणे.

---

१ मार्फत. २ संशय. ३ भरंवसा. ४ इभ्रतीनें, नुसत्या वजनानें. ५ बुंदेलखंडांत. ६ संज्ञा, संकेत, खूण. ७ छत्रसालाचा नातु. ८ येऊं

# ९६. बाजीराव कर्जानें हैराण

ब्रह्मेंद्रस्वामी पत्रव्यवहार, १०३९, ले० ३२ } { १७३४(?)

[या एका पत्रानें बाजीरावाची स्वामिनिष्ठा, पेशवाईत विजय मिळत असतांही भासणारी पैशाची तंगी, बाजीरावास आलेला वैताग, शिलेदार, दाभाडे, गायकवाड वगैरेंची वृत्ति या सर्वांवर चांगला प्रकाश पडतो. मराठेशाहींत पराक्रम असला तरी लढाईचें अर्थशास्त्र (war finance) बरेंच मागसलेलें होतें यांत शंका नाहीं.]

श्री

श्रीमत् परमहंस परशरामबावा स्वामींचे सेवेसी:—

विनंति सेवक आज्ञाधारक बाजीराऊ कृतानेक विज्ञापना. महाराजांनीं खंडू-बरोबर आशीर्वादपत्र पाठविलें व कित्येक आज्ञा केली. तरी बावा, आम्हांस काय चिंता आहे ? तुम्ही जालेत गोसावी, आणि आम्हाकडे प्रपंच लाविला. या प्रपंचामुळें आम्ही जोड इतकीच केली कीं वीस लाख रुपये कर्जदार जालों. कर्जदारांचे नरकांत कुजतो इतकेंच मेळविलें. या दुःखास्तव गतवर्षी पिंपरीस आलों तेव्हां सारें तुमच्या हवालीं करून मोकळे होऊन देवाची सेवा करावी हा हेतु धरून स्वामीस विनंती केली. स्वामी कृपाळु होऊन आश्वासन दिल्हें "भार्गव तुझे ध्यानीं आहे. फत्ते तुझी होईल; व पैकाही उदंडसा मिळोन कर्ज फिटेल. सर्व साह्यकारी भार्गव आहे." तेवढे वचनावर दृष्टि देऊन होतों. त्यास चिरंजीव[1] तिकडे तुझा गेला होता. यश मात्र थोडेंबहुत आलें. पैका न मिळाला. लष्करचे हाल श्रीरंगपट्टणचे* वेळेस जाले होते तसेच जाले. आपण या गोष्टीचा शोध करावा. आतां नित्य उठोन कर्जदारांचे पाया पडावें. शिलेदारांचे पाया पडतां पडतां कपाळ छिनत[2] चाललें. आतां

१ म्हणजे स्वतः बाजीरावच. *हा श्रीरंगपट्टणकडे इ. स. १७२७ त झालेल्या स्वारीचा उल्लेख आहे. २ फुटत.

हीं सुखें आम्हांस नकोत. तुम्ही या आणि आपला कारभार संभाळा. अगर टाकून द्या म्हणाल तरी टाकून उठोन येतों...आम्हांस लेंकरास मुक्त कराल ऐसे वचन अभयपूर्वक आलिया एवढे आठ महिने आणीक जीव धरून पाहूं. यात जर आम्ही कृत्रिम लिहिलें असेल तरी आम्हांस तुझीच शपथ असे. काय तें उत्तर लवकर पाठविणें. तैसीच तजवीज करूं. तू देव कैसा कीं आमची कृत्रिमता[1] किंवा निर्मळता[2] न कळे. ध्यानांत येईना तेव्हां आम्हीच प्राक्तनाचे गाढे[3]. आमचें कपाळ फुटलें! तुमचा कोप आम्हां गरीबावर कशास ? जे दुष्ट असतील त्यांजवर करा की. तेणेंकरून प्रजा सुख पावे. आज दाभाडे, गायकवाड, बांडे कोटी कोटी रुपये खजीने आणि मीन[4] आम्ही तुझे पायांशीं व धन्याचे पायाशीं निष्ठेने वर्ततों ते अन्नास महाग झालों !

---

## ९७. पेशव्याचा उत्तरेकडे ओढा

पे०द०१७, पृ०३८, पत्र नं० ४७ | ५-१०-१७३५

[ हें पत्र पेशव्याचा सातारा येथील प्रतिनिधि पेशव्यास लिहीत आहे. उत्तरेपेक्षां दक्षिणेकडे मोहिमा केल्यानें मुलुख सहज ताब्यांत येईल, पैकाही अधिक मिळेल असें तो सुचवीत आहे. एकीकडे पेशव्याचें मन यासाठी वळवावें व दुसरीकडे यासाठी शाहूचीही संमति मिळवून ठेवावी असा त्याचा यत्न आहे. ]

छ २८ जालोवल[5]

पुरवणी तीर्थरूप राजश्री राऊ तथा
राजश्री आपा स्वामीचे सेवेसी

---

१ वरपांगीपणा, ढोंग. २ प्रामाणिकपणा. ३ गांढे, कमकुवत. ४ मासा. नम्रतेनें राहणारा असा अर्थ. ५ जमादिलावल.

विनंती. दक्षण प्रांतीच्या मनसब्याची[1] कल्पना आमच्या चित्तांत येऊन राजश्री गोविंद राऊ[2] चिटनीस यासी सांगून राजश्रीस[3] हटकविलें.[4] त्याचा उदार[5] निघाला ते वर्तमान तपसिले[6] पहिले[7] लिहिले आहे त्यावरून विदित होईल...... येसियासी स्वामीच्या चितात उत्तरेकडील मनसब्रियाचा विचार पूर्ण आला असेल यास्तव हे गोष्टीचा विचार ध्यानांत येणार नाहीं. तर उतर प्रांतीचा येक परगणा व दक्षेणकडील येक गाव येसा बराबर आहे. फौजा तिकडे[8] जातात त्यास पैका मिलतो ते कलतच[9] आहे. व तो मुलूक मोगलाचे तोंडी[10] आहे यास्तव दक्षण प्रांतीचा तालुक स्वामीचा जाहालियाने उतम आहे. इकडील पैका मिलावयाचा म्हणावे तरी स्वामीचा तालुका नसता नावाचे सलाबतीनेच[11] तमाम[12] वकील येऊन बाज[13] खातात व तालुका जाहाला आणि फौज सहवर्तमान पनालियापर्यंत स्वामी गेलियाने तमाम पालेगार[14] व येवन[15] रुजू[16] होतील व घोरपडे व उदाजी चव्हाण आदिकरून तमाम फौज स्वामीचे पदरी पडेल हा विचार स्वामीच्या चितात न येसा काये आहे?[17] परंतु आधी तो येथून[18] होणे मुस्कील[19]; कदाचित येथील विचार घडोन आला तर लक्ष प्रकारे[20] करावा. उतरेकडील मनसबा चितात आणून हे गोस्ट टाकावी येसे नाहीं. पत्राचे उतर पाठवावे, तदनुरूप येथें बोलू. राजश्री बोलिले आहेत की राजश्री बावा[21] आलियावर सिधांत[22] करू. त्यास या विचारास कोणी संमत देणार नाहींत. माहाराजानींच विचार ध्यानांत आणून करणें ते साहेब येख्तयारीनें[23] केलिया अवघे संमत देतील वगैरे गोष्टी बलकटीच्या[24] बोलाव्या तर स्वामीची मर्जी कलली[25] नाहीं. तरी उतर पाठवावे तदनुरूप वर्तणूक करू. सेवेसी श्रृत होये हे विज्ञापना.

---

१ मसलत, अंगीकृत कार्य. २ हा शाहूचा चिटणीस. ३ छत्रपती शाहू. ४ विचार अजमावून पाहणें. ५ उदगार, विचार. ६ सविस्तर. ७ प्रथमच. ८ उत्तरेकडे. ९ पैसा किती मिळतो तें दिसतच आहे. १० सरहद्दीवर. ११ धाक, दरारा. १२ सर्व. १३ पीक. १४ दक्षिणेकडील फौजबंद जमीनदार; हे स्वतंत्र बाण्याचे असत. १५ मुसलमान. १६ सादर. १७ हा मुद्दा स्वामीस सुचण्यासारखा नाहीं असें नाहीं. १८ सातान्याहून शाहूची संमति मिळणें असा अर्थ. १९ कठिण. २० हरएक प्रकारें. २१ नारोराममंत्री. २२ निर्णय. २३ स्वतःच्या अधिकारानें २४ दृढपणा आणणान्या. २५ कळली.

# ९८. दिल्लीवर स्वारी



ब्रह्मेंद्रस्वामी पत्रव्यवहार, लें० २७, पृ० २१ } { १५ मे १७३४

## बाजीरावाचें चिमाजीस पत्र

[ या पत्रांत उत्तरेकडील स्वारींतील हालचाली बाजीरावानें स्वतः चिमाजी आप्पास लिहिल्या आहेत. स्वारी करतांना कसकशी संधानें पाहावीं लागत हें या पत्रावरून कळतें. ]

श्री

श्रियासह[१] चिरंजीव राजश्री आपा यांसी:—

बाजीराव बल्लाळ आशीर्वाद उपरी येथील कुशलतागाईत. वैशाख वद्य छ० १५ जिल्हेज मुा नजीक सवाई जयनगर[२] जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें विशेष. बुनगे[३] बुंदेलखंडाचा राजा जगतराज[४] याचे हवालीं करून, बुंदेलखडांत रवाना करून, आम्ही सडे जाहलों...लांब लांब मजली वीस वीस कोसांच्या करून, दोन मजलींनीं छ० ७ जिल्हेजीं, दिल्लीस बारापुला[५] व कालिकेचें देऊळ उजवें हातें टाकून जाऊन, कुशबंदी नजीक शहर येथें मुक्काम केला. पुऱ्यास[६] आगी देऊन खाक शहर करावें, त्यास दिल्ली महास्थळ, पादशाहा बरबात[७] जालियांत[८] फायदा नाहीं. दुसरे, पादशाहाचे व खानदौराचे चित्तांस सलूख करावयाचें आहे. मोगल यांस सलूख करूं देत नाहींत. व अमर्यादा केल्यास, राजकारणाचा दोरा तुटतो. याकरितां आगी लावायचें महकूब* करून, पादशाहास व राजे बखतमल यांसी पत्रें पाठविलीं. शहरांतून दोन हत्ती व घोडीं, उंटें आलीं होतीं तीं सांपडलीं. लष्करचे लोकांनीं

---

१ श्री–संपत्ति, संपत्तिमान्. २ जयपूर. ३ सैन्याबरोबरीचे बिनलढाऊ लोक. ४ छत्रसालचा दुसरा मुलगा. ५ दिल्लीचा एक भाग, बारापुरा. ६ पुरा–शहराचा भाग. ७ नष्ट ८ होण्यांत. *तहकूब.

शहरचे लोक भवानीचे यात्रेस बाहिर आले होते, त्यांस झांबडा झांबड[1] केलें. दुसरे दिवशीं बुधवारीं, पादशाहाचे आज्ञेनें राजे बखतमल यांणीं उत्तर पाठविलें कीं, धोंडोपंतास पाठविणें. त्यावरून मशारनिल्हेस पाठवावें तरी आम्हो शहराजवळ आलों. यामुळें दिल्लीस गलबला झाला. यामुळें पाठविलें नाहीं. "भला मजुरा[2] व स्वार पाठवून देणें. मशारनिल्हेस पाठवून देतों. आम्ही शहरानजीक राहिल्यानें शहरास उपसर्ग लागेल. याकरितां कूच करून झीलच्या[3] तलावावर जातों." म्हणून उत्तर पाठवून आम्हीं कूच केलें.... तदनंतर आम्हीं झीलच्या तळावर[4] मुक्काम केला. संध्याकाळच्या चार घटका दिवस बाकी राहिला. तों कमर्दीखान पादशाहापुरावरून[5] आल्याची बातमी खबर आली. तेच क्षणीं आम्ही तयार होऊन गेलों. त्यांचे आमचे फौजेचें युद्ध जाहलें. बारात[6] गेलेला एक हत्ती राजश्री यशवंतराव पवार यांणीं घेतला. घोडीं उंट लष्करांत आली. त्यास दिवस अस्तमानास गेला. रात्रीचा दम धरून चौकीर्द[7] मोगल वेढून बुडवावा, तरी झीलचा तलाव सोळा कोस लांब...आह्मीं मोंगल पाठीवर घेऊन दाबांत[8] आणून बुडवावें, या विचारें कूच करून रेवाद[9] कोटपुतळी[10] मनोहरपुरावरून[11] आलों. परंतु अद्याप मोंगल सारे आलावर्दी व झीलच्या तलावरीं आहेत म्हणोन बातमी वर्तमान आलें. व मीरहसनखान कोका पहिल्या झुंजांत जखमी जाहला होता, तो मेला म्हणोन वर्तमान आलें... आह्मी ग्वालेर भडावर प्रांतें आतां बाकी साकी राहिली आहे ते वसूल करून मोंगल मागे मागे आले तरी त्यांस हैरानपेरोसान[12] करून, पाईची[13] धापा देऊन[14], धांवता धावतांच खराब होत तेंच करून, दाबांत आणून, गांठ घालून, राजश्री स्वामीचे पुण्यें व वडिलांचे आशीर्वादें बुडवितों. आमची चिंता न करणें. मुख्य गोष्टी पादशाहाचे व खानदौराचे चित्तांत सलूख

---

१ झोंबाझोंबी, लुटालूट. २ मोबदला, भत्ता, मुजरा. ३ झील म्हणजेच तलाव. ४ मैदान. ५ हें शहर कोठें आहे? ६ (?) ७ चारी बाजूंनीं. ८ चापांत, अडचणीत. ९ रेवाडी, दिल्लीच्या दक्षिणेस एक गांव. १० जयपूरच्या ईशान्येस ७४ मैलांवर. ११ जयपूर संस्थानांतील एक लहानसें गांव. १२ हैराणपरेशान, त्रस्त व चिंताक्रांत. १३ पायदळ. १४ दमवून.

करावयाचें आहे. मोंगल यांणीं हिंमत धरली आहे. त्यांतें शीरउपस्त[1] सादतखान आहे. याचा गर्व हत श्रीसंकल्पें जाहलियास सर्व मनोदयानुरूप होईल. जरी मनोदयानुरूप सलूख जालिया करूं; नाहींतर सलूख करीत नाहीं. दिल्ली भवतां मुलूख खालसा केला. पुढें सोनपत पाणिपत यमुनापार मुलूख राहिला; तोही ताराज[2] करून, मोगल अन्नास महाग होत ऐसेंच केलें जाईल. मागाहून होईल तें वृत्त तुम्हांस लिहून पाठवूं. कदाचित् मोंगल दिल्लीस राहिले, तरी आगरियास जाऊन अंतर्वेदींत[3] उतरून, मुलूख कुल मारून ताराज करितों. नबाब निजामनमुलुख यांणीं गडबड केली, रेवा[4] उतरले, तरी तुह्मीं मागें शह येणें, पेशजी लिहिलें आहे त्याप्रमाणें करणें, मारून ताराज करणें. इकडेस सक[5] नाहीं. तिकडेसही नाहींसा करणें. निजाम यास पायबंद असलिया उत्तम आहे. लोभ असो दीजे हे आशीर्वाद.

---

## ९९. शाहूची दाभाडयास ताकीद

ऐतिहासिक पत्रव्यवहार, पृ० १८, ले० २३ | शके १६५९ सन १७३७

श्री

राजमान्य राजश्री येशवंतराव दाभाडे सेनापति यांसी आज्ञा केली ऐसीजे. राजश्री बाजीराव पंडित प्रधान उत्तर प्रान्तास जातात, त्यास आपली फौज सामील करणें म्हणून तुम्हांस आज्ञा केली होती. परंतु फौज त्यासमागमें दिली नाहीं व हुजूरही यावयाचा प्रसंग जा (ला ?) नाहीं. रनालियास[6] कालहरण करीत राहिले आहां, यावरून काय म्हणावें; तुम्ही सेनापति आणि हे

---

१ डोकें वर करून. २ उध्वस्त. ३ गंगायमुना यांमधील प्रदेश. ४ नर्मदा. ५ शक, दरारा, जोर. ६ गांवचें नांव.

तूर[1] तुमची सेवा करून नंगनामोष[2] करून घ्यावयाची हौस असतां ईरे[3] व उमेद धरीत नाहीं. तेव्हां पुढें तुमचे हाते काय काय होणें ? हल्लीं रा प्रधान-पंतास व निजामनमुल्कास समीपता हल्लीं गांठ पडली असेल. औरंगाबादची फौज जमा जाह्ली आहे. ते निजामाकडेस कुमकेस जाणार. गेलियानें निजाम भारी होईल. याजकरितां इकडेच—ऊन[4] पाडावी. जाऊं न द्यावी. असें आहे तरी तुम्ही आपले सारे फौजेनिशीं राजश्री चिमणाजी बल्लाळ यास शिताबीनें[5] सामील होऊन स्वामी संतोषी होत असें करणें, पत्र पावतेक्षणीं फौजनिशीं जाऊन सामील होणें. दिरिंग[6] एक क्षणाचा न करणें. बहुत. शिताबीनें जाणें. घालघसरावर[7] सर्वथा न घालणें. सुज्ञे[8] असा[9].

---

# १००. निजाम उत्तरेस जातो

| | |
|---|---|
| पेशवेदप्तर १५, ले० २६, पृ० २२ | ८–४–१७३७. |

[ दिल्ली दरबारीं मराठ्यांचें वर्चस्व झाल्यास आपलें महत्त्व उरणार नाहीं हें जाणून निजाम घाईघाईनें उत्तरेस जात आहे. हें वर्तमान पेशव्याचा इसम चिमाजी अप्पास कळवीत आहे. निजामाच्या वरपांगी व खऱ्या उद्देशाची त्यानें चांगली फोड केली आहे. ]

राजश्री आपा* गोसावी यांसी

सकलगुणालंकर्ण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित देवज

---

१ (?). २ कीर्ति. ३ ईर्ष्या. ४ कमी. इकडेच शह देऊन ती कमजोर करावी असा अर्थ. ५ शिताफी, कौशल्य. ६ दिरंगाई. ७ टंगळमंगळ. ८ समजूतदार. ९ आहांत. *चिमाजी आप्पा.

सोमवंसी हिंदुराऊ कृतानेक दंडवत विनंती उपरी......प्रस्तुत रा. गणेश अनंत यांचे पत्र आले. छ० १७ जिल्हेज शुक्रवारी नवाबाचे† कूच जालें. उतावली[१] नदीवर गेले. मजल दरमजल हस्तनापुरास जातात. या प्रांते आबदुल रहिमखां व अनरुलाखां दिवाण येसे[२] पाच हजार स्वारानसी व नसरतजंग लेक औरंगाबादेस सुभा पाच हजारानसी येसे ठेवितात. वराडात सुज्यातखां याप्रमाणें बदोबस्त करून राजश्री स्वामीस व राजश्री पंतप्रधानास पत्रे लिहिली की, आपले सिरी यागीपणाचा[३] शेह[४] आहे तो खावंदाजवळ फेडावा. तुमचा आमचा भाऊपणा आहे त्यांत खता[५] नाही येसे कितेक प्रकारे स्नेहवादे लिहिले आहे. चितातील विचार भिन्न आहे. राजश्री पंतप्रधान हे दिलीस जाऊन सार्वभौमाची भेटी घेतात हा निश्चये जालियावर, आपली गत काये ? दुसरा सुभा येईल यास्तव तमाम उंबरावास[६] व दिलेश्वरास पत्रे पाठविली की आपण दर्शनास येतो. सरकारचा खजाना आहे. आपण तेथे आलियावर गनीमास मारावयाची काये हजत[७] आहे ? येसे लिहिल्यावरून सार्वभोमाने रा पंताचे भेटीस विचार महकूफ[८] करून नवाबास नानरोटी[९] पाठविली. ह्याजवरून हे जलदीने जात आहेत येसे वर्तमान लिहिलें आले. यास्तव गोसावियासी[१०] वर्तमान कलावें म्हणून लिहिले असे. या उपरी जो विचार पेरवी[११] कर्तव्य तो करावा. विशेष काये लिहिणे ? कृपा लोभ असो दीजे हे विनंती.

---

†निजाम. १ उतावळीनें, घाईनें. २ असे. ३ बागीपणा, बंडखोरपणा, स्वामिद्रोह. ४ आरोप. ५ लबाडी. ६ उमराव, सरदार. ७ हरकत. ८ तहकूब, रहित. ९ शपथक्रिया. १० श्रेष्ठ पुरुष. येथें चिमाजी आप्पा. ११ व्यवस्था, वाटाघाट.

# १०१. भोपाळची लढाई



ब्रह्मेंद्रस्वामी पत्रव्यवहार, पृ० ५०, ले० ३५ } { ८ जानेवारी १७३८

## निजामाचा पराभव

श्री

श्रीयासह चिरंजीव राजश्री आपा यांसी :—

बाजीराव बल्लाळ आशीर्वाद उपरी...अलीकडील वर्तमान तर नबाब लुनगे कांहीं भुपाळांत व कांहीं इस्लामपुरांत[1] टाकून सलुखाची संदर्प[2] लावून कोस दोन कोस चालतात. आमच्या फौजा चौतर्फा चालवून दाणागल्ला घांसलकडी बंद केली. एक रुपयास एक शेर अन्न जाहलें. तेही कोणास प्राप्त कोणास अप्राप्त जालें. घोडीं पळसाचा पाला खाऊं लागलीं. परवा छ० २५ रमजानीं मोंगल पठाणांनीं भाडयाचे बैल खादले. रजपुतास तो केवळ उपास पडो लागले. ऐसा प्रसंग जाहला. तेव्हां नबाब सर्वांचें दुःख पाहून बहुतच काहिला[3] होऊन सलोखाविसी त्वरा केली. जो नबाब चौथाई व सरदेशमुखीचीं नांवें घेत नव्हता त्याणीं माळवे दरोबस्त[4] ऐसें खासदस्तकानें[5] लिहून व लिहितां उच्चार केला कीं, "या मागें कधींच गोष्टी न जाहली ते या प्रसंगी जाहली" व नबाबांनी हे गोष्टी मान्य करणें दुरापास्त, पुत्राचे नांवें सुभेदारी करून समागमें आणिलें[6] त्या माळव्याची दरोबस्त सनद करून देतो. नबाबाच्या चित्तांत कल्पांत आला परंतु काय करील ? संकटाचा प्रसंग देखोन द्यावें लागलें. जं राजेरजवाडीयाचे आपले बरे इच्छू कश्यप[7] धरून होता ते त्यास हातचे सोडावे

---

१ भोपाळ जवळचें लहान गांव. २ संदर्भ, अनुसंधान, बोलाचाली. ३ -कासावीस. ४ एकूण एक, झाडून सर्व. ५ स्वतःच्या सहीनें. ६ स्वतःच्या मुलास माळव्याचा सुभेदार करण्यासाठीं त्यास उत्तरेस आणलें. ७ कच्छप, कास, जे राजेरजवाडे (स्वतःचें बरें करूं इच्छिणारे) त्यानें हातीं धरले होते.

लागले. हे दुःख लहान सामान्य न जाहलें. आपा, राजश्री स्वामींचें तपोबळ, वडिलांचें पुण्य समर्थ तरीच ही गोष्टी घडोन [आली]. अन्यथा होणें कळलेंच[1] आहे. आज पादशाहींत नबाबासारिखा अमीर दुसरा कोण आहे ? याणें जो पाया[2] घालून दिल्हा तो अवघ्यांत श्रेष्ठ आहे. नबाब अतःपर दिल्लीस जातील व समागमें कोणी द्यावयाचा तो देऊन नबाब दिल्लीस गेलियावरी या प्रांताचा व राजवाडीयांचा बंदोबस्त कर्तव्य तैसा करून होईल वर्तमान तें लिहून पाठवूं.

---

## १०२. पळ्याचें पारिपत्य करा

| | |
|---|---|
| **ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर चरित्र, पृ० ७६-७७** | इ० स० १७३९ |

### फिरंग्यावरील मोहीम

[ बाजीरावाचा लष्करी बंदोबस्तासंबंधींचा हुकुम या पत्रांत वाचण्यासारखा आहे. ]

" अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री रामचंद्र हरी गोसावी यांसी :—

सेवक बाजीराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा समान सलासीन मया व अलफ. फिरंगी यांचें आरमार खांदेरीच्या बाऱ्यावरीं[3] आलें. हे खबर अणजूरकर यांनीं राजश्री शंकराजी केशव यांस लिहिली. त्यावरून त्यांनीं सलाबत[4] खाऊन केळवें माहीम येथील लोक उठवून माघारे नेले. गनीमाची

---

१ एरवीं कितपत झालें असतें तें दिसतच आहे. २ जी व्यवस्था घालून दिली. ३ बारी—समुद्राचा धक्का, बंदर. ४ धास्ती.

सलाबत' वाढविली. एशियास वसई, अरनाळा आदिकरून लोकांचें सामान असें तसें नाहीं. नामांकित माणूस किती आणि गनीमाची सलाबत खातात! यावरून त्यांचे व त्यांजवळील लोकांचे मर्दुमीच्या तारीफा' काय कराव्या? असो. न व्हावें तें झालें! अतःपर गनीमावरी सलाबत' चढवून केळवें माहीम हीं स्थळें जबरदस्तीनें घेतलीं, तरीच त्या लोकांची व सरदारांची शाबास. नाहीं तर पैका खाऊन नाचीज[४] होतो! असो......तुह्मीं सदरहू साडेबत्तीसशें माणसांनिशीं केळवें माहीमास लगट[५] करून दोन्ही स्थळें हस्तगत करणें. मराठे, कानडे, परदेशी लोक आहेत. त्यास झुंझ[६] भांडणाचे प्रसंगीं कित्येक माणूस सलाबत खाऊन पळून जातात, याजमुळें कैद सलाबत होत* ऐसी-यास लाखोलाख रुपये खर्च करून लोकांस द्यावें; आणि प्रसंगीं पळ काढितील त्या पाजींचा मुलाहिजा काय? जे दालीची§ शरम धरून साहेबकाम करितील त्यांचें ऊर्जित करीतच आहों. पळून जातील त्यांचा मुलाहिजा[७] काय निमित्य करावा? ज्या ज्या वाटा पळून जावयाच्या आहेत तेथें चौक्या[८] ठेऊन, पळतील त्यास धरून परिच्छिन्न[९] डोचकीं मारणें. सरदार अगर प्यादा न म्हणणें विना एकाद दुसरा सरदार अगर परदेशी कानडे† मारल्याविना माणूस भय धरून वर्तणार नाहीं. यास्तव हेंच परवानगी जाणून पळ्याचें पारपत्य करणें......फिरंगी याच्या लोकांनीं वारें[१०] घेतलें आहे. तुह्मांवरही तोंड टाकितील. त्यांस जपून[११] एक वेळ कापून काढणें. ह्मणजे तेही बलखुद[१२] राहतील. जाणीजे छ० २६ रजब."

---

१ छाप, दरारा. २ प्रशंसा. ३ वर्चस्व. ४ ना-चीज–निरुपयोगी, व्यर्थ. ५ निश्चयाचा पाठलाग. ६ युद्ध. *(कैद) शिस्त बिघडते असा अर्थ. §शिपायाचें एक चिन्ह. शिपाईगिरीची. ७ गय, उपेक्षा. ८ पहारे. ९ निश्चितपणें. †परदेशी–उत्तर हिंदुस्थानी, कानडे–कानडी. १० अवसान धरणें, जोर करणें. ११ टपून. १२ ओळखून, वचकून (?).

# १०३. नादीरशाहास तोंड देण्याची तयारी

ब्रह्मेंद्रस्वामी पत्रव्यवहार, पृ० ६७, ले० ४२ — २४ मार्च १७३९

[ उभ्या हिंदुस्थानांत नादीरशाहाला तोंड देण्याची हिंमत कोणांत उरली नाहीं अशा वेळीं बाजीराव धडाडीनें त्यास तोंड देण्याची तयारी करीत आहे. ]

श्री

श्रीमत् परमहंस श्री स्वामींचे सेवेसी :—

चरणरज बाजीराव बल्लाळ प्रधान चरणावरी मस्तक ठेवून सा० नमस्कार विनति. येथील वर्तमान ता० छ० २४ जिल्हेज मुक्काम नसराबाद प्रांत खानदेश स्वामींचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनी कृपा करून आशीर्वादपत्र पाठविलें ते पावोन बहुत संतोष जाहला. ऐसेंच हरघडी पत्र पाठवून सांभाळ करावा. स्वामी समर्थ आहेत. यानंतर तोहमास्त-कुलीखान[1] उत्तरेकडून आले, त्याची व महमदशहा पादशहाच्या फौजेची लढाई होऊन दिल्लीची पादशाही बुडाली. पातशहास व निजामउल्मुल्क यास व कमरुद्दीनखान यास कैद केलें. खानदवरा युद्धामध्यें लेंकभावासह-वर्तमान मृत्यु पावले. सादतखान यांसी त्यांणीं धरून नेलें. त्यावर त्याणें तीन क्रोडी द्रव्य द्यावे (ऐसे,) करून त्याचा चाकर जाहला. त्याणें पांच सात हजार फौज समागमें घेऊन दिल्लीची बंदोबस्ती करावयाबद्दल पुढें पाठविली. मागा-हून आपण दिल्लीस येणार होते. आलेच असतील. दिल्लीस दाखल जाहले. यउपरी दक्षिण प्रांतें स्वार होणार आहेत. याजउपरी त्यास आणखी कोणी गनीम आहे असें नाहीं. आह्मी त्यास व ते आह्मांस गनीम आहों, अशास जों[2] ते तेथून निघाले नाहींत तों तमाम मराठया फौजा एक होऊन चमेली[3]

१ नादीरशहाचा सरदार. २ जोंपर्यंत. ३ चंबळा.

पार व्हावें, त्यास अलीकडे येऊं न द्यावें, असा विचार आहे. सर्व चिंता स्वामींस आहे. अरिष्ट तों मोठेंच आलें. वसईचें काम अद्यापि झालें नाहीं. आपले आशीर्वादेंकरून उत्तमच होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

## १०४. वसईवर हल्ला

ऐतिहासिक लेखसंग्रह, भा० १, पत्र १ लें

१६६१ वैशाख व. २
१३ मे १७३९

[ लढाईचें सविस्तर वर्णन करणारें हें खुद्द चिमाजीच्या हातचें पत्र आहे. ]

श्रीमन्महाराज राजश्री परमहंस बावा स्वामीचे सेवेशीं—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग समस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत वैशाख बहुल १ पर्यंत मुक्काम वसई स्वामींचे आशीर्वादें करून सुखरूप असो विशेष. स्वामींच्या अभयावरून वसईस मोर्चे[1] माघ शुा १० स लाविले. त्या दारभ्य[2] मोर्चे चालविले व धमधमे[3] चार पांच बांधिले. सुरंग चालविले. जे जे उपाय स्थळ हस्तगत करण्याचे ते केले. फिरंगी याणीं निराकरणाचे मंत्र[4] पूर्वी युद्धप्रसंग मोठ्या मोठ्या शूरांनीं केलें त्या न्यायें फिरंग्यानीं सुरंगावर व धमधम्यांवर गरनाळा[5] लाविल्या. सुरंग विछिन्न केले. पन्हाळे लावून पाणी सोडिलें. आगीचे बोंडे जळके टाकून त्यावर तेल, दारू, राळ टाकून चार चार रोज डोंब राही सारखा

---

बहुल—वद्य. १ मोर्चा—किल्ल्यातून माणूस आंत बाहेर न फिरकावें म्हणून बसविलेली चौकी. २ तदारभ्य—तेव्हांपासून. ३ उंचीवरून तोफा मारतां याव्या म्हणून मोठमोठे उंच धक्के बांधून त्यांवर तोफा चढवीत असत असे धक्के. ४ मसलत. ५ रुंद तोंडाची तोफ; हिचा उपयोग किल्ले, कोट यांच्या संरक्षणाकरितां होई.

कहरी* व बरकंदाजी† व तोफानीं [ मारगिरी ] फिरंग्यानीं निस्सीम ह्मणावी तैशी केली. तथापि स्वामींचा आशीर्वाद हें सबळ शस्त्र आम्हांजवळ, त्याचे प्रतापें इकडून तोफा लागू करून फिरंग्यांच्या तोफा मना केल्या. सफेली[1] पाडून लेश[2] केली. वसई जागा बाकाबुलंद.[3] सुरंगाचा उपाय नाहीं. परंतु स्वामींच्या कृपाकटाक्षें सुरंग चालवून दोही बाजूंनीं खांबावरती तक्तपोशी, त्याजवर दोन अडीच हात रेती टाकून दहा सुरंग नेऊन पोंचवून दोनशें पाथरवट लावून मोठमोठे चिरे फोडून सुरंगाचे बुधल्यांस जागा करून वैशाख शुा ५ सकल सिद्धता करून लोकांस बाजूस वांटून देऊन नगाऱ्याची इशारत करून, सुरंग उडतांच सर्वांनीं एलगारास[4] उठावें, बुरजावर शिड्या टेंकून चढावें, ऐसा करार करून वैशाख शुद्ध पञ्चमी बुधवारीं दोन घटका दिवस प्रातःकाळचा येतांच सुरंगास बत्त्या दिल्या. डावे बाजूचे सुरंग कांहीं उडाले; कांहीं उडणें होते; तोंच लोकानीं उतावळी करून कोटावर चालून घेतलें. तों दुसरे सुरंग तेच बाजूचे उडाले, त्याणें लोक दडपले व जाया व ठार जहाले. तसेच उजवे बाजूचे सुरंग एक दोन उडतांच बुरजांस वाट जहाली. खंदकानें लोक वरती चढले तों दुसरे सुरंग उडाले त्याणें वरती लोक चढले होते ते उडून गेले. लोक कचकरले. हिरमोड होऊन काम थंड पडलें...फिरंगी यांनीं सफेलीच्या आंतून वेढा (?) घालून पोतीं[5] भरून तोफा जोडून तयार होते. तेथें फिरंगी बळाऊन हुक्के, गरनाळा व दारूच्या पोत्यास आग लाऊन मार केला व रंजगिरीचा[6] मार सीमेपरता[7] केला. लोकांवर अग्नीचा पर्जन्य करून भाजून काढिले. तथापि स्वामीचें अभय आशिर्वादाचें वज्र-कवच लोकांचे अंगीं होतें, तेणेंकरून अग्नीची तमा[8] न धरितां लोकांनीं हत्यार बरे वजनें[9] केलें. फिरंगी यांनीं मर्दुमी शिपाईगिरी म्हणावी तैशी केली. त्याजप्रमाणें इकडील लोकांनीं भारती युद्धाप्रमाणें युद्ध केलें. या मागें युद्धें

---

*नाश. †गोळ्यांचा भडिमार. मना—तहकूब. १ तटाच्या माथ्यावरील भिंतीचा भाग; ज्यावरून बाहेरील शत्रूवर मारा करितां येई तो. २ साफ. ३ दुर्घट, फार बळकट. ४ निकराचा हल्ला. ५ दारूचीं पोतीं. हुक्का—बाँबसारखा गोळा. गरनाळा—मोठी कुलुपी गोळ्याची तोफ. ६ छरे. ७ सीमेपलीकडे, निस्सीम, अतिशय. ८ पर्वा. ९ उत्तम (वजा—तऱ्हा) रीतीनें.

बहुत जाहली, परंतु या लढाईस जोडा नाहीं. सर्व स्वामींचा आशीर्वाद! लोक बुरूज सोडिनातसे जाहले तेव्हां स्वामींच्या दंडप्रहारेंकरून फिरंगी धर्मद्रोष्टे बहिःपंथ होऊन अष्टमीस प्रहर दिवसास सलोख्यास आले. कौल घेतला. आठा दिवसांत कबिले[1] सुद्धां झाडून[2] जातोसे करार केले. त्याजवरून मार महकूब केला. फिरंगी यांनीं कबिले व वस्तभाव गलबतांत भरिली. काल वैशाख शुद्ध पौर्णिमेस फिरंगी झाडून गेले. स्वामींचे पुण्येंकडून जागा फत्ते जाहली. लष्करचे व हशमाचे[3] लोक सुरंगानें उडाले व जाया व ठार अदमासें पांच हजार, किंबहुना विशेष होतील. तैसेच फिरंग्याचे सात आठशें माणूस ठार व जायां जखमी निराळे जाहले. भारती युद्धाप्रमाणें युद्ध जाहलें वसई बांकी जागा. पश्चिमेस समुद्र. दक्षिणेकडे खाडी. पूर्वेकडे खाजणें चिखल. तिहींकडून किमपि उपाय नाहीं; एक उत्तरेकडून उपाय. तिकडे ही रेती, धर नाहीं. स्वामी साक्षात्कार ईश्वराचा अंश! स्वामीनीं वसई दिली! श्री वर[4] लिहिले ते शब्द अन्यथा कसे होतील! वरकड वसईची गोष्ट मानवी लोकांनीं ह्मणावी ऐसी नाहीं. वसई स्वामींचें आशीर्वादें फत्ते जाहली. श्रीचें सुदर्शन धर्मद्रोष्टे यांच्या मस्तकीं वज्रप्रहार होऊन टोपीकर म्लानवत् जाहले. अन्यथा वसई होती व फिरंगी आगीचा पुतळा होता! स्वामींचें कर्तृत्व संपणार नाहीं. स्वामींची महिमा स्वामी जाणत! आह्मां मानवी लोकांस काय कळे! वसई फत्ते होतांच सव्वाशें पुतळी पाठवून देणें व श्रीभुलोबास सव्वाशें रुपयेचा मुगुट घातला ह्मणून आज्ञा केली; त्यांजवरून स्वामींच्या आज्ञेप्रमाणें वसई फत्ते होतांच श्रीनिवास केदार याजबरोबर पुतळ्या सव्वाशें व भुलोबास मुगुट सव्वाशें रुपयेचा घातला ते रुपये सव्वाशें पाठविले आहेत. प्रविष्ट होतील...वर्तमान त्वरेनें विदित होण्यास्तव हें पत्र पुढें रवाना केलें असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

बहिःपंथ—बाहेरचा रस्ता धरणारे. कौल—वचन. १ बायकामुलें. २ सर्व. ३ परिवार, नोकरचाकर. बांकी—कठिण. खाजण—खाऱ्या खाडीचें कोरडें पडणारें पात्र. धर—आधार. ४ पूर्वी कधीं स्वामींनीं पत्र पाठविलें होतें त्यांत श्रीकारावर कांहीं शब्द लिहिले होते ते.

# १०५. मीच तुमचा बाजीराव!



**इतिहासमंजरी, पृ०२०३,**
**रा०खं०३,ले०१६७,पृ०१७६**

**११ जानेवारी १७३९**
**१६६० पौष व० १३**

[बाजी रेठरेकर लढाईत पडल्याबद्दल बाजीराव त्याच्या आईचें समाधान करीत आहे.]

श्री

गंगाजान्हवीसमान मातुश्री वेणूबाई काकी वडिलांचे सेवेसी :—

अपत्यं बाजीराव बल्लाळ साष्टांग नमस्कार विा येथील ताा पौष वद्य १३ पावेतों स्वकीय लिहित जाणें. विशेष पौष शुाा ११ स तारापुरावर हल्ला केला ते समयीं बाजी भिवराव* तोंडांत गोळी लागून कैलासवासी जाहले. ईश्वरें मोठें अनुचित केलें! तुम्हास मोठा शोक प्राप्त जाला. आमचा तर भाऊ गेला त्यास, तुम्ही वडील. दुःखाचें परिमार्जन करून विवेक करावा. त्यांचीं मुलें व चिमणाजी आप्पा आहेत, त्यांचेहि त्याजपेक्षां अधिक चालेल. परंतु आमचा भाऊ गेला. बाजू गेली. उपाय नाहीं. त्यास, चिमणाजी भिवराव हे पाठविले आहेत. हे सांगतील तें ऐकावें. सारांश, मीच तुमचा बाजीराव असा विवेक करून धीर धरावा. मजवर दृष्टी द्यावी. बहुत काय लिहिणें, लोभ कीजे हे विनंती.



*भीवरावाचें आडनांव रेठरेकर.

# १०६. पेशवेकुटुंबांतील परस्परसंबंध

पे०द०,भा०९ प०३५,पृ०२३ } { २८-१२-१७३९

## बाजीरावाचें मन संभाळण्याची काळजी

पौ[1] छ ११ सवाल श्री

तीर्थरूप मातुश्री[2] बाई वडिलांचे सेवेसी अपत्यें चिमाजीनें साष्टांग नमस्कार विनंति. येथील क्षेम ता छ ८ सवाल पावेतों समस्त सुखरूप असों विशेष. सिवाजी कृस्ण यास नासिकास चिरंजीवास[3] नोवरी पाहावयासी पाठविलें होतें तो आला कीं नाहीं, काय वर्तमान ते लेहून पाठविलें पाहिजे. माघ मासीं लग्न व मुंजी[4] नेमिली आहे. ऐसियास, राजश्री स्वामी* जेजुरीस माघ मासीं येणार. त्यांचे साहित्य[5] केलें पाहिजे. व घरचेहि साहित्य जाहालें पाहिजे. दोन्ही साहित्यें यकदांच होणार नाहीं. यास्तव वैशाख मासीं लग्नाचा व मुंजीचा मुहूर्त आहे कीं नाहीं ते मनास आणावें. वैशाख मासीं मुहूर्त असिला तरी वैशाखमासीं करावें, म्हणजे माघ मासी राजश्री स्वामीचें साहित्य होईल. तदनंतर वैशाख मासीं घरचे साहित्य होईल. आपले विचारें माघ मासींच उरकून घ्यावें ऐसेंच असिलें तरी साहित्य जसें होईल तसे होऊ. बहुत काये लिहिणें, कृपा केली पाहिजे. रायासीहि† चार गोस्टी नर्मतेनें बोलणें तैशा बोललो. सांप्रत पहिल्यापेक्षा बोलून चालून भोजन करून सुखरूप आहेत. देवाची दया आहे तर दिवसेदिवस संतोषीच होत जातील. चितात मात्र वेध[6] आहे तो कललाच आहे. सविस्तर नानाहि सांगतील त्याजवरून कलेल. हे विनंती.

---

१ पैवस्ती, पोहोंचल्याची तारीख. २ राधाबाई, बाळाजी विश्वनाथाची स्त्री. ३ सदाशिवराव. ४ मुंज रघुनाथरावाची; लग्न सदाशिवरावाचें. *शाहू. ५ वस्तुपुरवठा. †बाजीरावाशीं. ६ मस्तानीसंबंधीं वेध, छंद.

# १०७. पेशवे व छत्रपति यांचे नाजूक संबंध



पे० द० १७, पृ० ४१ }
पत्र नं० ५२ }

{ १७३५ (?)

[ शाहूच्या मनांत बाजीरावाला एकादी गोष्ट सुचवावयाची असल्यास ती फार जपून सांगावी लागे. ]

महादाजी आंबाजी पुरंदरे–बाजीराव

पुरवणी तीर्थरूप राजश्री राऊ व तथा राजश्री अपा स्वामीचे सेवेसी विनंती काली[1] गुरुवारी प्राथःकाली राजदर्शनास गेलो. तेव्हा राजश्री* बोलिले की, तुम्ही घडीभर बसा, तुम्हासी आम्हास दोन गोस्टी बोलणे आहे त्यावर अवघ्या लोकास निरोप दिल्हा आणि राजश्री येकलेच बसले. आम्हास जवल बोलावून बोलिले की आजकाल ईस्वरइच्छेनें राजश्री प्रधान पताच्या सर्व गोष्टी सर्वोत्कर्ष आहेत याची कीर्ति भुमंडली बहुत दिवस राहील. येशास व कीर्तीस गारस्त्यास[2] व स्वामी सेवेसी व कितेकविसी किमपि अतर नाही, येंस आहे परंतु येक गोस्टी अनुचित करतात की द्रव्याची अस्या धरून वत× × × × साव × × × × अर्जिले कीर्तीस किंचित कलंक सांभा( ळावा. आ) म्ही आपला घराउ विचार जेव्हा गाठ पडे × × न येवढी गोस्ट न करीत ते करवणे. मागे दादाजी कोंडदेव लाहानसाच ब्राह्मण झाला; परंतु त्याणे जे इनसाफ केले ते अवरंगजेब पातशाहासही वंद्य जाहले...त्यावरी आम्ही विनंती केली की मागेही महाराज येकदा असी गोष्ट बोलिले होते. त्यावरून आम्ही राजश्री पंतप्रधान यासी सांगितले. परंतु ते बोलिले की आम्ही लेकरे. माहाराजावाचून आम्हास ममता पुरस्कार बुधिवाद कोण सांगेल? तरी तुम्ही माहाराजास विनंती करणे की इनसाफ गैरवाजबी माहाराजाच्या चितात कोण कोणते आले आहेत ते आज्ञा करावी त्याचा विचार माहाराज सांगतील तैसा

---

१ काल. *शाहू. २ गार्हस्थ्यास.

करूं. यैसे बोलिल्यावर बोलिले की, आम्ही काये सांगणे ? तुम्हास कोणता न कलेसा आहे ? व तुम्हास राग येईल, तरी आम्ही याउपर बोलणार नाही. वरकड[1] तुमचेबदल खातर[2] आम्हासहि ते गोस्टी मंजूर म्हणावी लागेल. परंतु जोपर्यंत तुम्ही व आम्ही आहो तोपर्यंतच चालेल, पुढें चालणार नाही, यैसे बोलिले त्यावर आम्ही विनंती केली की, ते काही मनांत विषाद आणून बोलिले नाहींत माहाराजास जे गोस्टी अनुचित आढलली असेल ती आज्ञा करावी व त्याचा विचारहि सांगावा. त्यावर बोलिले कीं, आम्हास ××× (सांग) णे असल्यास ×××× (सर्मी) प सांगो. यैसे बोलिले. जाले वर्तमान स्वामीस विदित व्हावे यास्तव लिहिले असे सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

---

# १०८. छत्रपतीकडील स्वयंपाकघराची दुरुस्ती

पे० द० १८, पृ० ४, पत्र नं० ६ | काळ अनिश्चित

## राजघराण्यांतील स्त्रीचें बाजीरावास पत्र

छ १ साबान

श्री

राजश्री बाजीराव पंडित प्रधान यासी :—

प्रति सौभाग्यादिसंपन्न उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशललेखन करणें विषेस. सातारा माहालातील मुदबखचे[3] घर तुम्हाकडून बांधिवले होत. प्रस्तुत सोप्याचे खांब जागाजागा ढलले व काही किडीने जाया जालें.

---

१ बाकी, इतर. २ विश्वास. ३ स्वयंपाक.

मोहाटया[1] कोठ जाया[2] जाहाल्या व काही पडिल्या. यास्तव नीट करावे लागते. तरी तुम्ही राजश्री माहादाजी अंबाजी व राजश्री दादोपंता सांगोन मुदबखचे घर सोपा नीट करवणे. दिवसगतीवर न घालणे. अविलंबे तयार करविले पाहिजे. जाणिजे छ १९ रजब. बहुत काये लिहिणें?

---

## १०९. शाहू शिकारीस निघतो

पे०द० ८, पृ० २२, पत्र नं० ३० } { काळ अनिश्चित

### पेशव्यांचे इसमावर धाक

श्री

पुरवणी तीर्थरूप राजश्री आपा स्वामीचे सेवेसी विनंती उपरी. सिमघीयाचा[3] खेल संपूर्ण जाला नाही. दशमी पावेतो आहे. त्यास छ २० सवाली रविवारी दोप्रहरा वाघाची हवी[4] आली. याकरितां राजश्री स्वामी शिकारीस गेले. पाटिलाचे स्मरण केले. याउपरी सिकारीस जातील. पाटील सत्वर स्वामीनी पाटविले म्हणजे येथे आमचा आब राहील. नाहीं तर राहत नाही. क्रोधास येतील. ते समई समस्ता देखता काये बोलतील ते कलेना. विदित जाले पाहिजे. सेवेसी श्रुत होये विज्ञापना.

---

१ मोहटी–ओसरीचें छप्पर. २ खराब, नादुरुस्त. ३ शिमग्याचा. ४ हवई, अवई, बातमी.

# ११०. कुणबिणीची खरेदी व पाठवणी

भा०इ०सं०मं०,त्रै० मा०
व. ८, अं० ३, पृ० १४१

काळ अनिश्चित

[ पेशवाईत कुणबिणीची खरेदीविक्री होई, व तिला हरएक काम करावें लागे. अधिक माहितीसाठीं त्रैमासिकाचा मूळ अंक पहा. ]

श्री

तीर्थस्वरूप राजश्री भिकाजीपंत काका स्वामींचे शेवेसी

आपत्ये माहादाजी अंबाजी [ पुरंदरे ] सां नमस्कार विनती उपरी राजश्री लक्ष्मण कोन्हर यानी मौजे गराडे येथे कुणबीण विकत घेतली आहे त्यास जकातीविसी उपसर्ग न लावणें बटीक नेतील त्यास नेऊ देणें हे विनंती.

सदरहु कुणबीण सोन माली सेवता त्याजपासून घेतली होती किमत रुपये १०० शभर.

# १११. मोगल-मराठे लटुपुटीची लढाई

शाहू रोजनिशी, पृ० १८३

वैशाख शु० ५ शके १६५९ ता. २४-४-१७३७

## पोरांचा खेळ

सबा सलासीन मया व अलफ मोहरम ४.

[ ३०९ ] कितापत्र[1] चिटणिशी वैशाख शुद्ध पंचमी रविवार पिंगळनाम संवत्सरे बनाम[2] मोकदमानी[3] मौजे घारगांव परगणे कर्डे-रांजणगांव यासी आज्ञा केली ऐसी जे, दावजी पाटील मडका मौजे पारगांव तर्फ चांभारगोंदे परगणा कडेवलित याणें हुजूर येऊन विनंति केली कीं, सदरहू दो गांवींचीं मुलें रानांत गुरें चारीत असतां दोन फौजा करून घारगांवकर मोंगल आणि पारगांवकर मराठे ऐसे होऊन पांच रोज भांडत होते. त्या खेळामध्यें पारगांवकर मुलांनीं घारगांवकर मुलांस पिटून काढिलें. तेव्हां पळतांना मौजे मजकूरचा हजामाचा पोर तोंडघशीं पडून कपाळ फुटलें आणि मयत पंधरा विसा रोजांनीं जाहला. याकरितां हजामाचे पोराची आई अहंमदनगरास फिर्याद जाहली. तेथें काजीशरा[4] याणीं इनसाफ केला कीं, मुलांचा कज्या आहे त्यांत खुनाचा दावा[5] पोंचत नाहीं, खून माफ. असें ह्मणून कागद शराचा[6] करून दिल्हा असतां हजामीण जागा जागा फिर्याद देत फिरते. तर महाराजांनीं इनसाफ करून हुकूम करणें तो करावा ह्मणोन अर्ज केला. त्यावरून मनास आणतां तुमचे भांडणामुळें पोर मेला त्या खुनाचा दावा वाजवी नाहीं. ऐसें जाणोन काजीनीं इनसाफ केला आहे त्याप्रमाणें करार करून पारगांवकरांस खुनाचें लिगाड[7] माफ केलें असे. दावजी पाटिलास शिरपाव मुंडासे देऊन खून माफ केला असे. तुह्मी हजाम मजकुरास व त्याचे बायकोस ताकीद करून खुनाचा

---

१ नकल करावयाचें पत्र. २ नांवानें. ३ अधिकारी, मोकदमा याचें अनेक वचन. ४ धर्मशास्त्रज्ञ. ५ आरोप लागू पडत नाहीं. ६ शास्त्रनिर्णय. ७ कटकट.

कज्या[1] (?) करून यावें. फिरोन बोभाट आल्यास कार्यास येणार नाहीं. पारगांवीं कज्या करावयास संबंध नाहीं. ताकीद[2] असे ह्मणून पत्र १.

---

# ११२. पेशवाईंत घडयाळ व दुर्बिण यांची चौकशी

पे० द०, भा० ९, प० १०, पृ ०७ — काळ अनिश्चित

श्री

सेवेसी विज्ञापना. मेस्त्र[3] सिलेवान इंग्रज याचे घरी बिलोरी दिवें झाडाचे मज्यालसीत[4] बसकेवरी[5] टेवावयाचे व फानसवजा[6] टांगावयाचे येसे बहुत बेश[7] दोनसे रुपयांचा जोडा यापासून आठसें पावेतो जोडा येसे तऱ्हेतऱ्हेचे आहेत. मुजरद[8] आम्हांस वखारेंत नेऊन दाखविले. तसेच थोर आरसे अडीच पावणेतीन हात लांब व दोन हात रुंद वरते काम मुलामगिरी[9] बहुत बेश, साल गुदस्तां विलायती ज्याहाज आलीं होती त्यापैकीं. सरकारांत खप असला तरी लेहून पाठविणें म्हणों इंग्रजानें सांगितलें. त्यावरून सेवेसी विदित व्हावें याजकरिता लिा आहे. जडाव हिरे यांचे घड्यालें लहान सोन्याचें येसे येक उतम आहे. त्याचें वृत्त व हिऱ्यांचा सुमार[10] पेशजी जासुदांबराबर लिा आहे त्यावरून विदित होईल. यासिवाय दिवसाचें आकाश पाहावयाचे येक यंत्र पोटरी येवढें मोटें नलीवजा आहे. त्यांतून आकाश दिवसाचें पाहिलें म्हणजे जे आकाशांत जे आहे ते दिसतें येसें सांगतों. ते यंत्र आम्हास दाखविलें घरांत, परंतु बाहेर नेऊन आकाश दाखविलें नाहीं. दाखवीन येसें बोलला तों

---

१ खटला. २ बजावून सांगणें. ३ मिस्टर. ४ मजालस, दरबार. ५ बैठक. ६ कंदील. ७ छान, उत्तम. ८ खास, मुद्दाम. ९ मुलामा. १० अंदाजी किंमत.

त्यांची दरबारास जावयाची घटका भरली तसा उठून गेला. आम्ही आपल्या घरास आलो. फिरोन साक्षप[1] करावा तो केला नाहीं. सेवेसी कळावें यास्तव लिा आहे. आज्ञा होईल त्याप्रा वर्तणूक करून. विदित होणें हे विज्ञापना.

---

## ११३. रघुनाथरावाचें शिक्षण

**राजवाडे खं० १ ला, लें० ५४, पृ० ९६** | ९ जुलै १७४२

[ सदरहू पत्र हें पेशवाईतील राजपुत्राचें शिक्षण यासंबंधीं कांहीं कल्पना देणारें आहेच, पण शिक्षणापेक्षांही त्यांतील व्यावहारिक दक्षते-संबंधींचीं सूचक वाक्यें अधिक लक्ष वेधणारीं आहेत. ]

श्री

चिरंजीव राजश्री रघुनाथ यासी प्रति बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद. उपरि येथील कुशल तागाईत[2] छ १७ जमादिलावल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणें. विशेष. येथून जातेसमयीं जें सुचलें तें तुम्हांस सांगितलें आहे. त्याचें स्मरण निरंतर मनांत असू देत जाणें. रघुवंश व विदूरनीत, चाणाख्य व जें तुम्हास येत असेल त्याची नेमपूर्वक चिंतणिका[3] करून थोडेंबहुत शास्त्री यांजवळ नित्य ह्मणत[4] जाणें. विराटपर्वापासून पुढें भारत रिकामपणीं वाचीत जाणें. नेमेकरून शंभर दोनशें दंड निरंतर काढीत जाणें. केवळ घोडीं फेरा-वयाचे छंदास न लागणें. वजनी, कैली[5], बेरीज, बराबर्द[6] करावयाचा सराव बहुत करणें. चिरंजीव भाऊची मर्जी बहुत प्रकारें रक्षण करीत जाणें. जे आज्ञा करतील तेच काम करावें. बहुतकरून भाऊबरोबरच जेवीत जाणें. घोडीं वेगळीं बांधीत न जाणें. क्षुद्र मनुष्याशीं सहवास कोणे प्रकारेंहि न

---

१ उद्योग. २ तागाईत. ३ मनन. ४ संथा घेऊन शिकणें. ५ मापी आकार. ६ अंदाजपत्रक.

न करणें. मातुःश्रीबाई[1], ताई[2], अनुबाई[3] यांसी एका दोहों दिवशीं अर्ध घटका-भर जाऊन बसत जाणें. शरीरप्रकृत नीट नाहीं यास्तव औषध कांहीं नेमेकरून घेत जाणें. भाऊ समागमें घोडीं फेरावयास जात जाणें. सतारियास जर जावयाची आज्ञा केली तर चिमणगिरी गंगाधरभटास भाऊजवळ विनंति करून बरोबर दिल्हे तर घेऊन जाणें. सातारियास गेलियावर दोहीं बाईकडे विना बोलाविल्यावांचून अथवा गोविंदराव[4] यांणीं आपणहून सांगितल्यावाचून न जाणें. कालानुरूप वयास उचित, योग्य वेष करीत असावे. देवपूजा थोडी, परंतु एकांतीं, न बोलतां, करीत जाणें. इतकेंहि नेमेकरून करावे आणि गर्व न करावा. निरंतर साधनवृत्तीनें[5] वडिलांची आज्ञा प्रसन्नतेनें मानावी. सावध वर्तावें. सर्व जें मनेकरून समजेल तें समजावें. वडिलांची मर्जी उत्तम असलिया पुसावे. शिष्यधर्में असलिया फार उपयोग आहे. चिरंजीव जनार्दन बहुत कामहि करून पढतात. हे हरएक गोष्टींत अधिक जाहल्यास तुह्मीं मान्य पुरुष यांस असें व्हाल. विशेष काय लिहिणें. येथील वर्तमान तर उदेपुराजवळ पंचविसा दिवसांत पावलो. श्रीकृपेनें मेहनत करून दिल्लीचे सुमारें[6] जात आहों. जसें पुढील वर्तमान येत जाईल तैसी योजना होईल. हे आशीर्वाद.

---

## ११४. राधाबाईचें प्रायश्चित्ताबाबत आज्ञापत्र

**इतिहाससंग्रह, पुस्तक २ रें, अं० ४, पृ० १४** } { **काळ अनिश्चित**

[ह्या पत्रावरून पेशवाईंतील एका स्त्रीचें नीतिधैर्य केवढें होतें त्याची चांगली कल्पना करतां येईल; व सुमारें दीड शतकापूर्वी मराठ्यांची सामाजिक स्थिति कशी होती तें दिसून येईल.]

---

१ राधाबाई. २ काशीताई (बाजीरावाची बायको). ३ बाजीरावाची बहीण (घोरपडे). ४ गोविंदराव चिटणीस. ५ शिष्यवृत्तीनें. ६ नेम, बेत.

श्री

छ १ रजब.

" चिरंजीव राजमान्य राजश्री नाना[1] यांस :—

प्रती राधाबाई आशीर्वाद उपरी येथील कुशल ता॥ आषाढ वद्य अमावास्या इंदुवार[2] जाणोन स्वकीय लिहीत गेलें पाहिजे. विशेष :—राजश्री गोविंद हरी यांचे घरी बटीक महारीण निघाली. त्याचें वृत्त काल राजश्री अंतोबांनीं तुह्मांस लेहून पाठविलें आहे. त्यावरून सविस्तर कळलेंच असेल. त्यांचे घरीं मुलांमाणसांचा उपोषणानें आट[3] जाला. त्यांणीं ब्राह्मणांस व पंडितांस बोलावूं पाठविल्यास जमा न होत. याकरितां आम्ही व राजश्री अंताजीपंत, राजश्री जिवाजीपंतांचे घरीं जाऊन, जितके ब्राह्मण थोर थोर पंडित व वैदिक जमा करून, बालंभट यांस प्रायश्चित्त द्यावयाचा निश्चय केला. त्यामध्यें कित्येक ब्राह्मणांनीं अट केली कीं, प्रायश्चित्त द्यावयाची आज्ञा प्रभूची पाहिजे. त्यास आह्मी सर्व पंडितांस व ब्राह्मणांस आज्ञा केली कीं, तुह्मीं प्रायश्चित्त देणें. आह्मीं आज्ञा केली, तेच आज्ञा प्रभूची आहे. दुसरा अर्थ चित्तांत न आणणें. त्यावरून आजच प्रायश्चित्त दिलें. तेथील विचार पंडितराव यांस कळलियाउपरी, उपद्व्याप करून राजश्रीचे[4] कानावर घालून फंद[5] फैलाव[6] होईल. याकरितां अगोदर जो बंदोबस्त करणें तो केला पाहिजे. यासाठी ताबडतोब हें पत्र लिहिलें आहे... ... बहुत काय लिहिणें हा आशीर्वाद."

---

१ नानासाहेब पेशवा (राधाबाईचा नातु). २ सोमवार. ३ त्रास. ४ शाहू ५. कारस्थान. ६ विस्तार.

# ११५. रघूजीवर धाकट्या बाईची कृपा

पे० द० ८, पृ० ३०
नं० ४०

२३-९-१७४३ (?)

[ पेशव्याचा सातारा येथील प्रतिनिधि पुरंदरे याचें पत्र. ]

पौ[1] छ १५ साबान

पुा[2] तीर्थरूप राजश्री नाना स्वामीचे सेवेसी :—

विनंती सांप्रत रघोजी बावावर धाकटे बाईची[3] कृपा फारशी आहे. हमेश भोजनास बोलवावे. आपण खासा त्याच्या घरास जावें. प्रत्यह खलबतहि दोनचार घटका होत असते. फारशी ममता धरली आहे. आम्ही जातो तेव्हां स्वाभाविक गोष्टी काढून रघोजी बावाचा स्तव फारसा करितात. कित्येक जिनसाचे पोशाख व हरजिनस, हार, माला, फुलें, नाना प्रा[4] यांस आपले स्वहस्तें तयार करून पाठवावें; पकवानें करून पाठवावीं. ऐसी बहुतसी माया आहे. कळले पाहिजे हे विज्ञापना.

---

१ पैवस्ती—पत्र पोंचल्याची तारीख. २ पुरवणी. ३ शाहूची धाकटी बायको सगुणाबाई. ४ प्रकार.

# ११६. रघूजीच्या पाटण्यावरील स्वारीस पायबंद



पे० द० २०, ले० २६, पृ० १८ } {२०-९-१७४२

[ रामचंद्र बाबा शिंद्याजवळ गढामंडलाचे बाजूस होता त्यास हें पत्र. विश्वनाथ वैद्य हा वाईचा, त्याचा मुलगा बाबूराव व नातु नारायण बाबूराव. हे सर्व मराठशाहींत राजकारणांत वावरणारे पुरुष होत. ]

श्री

पुरवणी राजश्री रामचंद्र बाबा स्वामी गोसावी यासी :—

विनंती उपरी. रा रघोजी भोसले खराब होऊन नागपुरास आले. त्यास आणावयास रा. स्वामींनी[1] रा विश्वनाथ वैद्य पाठविले आहेत. बहुतकरून राजदर्शनास येतील. कर्जदार वोढ जाली. दिवाणचेही तगादे या हिसेबे न येतील तर न कळे. मागाहून तहकीक[2] वर्तमान येईल ते तुम्हास लिहिले जाईल. पैका* न मिळला, येथे आलिया कर्जदाराचा उपसर्ग, राजश्री कांहीं मागतील गुंता[3] पडेल यास्तव न यावे. परभारे पाचसात हजार जमा करून तिकडे जावे ऐसा विचार त्याचा दिसतो. तुम्हीही मंडळ्याकडून बातमी राखून असावे म्हणजे तुमचे दबावानें[4] पटण[5] प्रांतीं जाणार नाहींत. छ १ साबान बहुत काय लिहिणे हे विनंती.



---

१ शाहू. २ सत्य. * येथून अक्षर खुद्द नानासाहेबांचें. ३ अडचण, लचांड. ४ पायबंदी. ५ पाटणा.

# ११७. नाना-रघूजीमधील बंगालचा करार

पे० द० २०, नं० ३१
पृ० २२

१७४३ नंतर

श्री

पुा श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीचे शेवेसी :—

विनंती येसीजे. राजश्री यादवराव प्रल्हाद प्रयागात अमीरखानाचे अमलांत राहात होते ते सांप्रत प्रयागीहून येऊन नरसिंगराव हरकारियासी भेटून जाहीर केलें जे; रघूजीचा व श्रीमंताचा सळूख पटण्याच्या सरदेशमुखी[1] जाहला. अतःपर नवाबही माहाबतजगास लिहून सळूख रघूजीचा करवावा, श्रीमंतांस बंगालियाची गरज नाहीं, प्रयागचा हासील[2] महसूल जो येईल तें श्रीमंतांस द्यावा, म्हणून पत्रें लिहिलीं आहेत ते गुजराणावी[3] म्हणून नवलरायासी नरसिंगरायासी सांगितलें...रघूजीसी स्वामीही काय करार केला तें सविस्तर आज्ञापत्री सादर करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणे ? कृपा केली पाहिजे हे विनंती.

---

१ सरदेशमुखीसंबंधीं. २ प्राप्त. ३ प्रविष्ट करावी, सादर करावी.

११म०१०इ०

# ११८. शाहू-नाना वितुष्ट

ऐतिहासिक पत्रव्यवहार, पृ० ४७, क्रमांक ६५ | पौष श० १६६८ जानेवारी स० १७४७

[ शाहूनें एके प्रसंगी नानासाहेबांस पेशवाईपदावरून दूर केल्याची बखरींत आख्यायिका आहे. सदरहू पत्र वाचल्यानें तिला वळकटी येते. पेशवे शाहूशीं किती निष्ठेनें व नम्रतेनें वागत त्याचाही मासला या पत्रांत आहे. ]

श्री

बाळाजी बाजीराव—गोविंदराव चिटणीस :—

आशीर्वाद उपरी. रात्रीं राजश्री स्वामीची[1] गांठ पडली नाही म्हणून लिहिलें ऐसियास ईश्वरी इच्छेस तुमचा इलाज काय? याउपरी तरी ग्वामखाय[2] गांठ दुपारीं घालून येणेंप्रमाणें विनंती करणें.

कलम १—दोन्ही महालांतील* गुंते[3] फार करून दूर केले. रोज नवे निघतात त्यास मात्र आमचा इलाज नाहीं. सांप्रत महालांतील गुंता नाहीं. मोगम[4] बोलले चालले असतील, वारुं[5]. महाराज कर्जाचे मजकुराचा गुंता, तो महाराज सर्व विचार ध्यानांत आणून आज्ञा करतील त्याप्रमाणें वर्तणूक जेथ असू तेथें करुं. हुजूर असल्यास आज्ञा मान्य करू, बाहेर गेल्यास न करू ही सबब होणार नाहीं. परंतु निभावे[6] ऐसी आज्ञा केली पाहिजे. सांप्रत मनसबा होऊन स्वच्छित[7] जाहला आहे. मनसब्याचा कळस रक्षण करावयाचे दिवस थोडे असतात.† यास्तव दोहीं वाड्यांत समजून सेवकांस निरोप द्यावा. येका दो दिवसांत हा अर्थ उत्तम. असें महाराजांनीं कृपा करून करावें.

---

१ शाहू. २ कांहीं झालें तरी, निश्चयेंकरून. *दोन महाल हे शाहूच्या दोन स्त्रिया सगुणाबाई व सकवारबाई यांचे असावेत. ३ भानगडीचे प्रश्न. ४ मोघम. ५ तोंडी शब्द दिला असेल तो पार पाडू. ६ शक्य असेल अशी. ७ मसलत ठरून निश्चित झाली आहे. †मसलतीचे यश ती त्वरित अंमलांत आणण्यावर आहे.

कलम २— ... ... ...

कलम ३—नाइकाशी[1] कजिया करावयासी जातां ऐसा जनवार्तेवरून संदेह मनांत वाटला असला तर त्याविशी निशा[2] करून द्यावी. जो तालुका नाइकास महाराजांनीं करार केला त्यांत जावें. कजिया करावा हे गोष्ट महाराजांचे हुकुमावांचून सहसा[3] होणार नाहीं.

कलम ४—चिरंजीव भाऊ तिकडे[4] गेले आहेत. नबाबही[5] तिकडे गेले म्हणजे गोव्याच्या शहास अंतर होऊन आणखी वगैरे किरकोळ गुंते तसेच अडकून पडतील. तेव्हां त्याचा लौकिक एक प्रकारें होऊन येईल. हा अर्थ महाराजांनीं ध्यानांत आणावा. सरकारांत भर करू द्यावा तो उगवला[6] पाहिजे. सर्वाही गोष्टींत आम्हावर तोटा पडे असें करावें कीं काय? निदान येथून दो मजलीवर जाऊन राहण्यास आज्ञा करावी. सर्व फौज व पिलाजी जाधव यास चिरंजीवाकडे रवाना करतों, आणि सेवेशीं फिरोन येतों.

कलम ५—महाराज निरोप देतात हा लौकिक जनांत जाहला. नबाबापावेतों बातमी जाईल. फिरोन दिल्हें हेंही वर्तमान जाईल. तेव्हां सर्व प्रकारें आम्ही इतराजींत हा लौकिक जाहला आहे व बाकी राहिला आहे हाही होईल.

इतके प्रकार निखालसतेनें विनंति केली असतां महाराज ध्यानांत न आणीत तर ईश्वरेंच या दौलतीवर इतराजी केली अशी जाणावी. मग बाहेरीलही इजतीचा[7] दरकार[8] सोडून बसू. सर्व मजकूर वरल्याप्रमाणें विनंती करून उत्तर घेऊन येणें.

---

१ बाबूजी नाईक बारामतीकर. २ खात्री. ३ कदापि. ४ कर्नाटकांत. ५ निजाम. ६ सरकारांत भरणा केला तो या ना त्या रूपानें खर्च झाला पाहिजे. ७ इभ्रत, अब्रू. ८ काळजी.

# ११९. शिंदे यांची सौम्य शब्दांत कानउघाडणी

मराठी रिसायत, मध्यविभाग, भा० २ रा, पृ० ७१–७३ | इ० स० १७४७.

## पेशव्याचें रामचंद्र बावास पत्र

[ रामचंद्र बावा हा शिंद्याचा कारभारी. परस्परांशीं तेढीनें वागणाऱ्या सरदारांस समजुतीच्या चार गोष्टी सांगतांना त्या युक्तिवादानें व आर्जवून सांगण्याची नानासाहेबाची पद्धत या पत्रांत दिसेल. ]

तुमचा* व मल्हारजी होळकराचा परस्पर पेच[1] वाढला आहे, म्हणोन वर्तमान बहुतां मुखें ऐकलें जातें. ऐशास आपले घरांत सरदारांत काडीमात्र द्वैतभाव नसावा, हा उत्तम पक्ष आहे. तथापि घर आहे तेथें बोलाचाली आहेच, परंतु परस्पर रुष्टता कोणीं बाळगीत नव्हते. सर्वही एकचित्तेंकरून ज्यांत धन्याचें हित व नक्ष[2] तोच मनसुबा करीत गेले. श्रीकृपें व वडिलांचें पुण्येंकरून जें ज्यांणीं चित्तांत आणिलें तें सिद्धीतें पावत गेलें. यशावह कर्में तुम्हींच संपादिलीं. नक्ष लौकिक म्हणावा तसा लोकोत्तर जाला. पुढेंही तुम्ही स्वामिसेवेस चुकतां असा अर्थ नाहीं. सर्व प्रकारें या दौलतीचे तुम्ही स्तंभच आहां. उचित मनसुबा असेल तो करितां व करालच, संदेह नाहीं. परंतु घरांत घरभेद सर्वस्वी नसावा. या मागें तुमचें सांगणें मल्हाररावांनीं केलें; त्यांचा मनोभाव तुम्हीं सिद्धीस नेला. म्हणोन उत्तम शोभा जाहली. एकतत्त्वी फौज. एकदील. कोणाचाही बुद्धिभेद चालला नाहीं. प्रस्तुत तुमची परस्पर रुष्टता याकरितां या राज्यांत काय, मोंगलाईत काय, उमद्या उमद्यांचें घरीं मनमानें तैशा चर्चा करितात, आमचें कोणास सुख आहे ऐसें नाहीं. परंतु वडिलांचे तपोबलें आमची फौज भारी, सरदार एकदील, मर्द, कर्ते, अस्मानही कडाडलें तरी आपल्या मर्दानगीस[3], हिंमतीस अंतर करणार

*म्हणजे शिंद्यांचा. १ तेढ. २ नांवलौकिक. ३ शौर्य.

नाहींत; व केलें नाहीं. ज्यांच्या मर्दुमकीची व दिलेदारीची[१] तारीफ सर्वेही करितात. सांप्रत मल्हारबा इंदुरासच राहून राणाजीच्या भेटीस जाणार, तुह्मी देशास येणार म्हणोन ऐकतों. तर ते तिकडे राहिले, तुह्मी एकटें इकडे आल्यास लोकांत कसें दिसेल? उमदे[२] लोक चर्चा करितात, आमच्या सरदारांत फूट पाडावी, आपली कारीगिरी[३] चालवावी हें इच्छितात, तेंच घडूं सकेल...नबाब आसफजाचा विचार दगाबाजीचा एकास पळ म्हणावें, एकास पाठीस लाग म्हणावें. हा त्याचा विचार तुह्मी जाणतच आहां. त्यास कांहीं चमत्कार दाखवावा, विचारावरी आणावें, येविशींचा विचार करावा. दुसरें राजश्रींच्या[४] कर्जाच्या विचारास तुह्मीं असलें पाहिजे. तुह्मांस येणेंविशीं वारंवार लिहिलें. परंतु अद्याप येणें जालें नाहीं. भेटी होऊन विचार करून आश्विन कार्तिकांत मनसुबा कर्तव्य तो करावा. सारांश तुह्मी उभयतांनीं यावें, घरचे बाहेरचे मनसुबे उचित दिसतील तैसे तुह्मा सर्वांच्या विचारें करावें, असा विचार आहे. तरी मल्हाररावांस उत्तम प्रकारें सांगून त्यांस घेऊन येणें. ते इकडे न येण्याचे हरप्रकारें पर्याय[५] लावतील; तथापि बहुतां प्रकारें प्रसन्न करून खामखा[६] घेऊन यावेंच यावें. उभयतां एकजागा जालियावर त्यांच्या चित्तांतील कलुषता दूर करून पूर्ववत्प्रमाणें तुह्मी ते वर्ता[७], दरम्यान विकृतभाव[८] नव्हे, ऐसाच विचार देवाच्या दयेंकरून होईल चिंता नाहीं......

---

१ दिलदारपणा, मनाची थोरवी. २ थोर. ३ करामत, कारस्थान. ४ शाहू. ५ सबब. ६ कांहीं झालें तरी. ७ वर्ताल, वागाल. ८ अढी, वांकडेपणा.

# १२०. कुलांत घेऊन राजपुत्र केलें



इतिहाससंग्रह, वर्ष २, अं० ३, पृ० ६–७ | इ० स० १७४८

## अक्कलकोटकरांस शाहूची सनद

[ मराठेशाहीतील मध्यवर्ती सत्तेचे सरंजामदाराशी संबंध समजण्यास हा कागद उपयोगी आहे. त्या सरंजामदाराचे दरखदार व कारखानदार नेमण्याचा अधिकार देखील मध्यवर्ती सत्तेचा असे. ]

" स्वति श्री राज्याभिषेक शके ७५ विभवनाम संवत्सरे फाल्गुन वद्य दशमी गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहू छत्रपति स्वामी यांणीं श्रियासह[1] चिरंजीव राजमान्य राजश्री फत्तेसिंग भोसले यांसी :—आशीर्वाद. आज्ञा ऐसीजे, तुमचें मानस स्वामींनीं पुत्र करून, दौलत देऊन महत्पदारूढ केलें, तेविसीं अक्षई चालण्याचे खास दस्तुर[2] व मुद्रांकित पत्र असावें, म्हणोन चिटणीस यांजपासून विनंति केली. त्याजवरून स्वामींनीं चित्तांत आणून ठरावून हें पत्र सादर केलें असे. बितपशील[3]:—

स्वामींस प्रसंगेंकरून यवनाचे पाशीं जाणें घडलें. तेथें पादशाहांनीं बेजमोस[4] महाल सानक[5] करून दिल्हे. त्यांपैकीं परगणे अक्कलकोट तुमचे बेजमीस पूर्वींपासून देऊन चालत आहे. तो तुह्मांकडे दरोबस्त[6] इनाम वंशपरंपरें दिल्हा असे. कलम १.

तुमचे निसबतीस[7] सरंजामी सरदार पांढरे, बांडगर, वगैरे नेमून दिल्हे. त्यांणीं तुमचेपासीं असून तुह्मांबरोबर सेवा करावी. कलम १.

सरंजामास[8] महाल व गांव स्वराज्यांतील व मोंगलाईतील मोकासे[9] वगैरे

---

१ लक्ष्मीसंपन्न. २ हस्ताक्षर. ३. तपशीलवार. ४ निर्वाह, पुरवठा. ५ निर्वाहासाठीं इनाम दिलेली जमीन. ६ संपूर्ण. ७ हुकमत, देखरेख. ८ सैन्य वगैरे खर्चासाठीं दिलेलें इनाम. ९ वसुलांतील हिस्सा मिळण्याचा हक्क.

तुह्मांकडे फौजदारीचे बेजमीस व खर्चास लाविले आहेत. ते नेहमी तुह्मांकडे फौजेचे बेजमीस व खर्चास चालावे. तुह्मी फौज घेऊन (ठेवून?) त्यांत राज्यसाधनाचे उद्योग करावे. कलम १.

तुह्मांपाशीं दरकदार[1] व कारखानदार[2] सर्व हुजुरून[3] नेमून दिल्हे आहेत. त्याजपासून काम घ्यावे. ज्यांची त्यांनीं (चाकरी) करून असावें. कलम १.

सदर्हूप्रमाणें च्यार कलमें केलीं असेत. जाणिजे. याप्रमाणें स्वामींनीं तुह्मांस कुलांत घेऊन राजपुत्र केले..."

---

# १२१. मोगलाकडून अबदालीचा पराभव

पुरंदरेदप्तर, भा० १ ला, लें० २१९, पृ० १६०

शा० १६७० वैशाख-ज्येष्ठ
इ० स० १७४८ एप्रिल-मे

श्रीशंकर

चिरजीव राजश्री नाना* यासी प्रती रघुनाथ बाजीराव आसीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिला मजकुर कलला ऐसियास आम्ही दो चौ रोजा आड पत्रे पाठवितो परंतु तुम्हास पावतात न पावतात हे काहीच कलत नाही आम्ही तर दो चौ रोजा आड येखादे पत्र पाठवितो विशेष काही लिहिले नाही यानंतर येथे[4] तीर्थरूपाचीं[5] पत्रे[6] आली कीं तिकडील पठाणास[7] हिकडून या पातशाहाची फौज गेली होती तिणे मोडिले ते दो चौ हजारानिसी पलाले ऐसी पत्रे आली

---

१ फडणीस, मुजुमदार वगैरे सरकारी अधिकारी. २ राज्योपयोगी वस्तुसंग्रहावरील अधिकारी. ३ छत्रपतींनीं. *पुरंदरे. ४ सातार्‍यास. ५ नानासाहेबांचीं. ६ दिल्लीहून (?). ७ अबदालीस.

आतां दिसोन येते की यंदा प्रायः तीर्थरूप देशास येतील मग पुढे होईल ते कलल्यासारिखे लिहू तुम्हास कलावे म्हणून लिहिले असे तिकडील वर्तमान वरचेवर लिहीत जाणे आमचे येथे राहावयाचे बरे आहे उत्तम प्रकारे तीर्थरूपाची मर्जी व विद्याभ्यास करितो दरबारास दुवख्त जातो दंड काढतो बहुत काय लिहिणे हे आसीर्वाद.

---

## १२२. शाहूचें स्वदस्तुरचें मृत्युपत्र

इतिहाससंग्रह, पुस्तक ७ वें, अं० ४।५।६, पृ० १५ } { इ० स० १७४९

[ थोरले शाहू छत्रपति यांच्या हातच्या दोन याद्या. या याद्यांमुळें पेशव्यांकडे मराठा राजमंडळाचें प्रमुखत्व आलें. ]

**यादी नं. १**

ओळ

१ श्री

२ राजमान[1] रा। बालाजी[2] प्रधान

३ पंडित[3] यास आज्ञा तुह्मी फौ-

४ ज धरने[4] सरवास[5] आज्ञा केली

५ त्याच्या* दैव नाही महारा-

६ जास दुखने जाले नाही बर हात[6]

७ नाही राजभार चाला[7] पाहिजे

८ तर पुढे वस[8] बसवने[9] कोलापुर-

९ चे न करने[10] चिटणीसास[11] सर-

---

१ राजमान्य. २ बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे. ३ पंडित. ४ धरणें. ५ सर्वास. *रघूजी भोसले. ६ बरे होत. ७ चालला. ८ वंश (रामराजा). ९ बसविणें—गादीवर बसविणें. १० करणें. कोल्हापूरच्या वंशजाची सातारच्या गादीवर स्थापना करूं नये. ११ गोविंदराव चिटणीसास.

१० व[1] सांगितले[2] तसे करने वस
११ होईल त्याच्या आज्ञे-
१२ त चालून राजमंडल[3] चालव-
१३ ने चिटनीस स्वामीचे इस-
१४ वासू[4] त्याच्या तुमच्या
१५ विचारे राज[5] राखने वस होई-
१६ ल तो तुमची घालमल करनार नाई[6]
१७ मुदन[7] आसा.

**यादी नं. २.**

ओळ
१ श्री
२ राजमान रा बालाजी पंडित प्रधान
३ आज्ञा जे राजभार तुह्मी चालवा-
४ ल हा भरवसा स्वामीस आहे पहि-
५ ले सांगितले खातरजमा ती चिटनी-
६ सानी आढल[8] कली[9] तुमचे मसतकी
७ हत[10] टविला[11] आहे तस[12] होईल तो
८ तुमचे पद प्रधान चालवील करी
९ ल आतर[13] तास [स] फत आमे त्याचे
१० आज्ञेत चालून सेवा करने[14] राज
११ राखने[15] बहुत काय लिहिने[16] मुदन[17]
१२ आसा[18]

—संशोधक : श्री. य. रा. गुप्ते

---

१ सर्व. २ आपल्यामागें कोणास गादीवर बसवावें याचा विचार शाहू छत्रपति करीत होते, त्या वेळीं ही यादी लिहिलेली आहे. ३ राजमंडल दाभाडे, भोसले, प्रतिनिधि इत्यादि. ४ विश्वासू. ५ राज्य. ६ करणार नाहीं. ७ सुज्ञ असा. ८ अढळ. ९ केली. १० मस्तकीं हात. एकंदरीन शाहूची भाषा म्हणजे अशुद्ध मराठीचा एक मासलाच होय. ११ ठेविला. १२ तसें. १३ अंतर देईल त्यास शपथ असे. १४ करणें. १५ राखणें. १६ लिहिणें. १७ सुज्ञ. १८ असा.

# १२३. मोठी सनद

मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १ ला, पृ० १ } { इ० स० १७५२

[ राजवाडे खं. १, या पुस्तकांत ही सनद मूळ फारशी व तिचें भाषांतर सुमारें १० पृष्ठें व्यापीत आहे. तिचा निवडक भाषांतरित भाग येथें घेतला आहे. 'हा एक करारनामा असून त्याचे दोन भाग आहेत. पूर्वार्धाला अर्जी म्हणून म्हटलें असून उत्तरार्धाला अर्जीचें उत्तर म्हणून म्हटलें आहे. पूर्वार्धात मराठ्यांतर्फे अमुक कामगिऱ्या अमुक किफायतीसाठी 'आम्ही करूं' असें म्हटलें असून उत्तरार्धांत बादशाहातर्फे 'तुम्हीं करावें' असें आहे. बादशाहीचा बोज राखण्यासाठी बरोबरीच्या करारास 'अर्जी' व 'अर्जीचें उत्तर' किंवा 'आम्ही करूं' 'तुम्ही करावें' असें स्वरूप आलें आहे. या सनदेमुळें बादशाहा मराठ्यांच्या रक्षणाखाली आल्यासारखें झालें. या सनदा पेशव्याच्या नांवें दिल्या असून त्यांत सातारच्या महाराजांचें नांव नाही.' (राजवाडे टीपेचा संक्षेप. मूळ पृ. १, २, ३.) ]

राजश्रियाविराजित बाळाजी बाजीराव यांस दिलेल्या उच्च फरमानाची नक्कल.

प्रस्तुत राजश्री मल्हारराव होळकर व पातशहाचे दोस्त आणि वीरशिरोमणि जयाजीराव शिंदे यांच्याशीं तह येणेंप्रमाणें केला जातो कीं—श्रीमहादेवाची व खंडरावाची व धर्माची व स्मृतीची शपथ व साक्ष तुह्मा आह्मास आहे कीं—आह्मीं आमरणांत तुमची आज्ञा व सेवा व चाकरी व तुमच्या शत्रूचें पारिपत्य करण्याचा मनापासून प्रयत्न करूं—मग तो शत्रू अबदाली असो किंवा दुसरा कोणी राजा असो अथवा एखादा लहान मोठा जमीदार[1] असो—सारांश, जो कोणी सरकारचा हुकुम मोडील त्याला तंबी देऊं व हुजूरच्या पुढें आणूं... जेणेंकरून आपल्या अखंड राज्याचें व खुद्द हुजूरचें कल्याण होईल अशीच तजवीज करूं; आणि जेणेंकरून हुजूरचें व नबाबबहादराचें[2] समाधान व

---

१ वतनदार. २ अयोध्येचा नबाब.

वजीरबहादराची मर्जी राहील त्याच गोष्टी अमलांत आणूं. आणि जो कोणी हुजुरजनाब[1] याचा व नबाबबहादराचा दोस्त असेल त्याला आह्मी आमचा दोस्त म्हणूं व जो कोणी हुजूरचा व नबाबबहादराचा शत्रू व दुष्मन असेल त्याला आह्मी आपला शत्रू समजूं, आणि जो कोणी सरकारच्या हुकुमीं आपलें तनमन खर्चणार नाहीं त्याला आह्मी शिक्षा करूं. आणि पन्नास लक्ष रुपयापैकीं अबदालीच्या पारिपत्याकरितां तीस लक्ष रुपये आह्मास पावते झाले, व मुलतान, पंजाब, थटा[2] व भकर[3] या सुभ्यांची व त्यांच्या फौजदारीची व चार महालांच्या साऱ्याची व हिसार[4], संबळ[5], मुरादाबाद[5] व बदाऊंचे[6] फौजदारीची चौथ आमच्या सैन्याच्या खर्चाकडे लावून दिली आहे. आणि दोन भाग हुजूरच्या खालसाकडे[7] लावून दिली आहे. आणि एक हिस्सा वजीरबहादर व नबाबबहादराजवळ असणाऱ्या पातशाही सैन्याच्या खर्चाकडे लावून दिली आहे. येणेंप्रमाणें करार केला आहे. आणि पवित्र अजमीर सुभ्याची सुभेदारी व नारनोल[8] व सांभर[9] वगैरेची फौजदारी व त्यांच्या मुतालिकी[10] आणि अकबराबादेची सुभेदारी व मथुरा वगैरे यांची फौजदारी व मुतालिकी व दुसऱ्या शर्तींतल्या सुभेदाऱ्या व फौजदाऱ्या व त्याचे नजराणे सेवकास मुकरर[11] केले आहेत व बक्षीस दिले आहेत. ह्मणून आम्ही शपथपूर्वक कौलकरार करितों कीं ह्या सुभेदारींतील व फौजदारींतील राजांच्या व जमीदारांच्या अन्नप्रमाणें मामूल[12] वहिवाटीला अनुसरून सर्व अटी पाळीत जाऊं व त्या सुभेदारीचे व फौजदारीचे जे हक्क व लवाजम[13] असतील त्यांचा कबजा घेऊं व सुभ्यांचा व फौजदाऱ्यांचा पक्का बंदोबस्त करूं व पातशाही राजेरजवाड्यांचे ताब्यांतील मुलुखांपैकीं जुना प्रांत कोणी बळकाविला असेल तो त्याच्या ताब्यांतून काढून अर्धा सरकारांत देऊं व अर्धा सैन्याचे खर्चाकरितां आह्मी आपलेकडे ठेवूं. आणि एखादा प्रांत खालसा करण्याचे वेळेस व फिसाद्यांचें[14] पारिपत्य करण्याचे वेळेस जी अधिक फौज,

---

१ साहेब, महाराज. २ ठठ्ठा. ३ बक्कर, हीं ठिकाणें सिंधमध्यें आहेत. ४ हें ठिकाण पंजाबांत आहे. ५ संयुक्त प्रांतांत आहेत. ६ दिल्लीनजीक. ७ खास सरकारकडे. ८ पतियाळा संस्थानांत. ९ सांबर राजपुतान्यांत. १० कारभारीपणाचा अधिकार. ११ निश्चित. १२ नेहमीच्या. १३ लवाजीम, कर. १४ बंडखोर.

सरदार, शिपाई व तोफखाना आह्मी ठेवूं ती हुजूर तैनातींतील' समजत जावी. आह्मी दोघे व इतर अमीरउमराव नित्याप्रमाणें हुजूरच्या सेवेंत हजर राहूं. आणि अबदाली वगैरेंचें पारिपत्य करण्याचे कामीं आमचाच सल्ला हुजूर ऐकतील तर तें काम आह्मी स्वतःच बजावूं, आणि तें काम करण्यास हुजूरची स्वारी स्वतःच जाणें जरूर पडेल तर आह्मी आपल्या स्वारीबरोबर येऊं आणि जिवापाड मेहनत करूं. अथवा तें काम अमिरांच्या हातून होत असल्यास आह्मी विनंति करूं त्या अमिरांनाच पाठवावें, किंवा त्यांची सल्ला घेऊन तें काम आह्मी करूं'...

---

## १२४. गाजुदीखानास निजाम करण्याचें राजकारण

| | |
|---|---|
| का०इ०सं०प०या० लें० ९९, पृ० १०३–४ | श० १६७४ चै० व० ८ ता० २७–३–१७५२ |

[ शाहूच्या मृत्यूनंतर कारस्थानी ताराबाईशीं संगनमत करून निजाम सलाबतजंग याचा दिवाण रामदासपंत यानें बाळाजीस पेशवाईवरून काढून टाकण्याचा घाट घातला. यास उत्तर म्हणून नानासाहेब खुद्द सलाबतजंगाचें उच्चाटन करून गाजिउद्दीखानास निजाम करण्याचें राजकारण लढवीत आहे. अशी तोडीस तोड चालू होती. पत्रांतील मजकुरावरून नानासाहेबाच्या मनास रामदासपंताचें कारस्थान फार लागलें असें स्पष्ट दिसतें. ]

नानासाहेब पेशवा—मल्हारराव होळकर व जयाजी शिंदे यांस :—

...खामखा गाजुदीखानास आणावें. वजीराचा लेक' सुभा करून आणिला

---

१ चाकरी, सेवा. २ ह्या दोनतीन ओळींतील शब्दयोजना काळजीपूर्वक वाचण्यासारखी आहे. ३ वजीराचा लेक शुजाउद्दवला.

तर मागे कुचेदे दिल्लींत करतील.[1] व येथें मोंगल, मराठे भेटणार[2] नाहींत. गाजुदीखान आलिया सहज पडेल. मोंगल व मराठे मातबर सर्व बराणपुरावर येऊन भेटतील. एक फिरंगी गाडदी नवी फौज मात्र राहील.[3] पठाण[4] कर्नाटक्रांत बलावले आहेत. महमद अल्लीखान[5] त्रिचनापल्लीस बळावला आहे. सर्व गाजुदीखानास अनुकूल पडतील. दुसरें, तुम्ही तिकडून, गाजुदीखान दहा पंधरा [ हजार, ] आम्ही हिकडून, येणेंप्रमाणें मनसबा उभा रहातांच सर्व कामें होऊन जातील. सारांश, रामदासपंतानें* अब्रू घेतली ही एकदां हरतजवीज करून त्यास पुर्ती जरब देणें घडल्यावांचून, तुह्मांस कैलासवासी[6] यांनीं वाढविलें, व तुह्मी इराण तुराण पावेतों लौकिक केला, तो सर्व व्यर्थ ! आह्मी हि रायांचे वंशीं व्यर्थ जन्म घेतला. या उपरि तुह्मीं खामखा त्यास[7] आणावें अथवा त्यांनीं दसरा करून मागून यावें. तुह्मीं खामखा देशास यावें शपथपूर्वक हा मनसबा करावा तरच उत्तम आहे. मागें यावें यावें हें लिहित गेलों; न आलां. आतां त्याचा पुढील रंग जाणून सर्व विस्तारें लिहिलें आहे. या उपर याल यांत संशय नाहीं. या पत्राचें उत्तर यथार्थ सत्वर पाठवणें...

---

१ गाजुद्दीखान यांस आणिल्यास पाठीमागें ते दिल्लीस कारस्थान करतील असा भाव. २ वजीराचा पुत्र शुजा यास दक्षिणचा सुभा करून आणिल्यास त्यास तिकडील मुसलमान अगर मराठे अनुकूल होणार नाहीत असा भाव. ३ फरेंच गार्ड्स व दुसरी नवी फौज. ४ पठाण हे कर्नोळ, कडपा, व सावनूर येथील नबाब असावे. ५ महमदअल्ली हा अर्काटचा नबाब. *निजामाचा दिवाण, पेशव्याविरुद्ध कारस्थान करणारा. ६ बाजीराव बल्लाळ. ७ गाजुदीखानास.

# १२५. शिंदे-होळकरांचा पराक्रम



काᐤइᐤसंᐤपᐤयाᐤ
पृᐤ ८६, लेᐤ ७९

२२-५-१७५१
१६७३ ज्येष्ठ शुᐤ ९

## बाळाजी बाजीरावाचें जयाजी शिंदे यांस पत्र

श्री

तुम्हीं जयनगराहून निघालियावर एक पत्र आलें. त्या अलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तुमची व नबाब[1] वजीर यांची भेट जाली, यमुना पार होऊन कादरगंजाजवळ दहा हजार पठाण सरदारमुद्धा बुडविला; तेहि वर्तमान परभारेंच येऊन पोहोंचलें. तदोत्तर अहमदखा पठाण बंगस प्रयागास म्हासरा[2] करून होता तो उठवून फरोखाबादेस येऊन लढाईस नमूद जाहला. त्याची तुमची लढाई सुरू जाहली. अहमदखा बंगसांनीं फरोकाबाद गंगातीरास बेहडा[3] अडचण जागा पाहून आरावा[4] रचून त्याची तुमची नित्य लढाई होऊं लागली. तथापि वर्तमान लिहिलें नाही. याजवरून अपूर्वता, आश्चर्य वाटलें. प्रस्तुत राजेश्री दामोदर[5] महादेव यांचें पत्र छ ७ जमादिलावरचें छ ५ रजबीं येऊन पावलें कीं, "अहमदखा बंगस बहादूरखा रोहिल्यास शरण जाऊन त्यास दहा बारा हजार स्वारप्यादे यांशी कुमकेस आणिलें. सरदाराची[6] फौज व जाटाची[7] फौज व नबाब वजीराची फौज गंगापार होऊन छ ३ जमादिलाखरीं लढाई जाली. बहादूरखा रोहिला बुडविला. हजारों घोडीं घेतलीं. हत्ती पाडाव[8] केले. हें वर्तमान बंगसांनीं ऐकून घाबरा जाला. दुसरे दिवशीं पळून गंगापार गेला. लष्कराच्या लोकांनीं घोडीं पाडाव आणलीं तोफखाना पाडाव केला." म्हणोन लिहिलें तें श्रवण होऊन संतोषाच्या[9]

---

१ अयोध्येचा नबाब सफदरजंग. २ मुहासरा—वेढा. ३ नाल्याच्या प्रवाहामुळें झालेली खोल भेग. ४ तोफखाना. ५ हिंगणे. ६ शिंदे होळकरांची. ७ सुरजमल जाट. ८ धरले. ९ अति आनंद.

कोटी जाहल्या. शाबास तुमच्या हिमतीची व दिलेरी रुस्तुमीची[1] ! व शाबास लोकांची. आमच्या दक्षिणच्या फौजांनीं यमुना गंगापार होऊन रोहिले पठाणांसीं युद्ध करून आपण फत्ते पावावें हें कर्म लहान सामान्य न जालें ! तुम्ही एकनिष्ट, कृतकर्मे सेवक; या दौलतीचे स्तंब आहां ! जे चित्ता-वर धरितां ते घडून येतात. पहिलीं यशावह कर्मे संपादिलींत ततोम्यधिक हें यश संपादिलेंत. या यशास जोडाच नाहीं. परतु केल्या मनसुबियाचा अर्थ किमपि लिहीत-नाहीं एेसें नसावें. सर्वदा आपलें कुशल वृत्त लिहित जाणें. तेणेंकरून संतोष होत जाईल. मोठा मनसबा कठिण होता. नाना प्रकारचीं येथें वर्तमानें उठतात. तुमचें पत्र तों येत नाहीं. याजमुळें चित्त चिंतेंत होतें. इराण तुराण, पावेतों लौकिक जाला कीं वजीर मोडला, पळाला असतां फिरोन फत्तेच्या मसनदीवर[2] बसविला, याजहून यश कोणतें अधिक आहे ? या उपरी तेथील रंग भरून, स्वकार्य साधून, आपले मुलखांत येणें योग्य आहे[3] छ ७ रजब बहुत काय लिहिणें.

लेखनसीमा.

---

१ धारिष्टाची व पराक्रमाची. २ सफदरजंगास पठाण लोकांनीं पदच्युत केलें होतें त्यास मराठ्यांनीं पुनः वजिरी मिळवून दिली. ३ काव्येतिहाससंग्रहकार या पत्रासबंधीं म्हणतात, "हें पत्र वाचून हल्लींच्या हतवीर्य लोकांसही क्षणभर स्फुरण येईल. तेव्हां ज्यांनीं असे पराक्रम केले त्या लोकांस हा स्वामिगौरव अमृताहून गोड लागून शरीर दुणावलें असेल."

# १२६. चंदासाहेबाचा पराभव

पेशवेदप्तर २८ नं० ८५, पृ० ११० | पैवस्ती १७-१०-१७५२ विजयादशमी श० १६७४

## मुराररावाचें ताराबाईस पत्र

[ मुरारराव हा संताजी घोरपड्याचा वंशज. याचें ताराबाईशीं सख्य होतें. उत्तर पेशवाईत मुराररावानें मोठा पराक्रम केला. दिल्लीच्या नादी न लागतां दक्षिणेंत मुराररावासारख्या सरदारांचा पेशव्यांनीं पाठपुरावा केला असता तर मराठ्यांचें राज्य कदाचित् छोटेंच पण भक्कम पायावर उभारलें गेलें असतें. ]

श्रीसुबराज

श्रीमन्माहा मातुश्री आईसाहेब साहेबाचे सेवेसी

सेवक मुरारजी हिंदुराव घोरपडे वजारतमाव[1] कृतानेक शेवेसी विज्ञापना विनंती....तिरचनापली व चंदावर देवब्राह्मणांचे राज्य, यास चंदाखानानें उपद्रव केल्याकरितां सेवकाने पटणकर व नवाब महंमदआलीखान यास सामील करून घेऊन, चंदाखानासी युध्यप्रसंग केल्यास, साहेबाचे पुण्यप्रभावें-कडोन पातशाःजादेप्रमाणें चंदाची दौलत होती. दौलतसहित अमित्र हतप्रभ जाहला[2]. साहेबांस[3] येश येऊन देवब्राह्मणराज्यास निरोपद्रव जाला. याउपरी इकडे गुंता[4] नाहीं. इतःपर साहेबाच्या दर्शनास येऊन, दर्शन घेऊन, सेवा करून दाखऊन[5], उर्जित करून घ्यावें हाच आहिर्णीसी[6] ध्यास लागला आहे. तदनरूप अविलंबेच येत आहो. मुख्य गोष्टी हे दौलत वोढीस[7] पडोन, कसालियाखालें[8] आली आहे. दौलतचा व सेवकाचा उधार[9] करून, कृपा करणार साहेब धणी मायेबाप असां. वरकड[10] कितेक अर्थ उभयेता मारनिलेस

---

१ श्रेष्ठ वजीर (किताब). २ बादशाही दौलत असलेला चंदासाहेब शत्रु पराजित झाला असा अर्थ. ३ ताराबाईस (म्हणजे खरोखर मुराररावासच). ४ उपद्रव. ५ दाखवू. ६ अहर्निश. ७ ताण, संकट. ८ बेजार होणें. ९ उद्धार. १० याखेरीज, दुसरे.

लिहिला आहे, ते विनंती करितील'; तदनसार समर्पक[१] करून सेवकास आज्ञापत्र सादर करावया धणी[२] आसा. सेवेसी सुत[३] होय. मुख्य विचार सेवकावरी दया करून, सेवा घेणार साहेब समर्थ आहेत. हे विनंती.

---

# १२७. राजपुतान्यांत तडजोड करा

काव्येतिहाससंग्रह, लें० १४१, पृ० १२९ | इ० स० १८–९–१७५५ १६७७ भाद्रपद शु० १३

## शिपाईगिरी व मुत्सद्देगिरी यांतील भेद

श्री

नानासाहेब पेशवा—दत्ताजी शिंदे ( स्वदस्तुरचें पत्र )

आशीर्वाद उपरि. " बिजेसिंगास[५] उत्तम प्रकारें तंग[६] केलें आहे, वरकड कोणाच्यानें कांहीं त्याची कुमक करवत नाहीं, स्वामींनीं त्याचे वकिलास साफ सांगून निरोप द्यावा. कैलासवासी आपानीं[७] जो अभिमान धरिला होता तो शेवटास नेलियानें लौकिक व स्वामीकार्य, सर्वांस जय[८]" म्हणोन लिहिलें. त्यास आपानीं जें अवलंबिलें तें आम्हांस सर्व प्रकारें करणें; परंतु हा राजकार्य प्रसंग आहे. आपासही येथून बुद्धिवाद, आपा असतां, चार महिने पांच महिने मागें, लिहित गेलों. तीं पत्रें तुम्ही पाहिलींच असतील. दूर पथ, दो वर्षांनीं हिंदुस्थानांतून फौज आली, एकाएकी येऊन तयार करतां उशीर

---

१ कांहीं गोष्टी पत्रांत लिहाव्या, कांहीं मध्यस्थामार्फत समक्ष सांगाव्या ही धन्याजवळून काम करून घेण्याची पद्धत आहे. २ बरोबर विचार. ३ समर्थ. ४ श्रुत. ५ येथून दत्ताजीच्या पत्राचा मतलब. बिजेसिंग–नागोर, जोधपूरचा राजा. ६ गच्च बांधून टाकणें, पक्क्या पेंचांत आणणें. ७ जयाप्पा शिंदे. ८ सर्वांचें कल्याण.

लागतो. हे लोकांची येथील रीत तुम्हांस ठाऊकच[1] आहे. हंगाम* फौज सिद्ध, ऐसा असता तर एक खावंद[2] आज वीस हजार फौजेनिशीं तुम्हांजवळ प्रविष्ट झाला असता. परंतु नाइलाज. गैर हंगाम व दूर पथ याजमुळें विलंब लागला. श्रीकृपेनें दीढ महिन्यांत पांच सहा हजार फौज येऊन पावेल. मागाहून खासाही वीस हजार फौजेनिशीं येतच आहे. तुम्ही अवलंबिलें कार्य तें अगत्य आम्हांस करणें. परंतु होणारानुरूप आपानी हातेर वोढिलें.† शिपाईगिरीची रीत केली. सरदारगिरीचा प्रकार न केला. जेव्हां प्रथम भारथी[3] लढाई मारली, त्या उपरि नव्या दबावांत[4] तूट सोसून सलूख हर प्रकारें, पुढील संकट दूरंदेशीनें[5] जाणून, करून मोकळे जाहले असते तर आज प्रयाग अतरवेद व आलीकडील खेचीचा§ मुलूख सोडविणें वगैरे कामें सर्व ही सरकार किफायतीचीं[6] होऊन गेलीं असतीं. परंतु होणारास इलाज नाहीं. तुम्हीहीं आज पावेतों शिपायगिरी केली. आतां सरदाराची रीत धरून तजविजीनेंच[7] कांहीं कामें करावीं....त्यांनीं रामसिंगास पंधरा विसांची[8] जागा दिली व तुमचा शिबंदीखर्च[9] मसलतखर्च फिटोन दहा लाख जाजती दिल्हे तर घेऊन सलूख करून त्या संकटांतून सुटावें. हें राज्यभार अष्टपैलूपणास उचित आहे. तेथील प्रसंगानुरूप करणें. फौज तों तुमचे साहित्यास रवाना करीत असों[10] छ ११ जिल्हेज बहुत काय लिहिणें. शिक्का ( लेखनसीमा )

---

१ दत्ताजीनें फौजेची कुमक मागितली होती त्यावर हें प्रत्युत्तर आहे. दत्ताजी मारवाडांत जयाप्पाचा सूड उगविण्यांत गुंतला होता. *मोसम, योग्य वेळ. २ खांसा, धनी, पेशव्यांच्या घराण्यापैकीं कोणी तरी एक, असा भाव. †हत्यार चालविलें. ३ भारथी = जंगी, भारथी युद्धाच्या तोडीची. ह्या लढाईचें वर्णन, भाऊसाहेबांची बखर पृष्ठें ११ ते २० यांत पाहावें. ४ दबाव = दरारा. नव्या दबावांत–लढाईचा जो त्याजवर दाब, दरारा पडला त्या वेळीं. ५ दूरदर्शित्व, शहाणपण. §खेचीवाडा, बुंदेलखंडाचे पश्चिमेस. ६ फायदा, लाभ. ७ मुत्सद्देगिरीनें, शिपाईगिरी व सरदारी या दोहोंत जो भेद येथें दाखविला आहे तो ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. त्याप्रमाणेंच शिंद्याची स्तुति करतां करतां व कैवार घेतां घेतां त्यांस दोष दिला आहे तोही प्रकार मोठा खुबीदार आहे. ८ पंधरा विसांची = १५–२० हजारांचीं. ह्या मारवाड प्रकरणाची हकीकत भाऊसाहेबांच्या बखरींत समग्र आहे. ९ हंगामी फौज. १० आहोंत.

# १२८. विजयदुर्गकर आंग्रे यांजवर चाल करा

पेशवेदप्तर २४,
पृ० १५२, ले० १५६

१४-२-१७५६

[ इंग्रजाचे साह्यानें झालेला विजयदुर्गाचा पाडाव व तुळाजीचें पारिपत्य हा नानाच्या पेशवाईतील एक विषादजनक बनाव आहे. त्यासंबंधीं अधिक पत्रें विस्तारभयास्तव देतां येत नाहींत. 'कुलाबकर आंग्रे सरखेल' या पुस्तकांत सविस्तर विवेचन सांपडेल. ]

श्री

राजश्री जावजी गौली गोसावी यांसी—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो बालाजी बाजीराऊ प्रधान असीर्वाद. सुहूर सन सीत खमसेन मया व अलफ. मुंबईकर इंग्रज यावयाचा गुंता होता त्यास सर्व सरंजाम आरमार सामानसुधा येऊन पोहोचला. राजश्री रामाजी† माहादेवहि आले. तुम्ही आहाच. अतःपर गुंता राहिला नाहीं. तरी तुम्ही सर्व सरदार येकचित होऊन मातबर येलगार[1] करून मुख्य स्थल हस्तगत करणें. आंगारकाचे[2] भेटीचा मजकूर कोण्ही बोलावयास येईल तरी सहसा न आइकणें. येविसी राजश्री रामाजी माहादेव यास सविस्तर आर्थ लिहिला आहे. आंगारकाचे भेटीचे प्रयोजन नाही. निकडीनें येलगार करून कार्यसिध्धि करणें.* असा समय पुढे कधी येणार नाही हे पुर्ते चितात आणून सर्व येकविचारें होऊन कार्य करणे. जाणिजे छ १३ जमादिलोवल. बहुत काय लिहिणे ?

---

†बिवलकर. १ एलगार, निकराचा हल्ला. २ आंग्रे. *येथें बाळाजी बाजीरावाचा शिक्का.

# १२९. 'जबरदस्त जाहाला म्हणोन केवळ भिऊं नये'



पेशवेदप्तर २४
पृ० १६४, ले० १६८

२८-४-१७५६

## इंग्रजांची विजयदुर्ग देतांना खळखळ

पौ' छ १४ साबान श्री नकल

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
गोविंद सिवराम स्वामीचे सेवेसी

पो[१] बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे विशेश. राजश्री बाजी गंगाधर याणी जनरालाकडे मुंबईस जाऊन, बाणकोटचे गाव द्यावे, बाणकोटचे इंग्रजाची चिठी महमद सोफी याणी घेऊन विजयदुर्गास जावे, म्हणजे किला हवाली करितील याप्रमाणें ठराव करून, बाणकोटास उभयेता आल्याचे पत्र रामाजी माहादेव याचे आले. ऐशास बाणकोटचे गावच्या चिठ्या राजश्री बाबा फडणीस याणी पाठविल्याच आहेत. गाव त्याचे हवाली होऊन, त्या इंग्रजांची चिठी घेऊन, बाजी गंगाधर व महमद सोफी विजयदुर्गास गेलेच असतील. इतके दिवसांत किलाहि हवाली जालाच असेल. इंग्रजानी किरकोल गोष्टी नव्या नव्या काढून लांबणीवर टाकावे हें स्नेहास उचित नाही. जर किरकोल बोलीचाली असेल ते आम्ही पुण्यास आल्यावर त्याचा मातबर[३] येईल. सर्व आर्थ ध्यानास आणून, उचित ते केले जाईल. येविसी उत्तम प्रकारे रामाजी माहादेव याणी इंग्रजास प्रबोध[४] करणे तो करावा. किला हस्तगत होये ते गोष्ट करावी. तुम्ही व राजश्री हरि दामोदर व मशारनिल्हे येक विच्यार होऊन, कारेगारी[५] कलेल त्याप्रो करून, किला हस्तगत होय तो

---

१ पैवस्ती. २ पोष्य. ३ जबाबदार मनुष्य. ४. समजून सांगणें. ५ कौशल्य.

आर्थ[1] करणे. किरकोल कलमाविसी येथील परवानगी थोर काम नासेल उजूर[2] न धरावा. कार्य हरप्रकारे रामाजीपंताचीच तारीफ करून करावे. जस बेहतर यान (?)* गेलियावर जवल नेटून[3] राहावें. जबरदस्त जाहाला म्हणोन केवल[4] भिऊ नये. आधी तो हरतजविजेने कार्य करावे; नाहीतरी जवल नेटून राहावें. येणेप्रा जरूर सर्व मिलोन करावे. वरकड सर्व स्थले हस्तगत जाहलीच आहेच. छ २७ रजब हे विनंति.

---

## १३०, ' नजीबखान बेमान आहे '

काव्येतिहाससंग्रह,
पृ० १५५, ले० १६७

शा० १६८० फाल्गुन व० ७
ता० २१-३-१७५९

[ दिल्लीपतीचें रक्षण करण्याचा अधिकार मिळाला तरी त्याची अंमलबजावणी करण्यासाठीं दिल्लींतील पक्षोपपक्षांची छाननी करून अनुकूल ते हाताशीं धरणें व प्रतिकूल त्यांचें पारिपत्य करणें अगत्याचें होतें. त्याची शहानिशा या पत्रांत आहे. ]

श्री.

पुा राजश्री दत्ताजी शिंदे व जनकोजी शिंदे गोसावी यांसि

आशीर्वाद उपरि. ' वजीराचा विचार सुधा नाहीं, यास्तव मनसूर अल्लीखानाचे[5] लेकास वजीरी दिल्हियानें पन्नास लक्ष रुपये देतो, परंतु येथील[6] मर्जी कशी असेल ते कळेना यास्तव न केलें, पुनरपि करावयाविशीं आज्ञा जालिया लाहोराहून येऊन कार्यसिद्धी करूं, सरकारचें कर्ज फेडूं, ' म्हणून लिहिलें तें

---

१ उद्योग. २ आक्षेप, सबब. *' नच होई तर पान गोलियावर ' असें वाचतां येईल. पान गेल्यावर म्हणजे पाणी कमी झाल्यावर (?). ३ पाय रोवून राहावें. ४ मुळींच, बिलकुल. ५ मनसूर अल्ली—सफदरजंग. याचा मुलगा शुजाउद्दौला. ६ पेशव्यांची.

अक्षरशा अवगत जालें. ऐशियास....पहिला दिल्लीस ऐवज मातबर होता. मुलूखही फार होता, पादशहाचा दबाव[1] होता. यास्तव मनसूर अल्लीखान वजीरीसाठीं झटत होता. आतां पादशाई बदवकरीची[2], खजीना नाहीं, मुलूख नाहीं, अशी जाली. याची रीतही गर्भ-श्रीमंतपणाची[3] आहे. यास्तव हें राजकारण खरें लटकें या गोष्टीचा पूर्ता शोध जाटाचे मार्फतीनें व गोविंद बल्लाळ यांचे मार्फतीनें पूर्ता करून आपणाकडील इतबारी[4] शहाणा सुजाउद्दवला पावेतों पाठवून सर्व रागरंग पाहून जर पन्नास लाख रोख प्रयाग हातास येत असला तरी वजीरी द्यावी. नजीबखानास बक्षगिरी[5] दिल्हियास तीस लाख रुपये देतो म्हणोन लिहिलें. ऐशियास नजीबखान पुरा हरामखोर बाट[6] आहे. गुदस्तां चिरंजीव दादाशीं त्यांशीं कांहीं मजा[7] राहिली नाहीं. तो दिल्लींत प्रविष्ट जालिया अबदाल्लीचेंच दिल्लींत ठाणें बसलेलें जाणावें. बेमान हरामखोर आहे. त्यास वाढवणें सर्पास दूध पाजण्याप्रमाणें आहे[8]. फावले[9] मानीं[10] त्याचें पारपत्यच करावें. मनसूर अल्लीचा लेंक प्रयाग न देई, बेरीज[11] मात्र बोलावी, रुपये द्यावयास तीन वर्षे लावावीं, असें करूं लागला, तरी गाजुदीखानाशीं जे जे करार चिरंजीवांनीं केले आहेत ते कायम करून, ते आपण एक होऊन असावें...तुमचा सरळ कारभार यास्तव हरएक राजकारण पक्के निशेचें[12] कोणतें हा शोध आपला इतबारी ज्याकडील राजकारण येईल त्याजकडे पाठवून पक्कें करून तो मनसबा करावा...नीट शोध करून ज्यांत मातबर पैका पन्नास लाख पाऊण करोड कर्ज वारावयास हातास येतातसें दिसेल [ तें ] तीळमात्र संशय न धरितां करावें. छ २१ रजब बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद पौ॥ छ २४ साबान मु॥ सतलज नदी.[13]

---

१ दरारा. २ दुर्वर्तनाची. ३ ख्यालीखुशाली, आळशीपण. ४ भरंवशाचा, प्रतिष्ठित. ५ सेनाधिपत्य, सैन्यांतील पगार वांटण्याचें काम. ६ लबाड. ७ गोडी. ८ नजीबखानाचें खरें स्वरूप नानासाहेबास किती स्पष्ट कळत होतें तें ह्यावरून दिसतें. ९ शक्य त्या. १० रीतीनें. ११ हिशेब मात्र तोंडानें बोलावा. १२ खात्री. १३ दत्ताजी व जनकोजी पंजाबांत दादांच्या मागून तेथील बंदोबस्ताकरितां गेले होते.

# १३१. भाऊसाहेबांच्या खुनाचा यत्न



पे० द० १, ले० ११
पृ० ११

२७-१२-१७५९

[असे प्रसंग त्या काळी केव्हां येतील याचा नेम नसे.]

श्री

छ २२ जमादिलाखर माघमास सुा सितेन.

श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक दताजी सिंदे कृतानेक दंडवत विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ताा छ ७ जमादिलावल मो[१] कुंजपुरा. स्वामीचे कृपावलोकने करून यथास्थित असे विशेष. सरकारचे आज्ञापत्र छ १० रबिलोवलचे पाठविलें ते छ २ जमादिलावली सादर जालें. तेथ आज्ञा छ ६ रबिलोवली दरबार करून बसलो होतो. त्यास मारेकरी मुसलमान यानी संध्याकाळचे समई पाठीमागून येऊन कटारेची हूल[२] चालविली. ते पाठीवर थोडीसी चुबकणी[३] लागली. खुनी धरले. सोध[४] मनास आणितां मुजफरखान व हैदरखान याजकडे मुदा[५] शाबूत जाला. तेव्हां त्यास व या मनसबियात आणखी होते त्यास धरून अठा जणाचा सिरछेद केला, म्हणून आज्ञा. ऐसीयास श्रीकृपेनें व वडिलांचे आशिर्वादें खैर[६] जाली. हे वर्तमान यैकोन परम समाधान जाले. स्वामी अवतारी. श्रीचें सुदर्शण फिरत असतां हरामखोरानी शस्त्र चालविले. त्याप्रमाणें केल्या कर्माचें फळ पावले. स्वामी आमचे छत्र. कल्याण जालें. मोठा संतोश जाला. याजउपर जाबता[७] उत्तम प्रकारें राखावा. कोण्हाचा इतबार[८] न धरावा.

---

१ मुक्काम. २ बरगडीच्या बाजूस केलेला वार. ३ बोचणे, ओरखडा. ४. शोध. ५ आरोप. ६ थोडक्यांत निभावलें. ७ देखरेख. ८ भरंवसा.

खास चौकीस दक्षणी मातबर वतनदार पाहून ठेवावे. म्हणजे त्याजपासून अंतर[1] होणार नाहीं. जाब्ता[2] राहेल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ती.

---

## १३२. उदगीरची लढाई

राजवाडे खं० १, लें० १६६, पृ० २५८

१९ फेब्रुवारी १७६०

॥ श्री ॥

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गोविंद[3] बल्लाळ स्वामी गोसावी यांसी :—

पोष्य सदाशिव चिमणाजी नमस्कार विनंति उपरि. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष. तुह्मांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी सविस्तर वरच्यावर लिहीत जाणे. इकडील वर्तमान तरी निजामआल्लीखानांनीं जागीर व दोन किल्ले देऊं केले असतां मागें पुढें पाहूं लागले. याजकरितां आह्मी बाहेर निघालों. फौज पाठवून नगरचा किल्ला घेतला. मागाहून आह्मीं नगरास येऊन तेथील बंदोबस्त करून दरमजल येऊन उदगिरीस मोगलास गांठले. पांच सात मजली पुढें चालिला. चंद्र १५ जमादिलाखरीं चंडोलावर[4] हल्ला करून मारून लुटून फस्त केला. तेव्हां मोगल जेर[5] होऊन जागीर व अशर, बऱ्हानपूर, दौलताबाद, विजापूर, मुल्हेर किल्ला याप्रमाणें तह केला. हें वर्तमान तुह्मास कळावें यास्तव लिहिलें असे. सारांश, मोगल फार तरतुदीनें[6] जुंझला. बहुता प्रकारें त्यास झुंझावयाची गांठ

---

१ दगा. २ कडक शिस्त. ३ गोविंदपंत खेर, बुंदेले. ४ पिछाडीच्या रक्षणाची फौज. ५ क्षीणबल. ६ योजना करून.

घालितां छातीचा कोट करून चंडोलावर फौजा उडवल्या. चारसा घटका[1] तीर तरवार, गोळा गोळी, बाण, हात, धोंडा याप्रमाणें मारीत मारीत खासियाचे अंबारीपर्यंत मोकळा केला[2]....तीर्थरूपाच्या पुण्येंकरून मोठी फत्ते झाली. या जुंजानें मोगलांत बाकी न रहातां साठ लक्षांची जागीर व सदरहूप्रमाणें स्थळें घेतली. याउपरि इकडील गुंता[3] उरकला[4]. चिरंजीव राजेश्री दादा फौजसुद्धां दरमजल त्या प्रांतीं येतील. इकडे मुलुख स्थळें चांगलीं मिळालीं, परंतु खर्च जाहला. कर्नाटकची स्वारी न झाली. तिकडेहि अवदालीचा पेच[5]. पेका मिळायाचें झालें नाहीं. तिकडील पेचामुळें इकडे आटोपावें लागलें. नाहीं तरी सारी दक्षिण मोकळी[6] होती. असो. तिकडील वर्तमान वरचेवर आठा रोजाआड तुह्मी लिहीत जाणें. मामलियाचा[7] ऐवज बाकी फार आहे. दहावीस लाख जरूर पाठविणें. चंद्र १ रजब. बहुत काय लिहिणे. हे विनंति.

---

१ 'ह्यावरून पेशव्यांच्या व निजामाच्या सैन्यांस कोणकोणत्या हत्यारांचा उपयोग होत असे हें दिसतें. कित्येक नुसत्या हातानेंच लढत. कित्येक गोफणीनें धोंडे फेकीत. कित्येक तिरकामटयानें तीर मारीत. कोणी नुसती तरवार चालवीत. कित्येक बाण फेंकीत व इभ्राईमखान गार्दी व केशवराव पानशी तोफा मारीत. ह्या असल्या गौडबंगाली सैन्याला इंग्रजांचीं कवायती पलटणें वाऱ्यासारखीं उडवून देत ह्यांत कांहीं नवल नाहीं' (राजवाडे टीप). २ मार्ग काढला. ३ लढा. ४ संपला. ५ डाव. ६ 'भाऊसाहेबांच्या मनांत श्रीरंगपट्टणला जाऊन तें हैदरच्या हातून काढावयाचें होतें व कायमची सर्व दक्षण मोकळी करावयाची होती' (राजवाडे टीप). व पानिपतचा प्रसंग न उद्भवता तर भाऊ हें पार पाडूं शकला असता. ७ तालुक्याचा वसूल.

# १३३. नंदराजास मदत करा



इतिहाससंग्रह, व० २, अं० ९, पृ० ६१ } { इ० स० १७६०

## चौथ सरदेशमुखीचें मर्म

श्री

" श्रीमंत राजेश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसी :— विनंति सेवक मुकुंद श्रीपत साष्टांग दंडवत विज्ञापना....

नंदराज यांजकडे हैदर नाईक यांनीं राजकारण लाविलें होतें कीं, लक्ष होनांचें राज्य तुम्हांस देतो; खाऊन सुखी राहणें. परंतु सेवकांनीं इकडून वरचेवर धीर देऊन पत्रें लिहीत गेले, व स्वामींचें अभयपत्र त्यांस होतें, तें प्रविष्ट केल्यावरून त्यांस धैर्य येऊन, हैदर नाईकाची गोष्ट कबूल न करितां, स्वामींचे ठायीं निष्ठा धरून, म्हटल्याप्रमाणें कबूल करून, करारनामाही लिहोन पाठविला. हल्लीं त्यांचा अभिमान धरून नाईकमजकुराचें पारिपत्य होई तें करणार धनी समर्थ आहेत. सारांश, हल्लींचा समय पुढें येणें नाहीं. हल्लीं अल्प कष्ट करून नंजराजाची स्थापना होऊन चौथ सरदेशमुखीचा अंमल बसतो, पुढें संस्थान आपलें होतें. हे समयीं खामखा[1] स्वामींनीं यांजवर कृपा करून पांच हजार फौज सडी जलदीनें पाठविली पाहिजे. सदर्हू फौज आल्यावर सर्व काम होतें, राजश्री नंदराज यांजवळ हल्लीं तीनशें फिरंगी[2], दीड हजार स्वार, तीन हजार बार[3] तोफखाना सरंजाम आहे; परंतु त्यास कुमक नाहीं. सरकाराकडून कुमक जाहलीयास, ते तिकडून, आम्ही इकडून, त्याचें पारिपत्य यथास्थित होईल. स्वामींचा प्रताप थोर आहे ये समयीं नंजराज यांजवर येहसान[4] होऊन सरंजामाचे[5] काम मातबर होतें[6]. याजवर धनी

१ कांहीं झालें तरी. २ पोर्तुगीज, युरोपियन. ३ बंदुकवाला शिपाई. ४ कृपा. ५ सरंजामदाराचें (नंदराजाचें). ६ चांगल्या रीतीनें सिद्धीस जाईल.

समर्थ आहेत. आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक केली जाईल. राजेश्री महिपतराव कवडे यांस पत्रें पाठविलीं आहेत. इतक्यांत येऊन पावले, तर घोरपडेही सामील करून घेऊन, ये सुमारास दाखल होत आहे. सारांश, अंगेजी[1] केल्यास हैदर नाईक याची बिशाद कांहींच नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना ".

---

# १३४. पुण्यांतील रुक्षता दूर करण्यास सुवर्ण नदीप्रवाह

राजवाडे ख० ६, पृ० २६७, ले० १६० } { इ० स० १७४३ (?)

[ हें पत्र, म्हणजे एक रूपकात्मक गद्य काव्य आहे. भगीरथानें स्वर्गाहून गंगा आणली तशी तीर्थरूपस्वामींनीं उत्तरेहून सुवर्ण नदी आणली. त्या प्रवाहानें सर्व संतुष्ट झाले, पण तृष्णा मात्र असंतुष्ट राहून वाढतच गेली. दक्षिणेकडून वाहणारी नदी जागजागा जिरली तशी जिरूं नये म्हणजे पुण्यास उत्तर दक्षिण नद्यांचा सागरोपम संगम होईल. उत्तरेंतून पैसा येतो पण दक्षिणेंतून येत नाहीं याला कारण त्या बाजूचे सरंजामदार. त्यांनीं तसें करूं नये हें पेशव्यास मोठ्या नाजुक रीतीनें सुचवावयाचें आहे.]

चि. रा. नाना (पुरंदरे) प्रति बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक आशीर्वाद उपरि....राज्यकार्यप्रसंग[2] विचार करितां भगीरथसमान कैलासवासी[3]-

---

१ उठावणी. २ राज्य कसें व कोणत्या प्रसंगानें वाढलें याचा. ३ बाजीराव व त्याचा बाप बाळाजी विश्वनाथ.

यांनीं उत्तरेहून दक्षण पावेतों सुवर्णनदीप्रवाह चोवीस[1] वर्षें वाहविला. त्यांचे आशीर्वादें अलीकडेही निरंतर वर्धमान वाहत असतां, देशाधिकारी सेनामुख्य व अकृत्रिमास[2] पूर्ण या नदीनें संतुष्ट केलें. एक तृष्णा मात्र त्या सुवर्ण-वोघानें वर्धमान केली. दक्षण देशांतून सुवर्णनदी मार्गे (स. १७२५–२६) रघूजी फत्तेसिंग बावांनीं आणिली, परंतु जागां जागां जिरली[3]. मध्यें बहुत दिवस दक्षिण नदी न वाहिली. श्रीइच्छेनें या वर्षींही कालानुरूप द्रव्यनदी उत्तमच या सैन्यांत आहे, परंतु पुण्याकडे जातां रुक्ष देश फार आहे,[4] याज-मुळें सर्व जिरून जाईल. एकदां उत्तरेकडीस सुवर्णनदी व दक्षिणेची नदी दोहींचा संगम सागरकूप समान पुणें या स्थळीं, मध्यें न जिरतां, पूरयुक्त[5] योग घडणें, तेव्हां ऋणोद्धार श्रमसार्थक इहलोक परलोकीं उत्तम होईल. भागीरथी सागरासाठीं उत्पन्न, परंतु विश्वातें उद्धार करिते; तशी या काळीं हे उत्तरदक्षण नदी वाहते, बहुत जनांस उपकारक होते. सर्वही नद्या जलौघें समुद्रास जातात, एक कावेरी मात्र बहुत लोकांनीं आपले उपयोगास आणिली तशी हे द्रव्यनदी मुख्य कार्य थोडें, व गौणजनकार्य मात्र बहुत करते.[6] हा न्याय अन्याय, हा विचार साक्षी[7] दृष्टिवंत असतील त्यांनीं विचारून[8] पुण्यांतील रुक्षता दूर होय, व मध्यें कार्याकारण[9] जिरे ऐसें करणें, हें योग्य असे. बहुत काय लिहिणें ? हे आशीर्वाद.

---

१ बाळाजी विश्वनाथ दिल्लीस इ. स. १७१९ सालीं गेला तेव्हांपासून २४ वर्षें इ. स. १७४३ त होतात. तेव्हां हें पत्र त्या सुमाराचें असावें. द्रव्याचा ओघ दक्षिणेकडे आणला. २ सामान्य माणूस (?), अधिकारी, सेनापति व साधीं (अकृत्रिम) माणसें. ३ आलेला पैसा मधल्या लोकांनीं आपल्या खर्चासाठीं राखून ठेवला. ४ दक्षिणेस वाटेंतच पैसे जिरवणारे लोक फार आहेत. ५ सर्व पैसा पुण्यांत येईल तेव्हां कर्ज फिटेल. ६ पैशाचा ओघ मुख्य स्थानीं म्हणजे पुण्याकडे थोडा येतो व सरदारादिक गौणलोकांकडे मुख्यतः पोंचतो असा अर्थ. ७ प्रत्यक्ष पहाणारे. ८ विचार करून. ९. कामा-पुरतीच जिरेल, उगाच आटणार नाहीं.

# १३५. अबदालीची रसद तोडा

राजवाडे खं० १, ले० २६१, पृ० ३६५ | १ नोव्हेंबर १७६०

## गोविंदपंतास पत्र

॥ श्री ॥

राजश्री गोविंद बल्लाळ स्वामी गोा :—

विनंति उपरि. अबदाली यमुना बागपताजवळ उतरला आणि गणोरास आला. खासा स्वारी[1] कुंजपुरीहून पाणिपतास आली. त्याजवर तीन दिवस गणोरास होते. तेथून भालकियास आले. तेथून दोन अडीच कोस आजी[2] आले. फार आवळून[3] चालतात. कही[4] लांबवू देत नाहीं. चाळीस कोस, पन्नास कोस धावतात तें नाहीं! अंतर थोडकें आहे. त्याचे आमचे बातमीची गोळागोळी होती. याप्रमाणें तीन दिवस होतें. दाणा दोन अडीच शेर गिलज्याचे लष्करांत आहे. हिंमत[5] फार आहे. तरी यास गिळणार. त्यास, लढाई लौकरीच होऊन येईल. परंतु तुह्मीं जलदीनें यमुनेपलीकडून येऊन बागपतेपर्यंत धुमामा[6] चालवून यास रसद[7] न पोहचे, फौजेस शह[8] पडे, ऐसें करावें आतां गिलज्याचा[9] पेंच[10] तिकडे नाहीं. यास्तव लांब लांब मजलीनें येणें. सुज्याअतदौलाचे मुलकांतहि जमीदारांजवळून[11] धुंद[12] करवणें. या कामास दिरंग न लावणें. हें काम मागेंच करावें ऐसें होतें. या उपरि तपशील[13] न लावणें. जाणिजे. छ २२ रबिलोवल बुंधेले वगैरे त्यास पत्रें पाठविणें त्याचाहि खबर लिहिणें. जाणिजे. छ मजकूर. दोनचार हजार फौज सडी निवडून बागपते-

---

१ भाऊसाहेब. २ आज. ३ संघटित राहून. ४ लष्करासाठीं गवत, लांकूडफाटा लुटून अगर अन्य रीतीनें आणणारी टोळी. ५ धीर, अवसान (भाऊसाहेबांचें) मोठें आहे. ६ धामधूम. ७ सामग्री. ८ ताण. ९ अफगाणांचा. १० गुंता, त्रास. ११ कडून. १२ धामधूम. १३ सबबी.

जवळ यमुना पारून[1] यावें. रसद मारावी. गडमुक्तेश्वर, शामळी, वगैरे नजीबखानाचे प्रांत जाळावे. अबदालीस मागें रसद बंद होऊन मुलुकाचा बोभाट[2] होय असें जरूर करणें. वारंवार लिहिलें जाऊन अजून तुह्मी उमरगडीच आहां हें अपूर्व आहे! आतांहि लिहिलेप्रमाणें न जाले तरी मर्दुमीचें[3] काम होत नाहींसेंच जालें! ईरे[4] धरून तडकून[5] येऊन काम करणें. रा. छ २२ रा लावल. हे विनंति.

---

## १३६. अबदालीस पडलेला पेंच

**राजवाडे खं० १, लें० २६५, पृ० ३७०** — **५ नोव्हेंबर १७६०**

[पानिपतचें युद्ध १४ जानेवारीस झालें. तत्पूर्वीचें हें मराठ्यांचा उत्साह दर्शविणारें पत्र वाचण्यालायक आहे.]

॥ श्री ॥

चिरंजीव राजश्री दिवाकर जोशी यासि प्रती कृष्ण जोशी आशीर्वाद उपरि. येथील कुशल तागाईत आश्विन वद्य १३ बुधवारपर्यंत मुा फणीपत[6] येथें सुखरूप असो. विशेष वर्तमान तरी श्रीमंतांहीं महाष्टमीस[7] समधखान व कुतुबशहा मारून, दहा हजार सेना लुटून, कुजपुरा घेऊन लुटिला गढी[8] खणून जमीनीबरोबर केली. लोक आभर[9] जाहले. श्रीमंतास भूमिगत सात लक्ष रुपये सापडले. तेथून कूच करून कुरुक्षेत्रास चालिले होते इतकियांत अबदाली बागपतापाशीं यमुना पायाब[10] उतरून सोनपथास आला. हें वर्तमान श्रीमंतीं ऐकतांच माघारे फिरोन यवनाचे सन्मुख दरमजल फणिपथास आले.

---

१ पलीकडच्या तीरानें. २ ओरड, दंगा आहे अशी स्थिति. ३ पराक्रमाचें. ४ ईर्ष्या. ५ त्वरेनें. ६ पानिपत. ७ आश्विन शु. ८. ८ भुईकोट किल्ला. ९ संतुष्ट. १० नदीचा पायउतार.

यवन येथून दोन कोसावरी राहिला आहे. नित्य थोडें थोडें युद्ध होत आहे. श्रीमंतांहीं[1] चोहोंकडे तोफखाना पसरला आहे. यवनास थोर भय जाहलें आहे. पुढें येववत नाहीं. आमचें सैनिक यवनाचे समक्ष उभे राहून, नित्य शेंपन्नास यवन मारून उंट, घोडीं आणितात. दोन हत्ती पेंढारी यांनीं काल आणिले. यवनाच्या सैन्यास रसद[2] बंद जाहली. यामुळें पीठ ८८३[3] व चणे ८८४, तूप ८८॥ याप्रमाणें महर्ग जाहलें आहे. आमचे सैन्यांत गहूं ८।६[4] व चणे ८।२ व तूप ८८२॥ याप्रमाणें सवंगाई[5] आहे. आणखी दोन चार दिवसांत यवन चालोन तोफावरी येईल तरी क्षणमात्र बुडेल. न ये तर आमचे लोक जाऊन युद्ध करणार. वरकड सर्व प्रकारें करून शुभ चिन्हें होतात व स्वप्नें उत्तम श्रीमंतांस होतात. याजवरून सर्व सैन्यास उत्साह आहे, कीं अबदाली व नजीबखान व सुजातदौला आठा चौ दिवसांत क्षयास जातील ऐसें दिसतें. अबदाली शाहानशाहा[6] ह्मणवीत होता. त्यानें युद्धें बहुत केलीं आहेत, परंतु तो दो कोसांवरी येऊन आठ दिवस बसोन कांहीं पराक्रम होत नाहीं. याजमुळें आमची फौज बहुत शेर[7] आहे. अबदालीनें स्वदेशास जावें तरी मार्ग नाहीं; युद्ध करावें तरी परिणाम नाहीं; उगेंच बसावें तरी भक्षावयास

---

१ श्रीमंतांनीं. २ " यमुनेस पाणी फार असल्यामुळें यमुना उतरल्यावर कांहीं दिवस अबदालीच्या सैन्यांत फार महर्गता झाली. दिल्लीस मराठे असल्यामुळें यमुनेच्या दक्षिण तीरानें अबदालीला कही मिळणें अशक्य होतें. त्याला कही (लष्करसामग्री) अंतर्वेदींतून यावयाची, परंतु अंतर्वेद सोडून तो यमुनेच्या दक्षिणतीरीं आल्यामुळें त्याला अंतर्वेदींतून रसद मिळणें प्रथम प्रथम कठिण पडलें. परंतु पुढें लवकरच पाणी जसजसें उतरत गेलें तसतशी अबदालीच्या सैन्यांत चंगळ झाली. ह्या पत्रांत अबदालीच्या सैन्यांत महागाई झाली म्हणून म्हटलें आहे. ती महागाई गोविंदपंतांच्या पराक्रमामुळें झाली असा मुळींच अर्थ नाहीं. ती महागाई यमुनेच्या पाण्यानें व अबदालीनें केलेल्या स्थलांतरामुळें झालेली होती. गोविंदपंत अंतर्वेदींत असून त्यानें हें पायबंद देण्याचें व कही अडविण्याचें सहज होण्यासारखें काम केलें नाहीं." (राजवाडे टीप). हें काम गोविंदपंतांच्या आवाक्याबाहेरचें होतें, असें रियासतकार सरदेसाई म्हणतात. ३ तीन शेर, हे भाव दर रुपयास असावे. ४ एक पायली व सहा शेर. ५ स्वस्ताई. ६ राजाधिराज. ७ उत्साहपूर्ण.

नाहीं. याप्रमाणें विचारांत पडला आहे. मागाहून युद्ध जाहल्यावरी सविस्तर होईल तें लिहूं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

---

## १३७. नाना फडणीसाचें आत्मचरित्र

काव्येतिहाससंग्रह, लें० १९२

श० १६८३ आषाढ व० ३ ता० २०-७-१७६१ नं. चें

[पानिपतच्या लढाईंत अगदीं अखेरच्या प्रसंगापर्यंत नाना फडणीस भाऊजवळ होता. त्यानें लिहिलेलें हें आत्मचरित्र इतिहासाचें साधन म्हणूनच नव्हे तर मराठी वाङमयाचा एक बहुमोल अलंकार आहे. हें समग्र मुळांतून वाचल्यास कांहीं ठिकाणीं महात्माजींच्या आत्मचरित्राची आठवण झाल्यावाचून राहणार नाहीं.

या उताऱ्यावरून (१) भाऊ गर्विष्ठ होता. (२) त्यास अखेरच्या दिवशीं लढाई प्रतिकूल जाण्याचा संभव वाटूं लागला होता. (३) नानांच्या मतें त्यानें खंदकबंद लढण्याची रीत उचलली हें चुकलें. (४) अबदालीकडून सर्वांत जोराचा हल्ला निशाणाजवळ न होता अन्यत्र झाला. (५) त्याबरोबर डाव्या उजव्या बाजूंच्या लोकांनीं पळ काढला, इतके मुद्दे उपलब्ध होतात. त्यांची प्रत्यंतरपुराव्यानें छाननी केली पाहिजे.]

श्रीकृष्ण प्रसन्न

...मीही युद्धांत होतों. ईश्वरें रक्षिलें. तो इत्कियांत यवन आलीकडे आला. श्रीमंत सैन्यासहवर्तमान त्याचे समोर गेले. गांठ पडली. तेव्हां मी तर लहान श्रीमंताचे बुद्धीस महानबुद्धी परंतु भावी[1] अर्थ' तेणेंकरून विपर्यास

---

१ होणार गोष्ट.

पडला. आप्त होते बळवंतराव[1] मातुल व नाना पुरंधरे वगैरे ते अनाप्त झाले. जे अनाप्त शाहनवाजखानी[2], भवानी शंकर वगैरे ते आप्त जाहले. त्यांचे वाक्याचे ठायीं विश्वास तणेंकरून आपली रीत युद्धाची सोडून यवनाची रीत[3] धरिली. परस्परें युद्ध होत असे. गोळे प्रत्यहीं शत्रूचे राहुटीवरून जात. मातोश्री व स्त्री भयभीत होत. कीं कसे होईल? ते ते समयीं मातोश्रीस विनंती करीत गेलों, कीं मी विनंती करितों. एक ईश्वरीं लक्ष असावें. त्यांत मातुल युद्धांत होते ते पडले. ते दिवशींच सर्व सैन्य नाशास पावावें. परंतु रात्र जाहली यामुळे राहिलें. त्या दोन महिन्यांत मनुष्यें, पशु बहुत मेले. अन्नाची महगता. दुर्गंधी एकेच ठिकाणीं. असे श्रम पाहिले. पुढे मातुळाची स्त्री समागमें[4] गेली. मातोश्रीस श्रम फार जाहले. होणार अवश्यक होतें. यदर्थी संदेह धरूच नये. हा माझा निश्चय, पुढे थोरले युद्ध* उदयीक होणार तो पूर्व दिवशीं संकेत कीं, पराजय आपला जाहला तरी शत्रूचे हातीं श्रीमताचें कुटुंब व आपले हातीं लागू नये. आपणच नाश करवावा. आपण तर वांचत नाहीं असा सिद्धांत करून श्रीमंतांनी याची ही योजना केली. दुसरे दिवशीं तयार होऊन प्रातःकालचे दोन घटिका दिवसास युद्धास गोळागोळीचा प्रारंभ जाहला. श्रीमंत अति बुद्धिवान्, धैर्यवान , शूर, कृतकर्मे गर्व मात्र विशिष्ट[5], परंतु ततुद फारच सैन्याची वगैरे केली. शेवटीं निशाणाजवळील ततुद एकीकडे जाऊन शत्रूची मुख्य स्थानींच गांठ पडली. मी श्रीमंतासन्निध ईश्वरस्मरण किंचित् करून असें. तों विश्वासराव यांस गोळी लागली. पडले. ते हत्तीवर श्रीमतांनीं घालून उभेच राहिले. तो पठाण पायउतारा आंत येऊन मिसळले. तोडातोडी होऊं लागली. आणि डावे बाजूचे मातबर सरदार, चौघडयाचे धनी देखील, पूर्वीच पळाले. उजवे, बाजूचेही होळकर शिंदे निघोन निशाण निघालें. दोन तीन शत पायदळ होते. श्रीमंत दिसेनातसे

---

१ बळवंतराव मातुल = हे बळवतराव गणेश मेहेंदळे. नाना म्हणतात मातुल अनाप्त झाले. परंतु दुसरे लेखात बळवंतरावांच्या मसलतीनेंच भाऊसाहेब चालत असत असें म्हटलेलें असतें. २ हे दिल्लींतील पादशाही मुत्सद्दी. ३ एक जागा खंदक करून राहणें ही रीति; ही यवनी रीत इभ्राइमखा गाडदी याचे मसलतीवर व बळावर पतकरली. ४ सती. *थोरलें युद्ध = पौष शुद्ध ८ शके १६८२. ५ विशेष.

जहाले. तेव्हां ईश्वरें बुद्धी दिली. माघारे फिरलों. पूर्वी युद्धांत बापूजी† पंतीं बोध केला, माघारें फिरावें. त्यांस उत्तर केलें कीं, अशा समयीं श्रीमंतांस सोडणें ठीक नाहीं. परंतु पुढें याप्रमाणें जहालें. लक्ष सैन्य त्यांत मोठे मोठे सरदार असतां एकही त्या समयीं श्रीमंतांस आप्त न जहाला. बहुत दिवस अन्न भक्षिलें, कृपा पुत्रवत् केली. तितकें चांगला काळ होता तेव्हां केशास ढका लागल्यास प्राण देऊं अशा प्रतिज्ञा. परंतु ईश्वर घटित विपरीत काळ त्यांत सोबती कोण होतो? सर्व सुखाचे सोबती. भोजन आदरें करून करावें. वस्त्रें, जवाहीर, जागिरा द्याव्या. निदानीं[1] इतकें असून ज्यांचे देहाचें ठिकाण कोणास ठाऊक नाहीं. सर्व वाताहत जहाले. मी सायंकालचे दोन घटका दिवसास घोड्यावर पाणिपतांत आलों. त्या देशाचा माग अगदीं ठाऊक नाहीं. तेथें परमेश्वरें वाट दाखवावया पुरते रामाजीपंत उभे होते. मागं लागले घोडें वस्त्रें टाकून द्यावीं. त्या वरून सर्व टाकून शुद्ध लंगोटी लावून बसलों. रात्र जहाल्यावर चाललों. तों एका कोसास तीन चार वेळ शरीरास हात लावून टोपीवाल्यांनीं झाडा घेतला. दर खेपेस समागमेचे दहावीस तोडून टाकीत. त्यांत मी राहिलों, हे सत्ता ईश्वराची. परंतु बापूजीपंत, रामाजीपंत, राहतच गेले. असें जातां दाहा बारा कोश पश्चिमेकडे गेलों, तों तेच शत्रु येऊन रामाजीपंत, बापूजीपंत वगैरे यांस जखमी भारी केलें. पडले. मी एकटा राहिलों. तों गवतांत गेलों. ईश्वरें तृणें करून माझें रक्षण केलें. त्यांस मोहनी घातली. सर्वांस मारिलें असतां मी जवळ असतां न मारिलें, व गवत लांब असतां जाऊं दिलें. पुढें ते गेल्यावर जाऊं लागलों, तों पुढें दोन कोशांवर दुसरे मागती दृष्टीस पडले. तेव्हां मागती तृणांत जाऊन बसलों. तों जवळ येऊन काढूं लागले. ते समयीं ईश्वर त्यांतीलच एका वृद्धाचे मनांत संचार करिता जाहला, कीं कशास मारितां? मग गेले, तदनंतर माझी शक्ति पाणिपतावर बहुत क्षीण, आमविकारादिक[2] विकारयुक्त[3], अन्न चालेना, असा मी त्याजवर दयासमुद्र सांबसदाशिव जो याणें कृपा करून, शरीर अशक्त, ऊन पाहिलेंच नाहीं, व पादचारी अभ्यास नसतां सोळा सत्रा कोश अन्न उदका-

---

†हा बापूजीपंत फडके असावा. १ अखेरीस. २ आमांशापासून होणारा रोग. ३ बिघडलेली.

व्यक्तिरिक्त आलों. क्षुधा तिसरे प्रहरीं लागली. तेव्हां बोरीचा पाला सांपडला तो खाऊन पाहिला तो तोंडांत जाईना. तसाच सायंकाळीं एका ग्रामाबाहेर आलों, तों एका वैराग्यानें पीठ आणून दिलें. त्याची भाकर खादली. ती अमृत-समान लागली. नंतर निद्रा केली...

---

## १३८. मोडली बाजू सांवरली तरच कर्तृत्व सर्वांचें !

**ऐतिहासिक* लेखसंग्रह, वर्ष १ लें, पत्र नं० ३३** } { **२९ जून १७६१**

[ऐतिहासिक लेखसंग्रहांत पटवर्धन घराण्याचा पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला आहे. हें पत्र त्रिंबक हरीनें पुण्यास गोपाळराव होता त्यास लिहिलें आहे.]

श्रीगणराज

आशीर्वाद. उपरी[1]. मुख्य यजमान[†] परधामास[2] गेले. भाऊसाहेबही नाहींत. श्रीमंत राजश्री दादासाहेब याणीं फौजेचा गाहा[3] सचतर[4] करून कोट किल्ले जागजागां पत्रें पाठवावीं. दक्षिणेस आतांपासून तरतूद करून फौज पाठवावी. दर वर्षास पहिली इकडून फौज जात होती तेव्हां लोकांत दबाव[5] होता. ते यंदा फौज राहिली आहे, यामुळे काटक[6] शेर[7] होतील. राजश्री हरीपंत व चिमाजीपंत यांस बोलावणें आलें होतें त्यास[8] आतां अमावास्या जाहलियावर

*'ऐतिहासिक लेखसंग्रह' या मासिकाचा पहिला अंक कै. वासुदेव वामनशास्त्री खरे यांनीं कुरुंदवाड येथें भाऊनाना छापखान्यांत छापून तो जून १८९७ त प्रसिद्ध केला. १ यानंतर. †नानासाहेब पेशवे. २ मृत्यु पावले. ३ एकीकरण. ४ स्वतंत्र. ५ दहशत. ६ कर्नाटकचे लोक. ७ वरचढ. ८ 'त्यास', 'ऐमियास' या शब्दांनीं आधीच्या वाक्याच्या उत्तराचा प्रारंभ होतो.

येतील. सर्वांनीं जें आजवर करामत[1] केली त्याचें नवल नाहीं. आतां मोडली बाजू सांवरली तरच कर्तृत्व सर्वांचें ! राजश्री बाबूराव[2] आणवावे. गडकिल्ले मजबुदीनें राखावे. सिंहगडची, पुण्याची खबरदारी[3] करावी. आळस न करावा. तुम्हीं ही सांगावें कळेल तसें. चुकों नये. सर्व मंडळी शहाणे आहेत तितक्यानीं लोभ धरूं नये. एकवेळ नाइकीस[4] आव घालावा. राजा[5] नवा करणार तो करावा तेव्हां एकंदर बहुत विचारें करावें. नाहीं तर नवा राजा जाइला म्हणजे त्या भोंवती आणखी चौघे मिळून फितवाफांदडा[6] करितील. आपण होऊन कलह केला ऐसें होईल. राजश्री त्रिंबकराव[7] व राजश्री नाना पुरंदरे ऐसे सर्वांनीं मिळोन एकचित्त असावें. जशी वर्षास दक्षणा देतात तशी द्यावी. चहूंकडे चिठ्या पाठवाव्या कीं, वर्षा प्रमाणें येणें. ऐसें आहे. यांत थोर कर्ते आहेत. आमची बुद्धि काय आहे ? श्रीमंत राजश्री राघोबा सुज्ञ आहेत. तुम्हीं आपणांस कळेल ते बुद्धीस[8] अंतर न करावें. यांत ईश्वर फुरसत[9] देईल तो आव[10] धरील. कोण वळावल्यानें अपाय आहे हें ही दृष्टींत असावें. श्रीमंत फत्तेसिंगबावाची फौज आहे हे गाहा[11] करून एकगांठी[12] करावी. दिवाणास ही बोलावावे. होळकरास वडीलपणे लेहून त्याचें पत्री बहुत समाधान करून भर[13] भरवावा. दमाजी गाइकवाडास ही पत्रे पाठवावी. कारकून पाठवावे. तांब्राची[14] खातमी राखावी. ऐसे आहे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

---

१ प्रयत्न. २ बाबूजी नाईक. ३ बंदोबस्त. ४ पुढारी होण्याची हिंमत धरावी. ५ यावरून ताराबाई मरतांच रामराजास गादीवरून काढून दुसरा राजा करण्याची मसलत घाटत होती असें दिसतें. ६ फितूर. ७ त्रिंबकराव व नाना पुरंदरे हे भाऊसाहेबांचे पक्षाचे असल्यामुळें दादासाहेबांशीं त्यांचें सरळ नव्हतें. या प्रसंगी त्यासही ममतेंत घ्यावें असा लिहिणाराचा भाव. ८ येणारा विचार अंमलांत आणावा. ९ साहाय्य. १० प्रतिष्ठा, महत्त्व. ११ एकत्र. १२ एकत्रित. १३ मोठेपणा द्यावा. १४ निजाम अल्ली.

# १३९. दादासाहेब व आम्ही एक झालों

## हीच गोष्ट एका करोडीची झाली

---

ऐतिहासिक लेखसंग्रह, वर्ष १ लें, नं० ९१ — १७-२-१७६३

[ हें पत्र माधवराव पेशव्यानी गोपिकाबाईस लिहिलेलें आहे. पेशव्यांचें वय या वेळीं अठरा वर्षांचें असूनही त्यांचे विचार किती पोक्तपणाचे होते हें या पत्रावरुन कळून येईल. अशीं पुष्कळ पत्रें उपलब्ध आहेत. ]

श्री

पुरवणी. तीर्थरूप मातुश्री बाई वडिलांचे सेवेशीं.

विज्ञापना. कारभारी[1] यांचे पेचांमुळें[2] आमचे दौलतेच्या तणावा[3] तुटत चालल्या. पहिल्यापासून राखिलें असतें तर सर्व ही आपआपला कारभार करून लगामीं[4] राहते. तें न झाल्यामुळें सर्व मुलूख बुडाला. पतयातेज[5] उडाली. लोक फितूर फार झाले. धन्याचें वजन राहिलें नाहीं. शत्रु बलवत्तर झाले. तथापि पैसा असता तरी सर्व ही गोष्टी इतके ही पेच संभाळून नीट होत्या. त्यास पैसा नाहीं. पैसा नाहीं तेव्हां फौज कशावर ठेवावी ? फौज नाहीं दौलत कशी राहणार ? असें बारीक बारीक पाहतां सारें अवघडच आहे. प्रस्तुत तीर्थरूप राजश्री दादासाहेब व आम्ही एक झालों हीच गोष्ट एका करोडीची[6] जाहली. त्यांची आमची एकवाक्यता झाली. ममताही परस्परें पहिल्या पेक्षां अधिकोत्तर मिळाली. कारभारी ही लगामीं उत्तम प्रकारें लागले. आमची दौलत पूर्वी प्रमाणें करावी हेंच मानस अंतर्यामापासून [ त्यांचें ] आहे. या उपर त्यांचा दुसरा संकल्प नाहीं. जें करणें तें आपले व

---

१ सखारामबापू व त्रिंबकराव. २ डाव, कपट. ३ ताणदोरी (तंबूची). ४ कच्छपी. ५ (?). ६ लाख मोलाची.

आमचे विचारें करावें. दौलतीस ज्या गोष्टीनें कल्याण तीच गोष्ट साऱ्यानीं करावी. हीच बुद्धि आहे व प्रस्तुत या प्रमाणेंच चालत आहे. आतां गोष्टी जाहल्या आहेत, याच गोष्टी दृष्टीस असाव्या. येणें कडून पार[१] लागेल तो लागेल ! नासले[२] त्यास दुसरें झालें तरी अगदींच नासेल. यास्तव झालें तें उत्तम आहे. एक विचार असावा तो आहेच. परिणाम लाविणार परमेश्वर समर्थ आहे व वडिलांचें पुण्य आहे. रवाना छ ३ साबान बहुत काय लिहूं हे विज्ञापना.

**अभ्यास :**—मागील व हें पत्र वाचून माधवराव पेशव्यांच्या अडचणी कोणत्या होत्या तें स्पष्ट करा.

---

## १४०. राक्षसभुवनची लढाई

| | |
|---|---|
| **ऐतिहासिक पत्रव्यवहार, पत्र नं० १०५** | **शके १६६३, श्रावण शु० ७ ता० १५–८–१७६३** |

श्री

श्रीमंत राजश्री स्वामींचे सेवेशी

पोष्य[३] रामचंद्र गणेश साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल

---

१ निभावून जाणें. २ एक दादासाहेबांनीं वेडेपणानें मोगलांस मदतीस बोलावून राज्यांत बखेडे केले तेणेंकरून हानि झालीच आहे. आपणही तसेंच करूं लागलों तर आणखी हानि होईल; असा या लिहिण्याचा अभिप्राय आहे. ३ ज्याचें पोषण करावयास पाहिजे असा. पूर्वीच्या पत्रव्यवहारांत वयाने वडील मित्र किंवा आश्रयदाता इत्यादींना पत्रें लिहितांना लिहिणाराच्या नांवापूर्वीं हा शब्द मायन्यादाखल लिहीत असत.

ता' छ' ५ सफर जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे विशेष. आपण कृपा करून ज्येष्ठ वद्य द्वितीयेस पत्र पाठविलें तें छ १ सफरीं पावलें. परम संतोष जाहला. इकडील वर्तमान तरी छ २९ मोहरमीं नजीक राक्षसभुवन येथें निजामअलीकडील सारे सरदार व निम्मी फौज याप्रमाणें गंगे अलीकडे विठ्ठल सुंदर होता. निजामअली खासा मात्र पलीकडे होता. त्यानंतर आपले लोकांनीं सकाळच्या दीड प्रहर दिवसास मोगलांचे फौजेवर चालोन घेतलें. ते बेजरब' गोटांतच गेले. लढाई चांगली जाहली. विठ्ठल सुंदर व विनायकदास व गोपाळसिंग ग्वंदारकर राजा हे त्रिवर्ग ठार झाले; व सदाशिव रामचंद्र यास जखमा झाल्या होत्या, त्यास तो तसाच गंगेंत उडी मारून पार झाला. निजामअलीस खदार' पलीकडे कळतांच जनानखाना तेच वेळेस औरंगाबादेस पाठवून दिला व आपण छ ३० मोहरमीं पहांटेचे प्रहररात्रीस डेरेदांडे' टाकून दोनशे राउतांनिशीं' औरंगाबादेस गेला. अलीकडे फौज व बाजारबुणगे जितके होते, त्यांपैकीं कांहीं मारले गेले व फार करून लुटले गेले. आपणास कळावें म्हणोन लिहिलें असे. बहुत काय लिहिणें ? लोभ कीजे' प्रस्तुत फौजा गंगा उतरून पार जाऊन शहरास शह' द्यावा असा विचारवेत आहे. गंगेस पाणी फार आहे. नावा नाहींत हे विनंती.

**अभ्यास :**—राक्षसभुवनच्या लढाईचें वर्णन आजच्या भाषेंत करा.

---

१ तागायत. २ 'छ' चंद्रकोरीची खूण मोडीत लपेटीने लिहता लिहितां तिचें 'छ' त रूपांतर झालें. मुसलमानी चांद्रमानी कालगणनेपूर्वी ती लिहिण्याची पद्धत होती. ३ बेधडक. ४ (?). ५ तंबू वगैरे. ६ स्वार. ७ करावा. ८ हल्ल्यासाठीं तळ धरून बसणें.

# १४१. 'चिरंजीव रायानीं शर्थ केली'

ऐतिहासिक लेखसंग्रह, वर्ष २ रें, नं० ३४७ | १४ ऑगस्ट १७६३

श्रीशंकर

तीर्थरूप मातुश्री बाई वडिलांचे सेवेशी.

अपत्यें रघुनाथाचा[1] साष्टांग नमस्कार विनंती. वडिलीं लिहिलें कीं, 'यश ईश्वरें मोठें दिलें असतां वर्तमान (तुम्हीं) लिहिलें नाहीं;' त्यास वर्तमान वडिलांस न लिहावें तरी कोणास लिहावें? सविस्तर वर्तमान लिहून पत्र पाठविलें आहे. पावलें असेल. जासुदास पावावयास उशीर लागला असेल. सारांश ईश्वरी दयेनें व वडिलांचे आशीर्वादानें यौवनाचे फौजेचें उत्तम पारिपत्य झालें. एकटा यवन थोडे फौजेनिशीं पळोन शहरास गेला आहे त्याचें ही पारिपत्य होईल. इतके दिवस गंगा[2] पूर चालली होती. सांप्रत उतार होत चालला. दोन तीन दिवसांत उतार होईल. लष्कर उतरत आहे. गोपाळराव गोविंद लष्करांत दाखल झाले. सर्व[3] ही सांप्रत आले आहेत. लवकरच [ गंगा ] उतरणार आहों. चिरंजीव रायानीं[4] यंदां मेहनतींत व शिपायगिरींत कमी केली नाहीं. आम्हां पेक्षां अधिक जाहले. इतके दिवस त्यांनीं लढाई देखिली[5] नव्हती. (ही) पहिली लढाई पाहिली. त्यांत सर्व प्रकारें

---

१ हें दादासाहेबांचें गोपिकाबाईस पत्र. २ गोदावरीस पूर चालला होता. ३ बाकीचे रुसलेले सरदार भोसले, प्रतिनिधि, वगैरे. ४ अर्थात् माधवराव पेशव्यांनीं. ५ 'इ. स. १७६१ च्या अखेरीस मोगल पुण्याहून चालून आला तेव्हां त्याशीं ज्या लढाया झाल्या त्या पेशव्यांनीं जरी सर्व पाहिल्या होत्या तरी त्यांत त्यांनीं पुढाकार घेतलेला नव्हता. स्वतःशीं घोडनदी व आळेगाव येथें पेशव्यांच्या ज्या लढाया झाल्या त्या दादासाहेबाच्या मतें मुळीं लढायाच नव्हत! लढाईच्या ऐन आणीबाणीच्या वेळीं कसें वागावें लागतें व कशा तरतुदी (तजविजी) कराव्या लागतात हें पेशव्यांस राक्षसभुवनचे लढाईंत प्रथमच कळलें असें दादासाहेबांचें मत' (खरे टीप).

तरतूद अधिक केली. यांचा पुढें कर्तेपणाचा भरंवसा आम्हांस आला. सांप्रत कारभार चिरंजीवच करितात. आमचे मर्जी प्रमाणें वर्ततात. तिलमात्र वांकडें चालत नाहींत. आम्ही ही यथाज्ञानें सुचतें तें त्यांस सांगतों. तेच कारभार करितात. माझें शरीर बहुत अशक्त झालें. मेहनतीस कामाचें नाहीं. निजामअल्लीचा मनसबा[1] शेवटास गेल्यावरी कोठें तीर्थीं बसून कांहीं ईश्वरभजन[2] करावें इतकेंच मानस आहे. परमेश्वर इच्छा पूर्ण करणार समर्थ आहे. आतां निजामअल्लीस मारणें सहज आहे, परंतु लोकांस ऐवज[3] पावला नाहीं यामुळें लोक मन घालीत नाहींत. तथापि जोर करून ईश्वरस्मरण करून काम हरकसें[4] शेवटास नेतच आहों. र॥[5] श्रावण शुद्ध त्रयोदशी. रविवार. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना. पै॥[6] छ १६ सफर.

---

# १४२. हैदरवर हल्ला!

ऐतिहासिक लेखसंग्रह,
वर्ष २ रें, नं० ५१०

२-१२-१७६४

[यात प्रत्यक्ष लढाईच्या हालचालीचें सविस्तर वर्णन आहे म्हणून हा उतारा विस्तारानें दिला आहे.]

---

१ अंगीकृत कार्य. २ या वेळी दादासाहेबांचें वय फक्त २९ वर्षांचें होतें, असें असतां त्यांची प्रकृति इतक्यांतच डबघाईस आली यांत नवल नाहीं. थोरले बाजीराव व थोरले चिमाजी आप्पा व नानासाहेब पेशवे यांचीं शरीरें क्षीण होऊन चाळिशीच्या आंत ते मरण देखील पावले. माधवराव पेशव्यांस तर मरणसमयीं पुरतीं एकूणतीसही वर्षे नव्हती. त्या मानानें पाहतां दादासाहेब दैववान् समजावयाचे, कारण ते ४९ वर्षेपर्यंत तरी वांचले होते! हा ईश्वरभजनाचा संकल्प जर दादासाहेबांच्या हातून सिद्धीस जातां तर तो महाराष्ट्रास फार फायदेशीर झाला असता! ३ पैका. ४ हरएक उपायानें. ५ रवाना. ६ पैवस्ती. पत्र ज्याला लिहिलें त्याला पोंचल्याची तारीख.

अपत्यें नीलकंठानें[1] साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत मार्गशीर्ष शुद्ध दशमी रविवार पावेतो मुक्काम नजीक जडे अनवटी[2] येथें वडिलांचे आशीर्वादें करून यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान तर बंकापुर व सावनुरचे मध्यें श्रीमंताचा मुक्काम जाला, तेथून वडीलांस पत्र पाठविलेंच आहे. त्याच तळावर[3] मसलत जाहली कीं, तुंगभद्रापार गेलेनें इकडे[4] तिकडे उपद्रव होईल. यास्तव झाडीचे तोंडीं तो आहे तेथून माघारा झाडींत गेला तर आपण तुंगभद्रा तीरास जाऊन शिवमोग्याकडे जावें. तिकडून (त्याच्या) मुलखांत शिरावें. म्हणजे तो बळ[5] धरून राहिला तर तेथेंच श्रम करून पारिपत्य करावें. असा करार होऊन तेथून कूच करून हनगळास आले. तेथें त्याचें ठाणें होतें तें तोफा लावून घेतलें संध्याकाळीं. नतर दुसरें दिवशीं तेथें मुक्काम जाला. तेथून पाठी बुधवारीं कूच[6] जाले तो श्रीमंत त्याचे लष्करापासून चहूं कोसावर आले. आम्ही व विठ्ठल शिवदेव त्याचे लष्करापर्यंत गेलों. त्याची चौकी[7] नदीवर होती. आमचे अघाडीचे लोक जातांच त्यांची यांची गांठ पडली. ते मोडले. पेंढारी[8] बहुत लोक होते. आह्मांकडील थोडेच होते. परंतु त्यास मोडिला. पाउणशें पर्यंत घोडे घेतले. फौजेत दहा वीस. बाकी अगदीं पेंढाऱ्यांनीं घेतले. संध्याकाळीं माघारे गोटास[9] आलों. दुसरे दिवशीं श्रीमंत फौजसुद्धां नदीवर आले. तदनंतर त्याचे लष्करचे दोनी बाजूंचे रान सोडवावें ह्मणोन पूर्वेस आम्हीं व विठ्ठल शिवदेव पाठविले, पश्चिमेस नारो शंकर व रास्ते व भोसले व मुराररराव यांस पाठविलें. तदनंतर आम्ही गेलों. पूर्वेस एक टेकडी तोफेचे मारांत होती तेथें गेलों. जागा पाहिली. (तेथून हैदराचें) लष्कर सारें दिसूं लागलें. तेथून तोफा लावाव्या असा करार करून

---

१ पत्र नीलकंठराव त्रिंबक याने त्रिंबक हरीस लिहिलेलें. २ गांवाचें नांव. ३ मुक्कामावर. ४ आपल्या मुलुखांत चोहींकडे. ५ तेथेंच मुक्काम करून लढाईस तयार झाला. ६ निघाले. ७ ठाणें. ८ मराठी लष्करांत प्रत्येक सरदाराबरोबर कांहीं पेंढारी असत. ते लुटीपैकीं कांहीं नजराणा म्हणून त्या त्या सरदारास देऊन त्याच्या आश्रयानें राहात. लुटीपैकीं जो माल फौजेंतील लोकांच्या हातीं लागेल तो फौजेवरच्या सरदाराचा, पण पेंढाऱ्यांनीं मिळविलेला माल पेंढाऱ्यांचा. यामुळें शत्रूचे पाऊणशें घोडे हिरावून घेऊनही नीळकंठरावास फारसा संतोष झाला नाही. ९ छावणीकडे.

आलों. दुसरे दिवशीं शुक्रवारीं सखारामपंतास[1] नेऊन जागा दाखविली. शुक्रवारीं कूच करून कोसभर पुढें येऊन राहिलों. त्याचे लष्करास व आम्हांस अडीच कोसांची तफावत राहिली. रात्रीं त्याणीं येऊन आमचें गोटाकडे बाण दुरून टाकिले. हजार दोन हजार बार केले. परंतु लष्कर सावध होतें. गडबड न जाली. फौजा तयार जाहल्या. विठ्ठल शिवदेव, आम्ही व रास्ते नदीपार गेलों. ते सरून माघारे गेले. दुसरे दिवशीं शनिवारीं तोफा घेऊन श्रीमंतच त्या टेकडीस आले. परंतु टेकडीचे बाजूस झाडी फार होती त्याचे गोटापासून टेकडीपर्यंत लगती[2] होती. झाडीकडे मुरारराव व गाडदी उभे होतेच. चार घटका पावेतो तोफांचा मार दिला. त्याणें[3] चार पांच हजार गाडदी व पांच सातशें स्वार व पांच तोफा निवड सारी घेऊन झाडीचे तोंडास आला तो पावेतों दिसलें नाही. एकाएकींच मार देऊं लागला तो निस्सीम[4]! परंतु मुराररायां[5] जागा मोडिली नाहीं. आम्ही व विठ्ठल शिवदेव हिरिया[6] होऊं लागल्या. परंतु हत्यार न लागे.[7] आग भारी. (आमची) फौज फार करून पलायनासक्त जाली. परतु सरकारची हुजरात[8] अंतऱ्यानें[9] होती. गलबल होतांच (ती) धांवून आली. श्रीमंत खासा स्वारी मुराररायाचे पाठीवर उभे राहिले. आम्ही व विठ्ठल शिवदेव हिरिऱ्या करीतच होतों. हुजरातीनें नीट चालोन येऊन त्याजवरच घालोन घेतलें. चहूंकडून सारे उठलों. हत्यार लागलें. गाडद्यांत घोडयांचीं तोंडें शिरकतांच गाडदी मारिले. फौज मोडिली. दोन अडीच हजार बदूक घेतली. दोन तीनशें घोडीं घेतलीं. पांच तोफा घेतल्या. परंतु झाडींत उपाय नाहीं. गोळी चालेना. लोक झाडींत शिरले परंतु इलाज न चाले. माघारे फिरले. थोडेंसें मैदान असतें तर खासा (हैदर) देखील धरिला होता! परंतु झाडीनें त्यास वांचविलें. श्रीमंतांचें प्रारब्ध विचित्र. त्याजमुळें येवढें यश आलें. नाहीं तर त्या जागेस तो मोडावा असें

---

१ कारभारी सखारामबापू. २ मध्यें खंड न पडतां, एकसारखी (जमीन). ३ हैदरानें, ही प्रथमार्थी तृतीया. ४ अतिशय. ५ मुरारराव घोरपडे प्रसिद्ध संताजीचा वंशज. ६ आमच्या व विठ्ठल शिवदेव विंचूरकर यांच्या फौजेचे हैदरावर हल्ले होऊं लागले (हिरिऱ्या—आवेशाचे हल्ले). ७ लागू पडलें नाही. ८ खास फौज. ९ जराशी दूर.

नव्हते. परंतु ईश्वरें यश दिलें. बाण व गाडदी[1] व जंजाला[2] व तोफांचा मार अतिवृष्टि त्यानें दिला. परंतु ईश्वरानें खैर केली. चिरंजीव आबास व धोंडोबास गोळयांचे धक्के[3] लागले आहेत. खैर झाली. आठ दिवस बरे होण्यास लागतील. आमच्या तिनी पथकांतील दहा बारा घोडे पडले. जखमी घोडीं माणसें ७५–१०० पर्यंत होतील. मार त्याचा फार जाला. परंतु श्रीमंतांचें प्रारब्ध ! अखेर ही झाली. आणि महद्यशही आले. मारे फौजेंत पाउणशें घोडें पडलें असेल. २५–४० माणूस पडलें. तोफा पांच चांगल्या सांपडल्या. आज आणखी तयार होऊन गेलों. फार अडचणींत राहिला आहे. चहूकडे बातेऱ्या[4] बांधल्या आहेत. तीन तोंडें झाडी आहे. एक तोंड मोकळें आहे. पुढें काय होतें पहावें. आम्हांकडील नारायणराव हुकेरीकराचा घोडा ठार झाला. कृष्णाजी जाधवाचे घोडयास तीन जखमा आहेत. तोही भारीच आहे. बाकी खैर आहेत. पागेची शहागडी घोडी जखमी आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

**अभ्यास** :—या लढाईत पेशव्यांनी कोणती सावधगिरी बाळगली होती ? शत्रुपक्षाकडील कोणत्या वस्तु हस्तगत झाल्या ?

---

# १४३. बादशाह इंग्रजांच्या आश्रयास जातो

**पे० द०, भा० २९ वा, नं० १३८** — २४–४–१७६६

[ सारांश : बद्रीनाथ हा दादासाहेब यांस बादशाह व हाफीजरहमत ह्यांमध्यें झालेल्या मुलाखतीसंबंधी कळवीत आहे. हाफीजरहमतनें बादशाहास स्वतःवर (हाफीजरहमत) व नजीबखानावर विश्वास टाकून दिल्लीस चलण्याचा सल्ला दिला. पण बादशाह तो न ऐकतां इंग्रजांचे आश्रयास अलाहाबाद येथें गेला. ]

---

१ पेशव्यांच्या वेळचे शरीरसंरक्षक शिपाई (गार्ड्स्). २ फिरवितां येण्यासारखी लांब नळीची बंदूक. ३ प्रहार, हबका. ४ तोफा डागण्याच्या जागा.

श्री

श्रीमंत माहाराज राजश्री दादासाहेब स्वामींचे शेवेसी :—

शेवक राजा बद्रीनाथराव कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ १४ माहे जिलकादपावेतो माहाराजांचे कृपाकटाक्षेकडून येथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान तर पातशाहाचे कूच होऊन प्रयागास गेले. फिरंगियाही[1] आनखी समुदाये बंगाल्याहून आनविला आहे. तो आलियावर जे होणे ते होईल. हाफिजरहमत पुत्राचे बोलाविलियावरून पातशाहकडे गेले. मुलाजमत[2] केली. नजीबखानाविशई बहुता प्रकारें अर्जमारूज[3] केली. आनी-काही[4] येकांत च्यार घटका पावेतो पातशाहास सांगितले कीं दिल्लीस चालावे, रोहिले पठाण सर्व चाकरीस हजर होतील. फिरंग्याकडे डौल[5] न द्यावा, आम्हाकडे पाहवे, त्यांचे मसल्हतीवर न जावे, आमचा हाल धरावा, सर्व खर्चवेच व सलतनतचा[6] बंदोबस्त चालऊ, एसे बहुता प्रकारें विनविले. पातशाहानी त्याचा विश्वास न केला. पितापुत्रास रुखसत[7] केले. आपण दरकूच प्रयागाकडे गेले. फिरंग्याही पातशाचे बहुतप्रकारें समाधान केले आहे कीं आम्ही वर्शाकाल प्रयागी करितो तों वर बंगाल्याहून आनखी फौज येत आहे. प्रस्तुत आपण तेथेंच बसावे. नवाब वजिरासहि बोलादणे गेले आहे. त्यांही पुरातन लोकास आस्रा देऊन नवे लोक ठेवितात. समुदाये आलियावर हजूर[8] येईल. प्रस्तुत मालीक मुलक माहराज आहेत जे चित्तावरी धरतील ते सहजांत होईल. स्वामीचा प्रताप थोर आहे. द्रस्टाचा[9] संव्हारच होईल. शेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें कृपा वृद्धि केली पाहिजे हे विज्ञप्ति.

---

१ हा शब्द येथे 'इग्रज' या अर्थी आहे. २ भेट. ३ शिफारस श्रुत केली. ४ आनीकांनी, आणखी इतरांनी. ५ प्रतिष्ठा. बादशाह इंग्रजांकडे गेल्यानें त्यास प्रतिष्ठा मिळणार. ६ राज्य. ७ निरोप दिला. ८ हुजूर (राघोबा) आहेत त्या बाजूस येईल. राघोबा त्या वेळीं काल्पीस होता. ९ दुष्टांचा.

# १४४. पेशवा-राघोबा वाद : तडजोडीच्या अटी

पेशवेदप्तर, भा० १९, नं० ५९ | १७-९-१७६७

पौ छ २५ रबिलव्वल

श्रीहरी

सेवेसी विज्ञापना छ २३ रात्रौ पत्र सेवेसी रवाना केली; तीं पावलींच असतील. त्यांस तेविसाचे तेरिखेस फारच गडबड पडिली होती. मग सखाराम बापूनी मध्यस्त पडोन उभयतांसहि समजून सांगितले. पहिल्या बोलण्यांत श्रीमंत दादासाहेब बोलिले कीं, सातारा, नगर, सिवनेर, धोडीप, वगैरे खेरीज त्रिंबक, मुल्हेर, आशेर व किरकोळ बारा ठिकाणें आम्हांकडे राहूं देणें. वरकड तुम्हास देतों. त्यावर श्रीमंत रावसाहेबानीं परिछिन' नाइकिलें. तेव्हां दादासाहेबहि बिथरले. तेव्हां प्रथम भेटीचे वेलेस करार होता कीं, जर उभयतांचें न बनलें तर दादासाहेबानीं आनंदवलीस जावें आणि रावसाहेबानीं पारनेरयास चालीस कोश या ठिकाणाहून जावें; असा होता. त्याप्रमाणें करावें असें काल ठिकाणी ठरलें. परतु गंगेचा उतार मोडला. तेव्हां रावसाहेब बोलिले कीं, आम्ही चांदवडचे रोखें चालीस कोश जातों. आपण आनंदवलीस जावें. मग ज्याचे कपाली राज्य असेल त्याणें करावें. हेंच काल सकाळा ठरलें होतें. उपरांत' मध्यस्तांहीं उभयतांसहि निक्षूणपणें' सर्व कारभारीहि मिलोन रात्रीं मध्यरात्रपर्यंत जागत बसोन निश्चय केला जे, कलह करूं नये. रावसाहेबांसहि बहुत प्रकारें सांगोन ठरविलें जे, त्रिंबक, धोडप, मुल्हेर, आशेर हीं मात्र ठिकाणें दाहा लक्षाची जागीर दादासाहेबांकडे रहावी. वरकड सर्व देखील हिंदुस्थान गुजराथ सर्व याचा बंदोबस्त श्रीमंत रावसाहेबीं करावा. दादाहीं स्वस्थ राहावें असें रात्रीस निश्चयांत मध्यरात्रीस आले. तेव्हां मुकाम करावा

---

१ मुळींच. २ नंतर. ३ हडसून खडसून.

अस ठरलें. आणि छ २४ तारखेस मुकाम जाहला. याप्रो आज प्रातःकाली कलतांच सेवेसी विनंति लिहिली व राजश्री कृष्णरावजीनी याच प्रमाणें आज प्रातःकालीच ठरलें येसे सांगितलें. कलावें. हा ठराव राजश्री गोविंद सिवराम वगैरे मुत्सद्दी याच्याने ठराव प्रथम नच जाहला. मग सर्वांस बापूनी घेऊन हा प्रकार केला. कलावें. याप्रो जाहले. याजउपर जें होईल तें लिहीन आशेर किला रावसाहेब मागतच आहेत. परंतु तो न दिल्हा तरी तुटावयाचें दिसत नाहीं. विदित व्हावे. ... ... श्रीमंत रावसाहेब निजतात तेथें पलंगाजवल राजश्री गोपालराव गोविंद निजत[1] असतात. कलावे. वगैरे सिलेदार पाटणकर व मोठमोठ पन्नास साठ आसामी असतात. कलावे. हें पत्र आज छ २४ रात्रीचें असे. सेवेसी श्रुत व्हावें हे विज्ञापना. सर्व ठिकाणे रावसाहेबांकडे जाहालीं. येसे जाहल्यावर मग श्रीमंत दादासाहेबाचे स्वारीचें कर्ज असेल ते वारावें असेहि आइकणियांत आहे. आज तिसरे प्रहरीं पका निश्चय व्हावयाचा आहे. तो कलल्यावर लिहीन. हे विज्ञापना.

पुरवणी विज्ञापना

सविस्तर विनंती लिहिली आहे याप्रो जाहल्यावर मग उभयतांनीहि आनंदवल्लीस जावें असें आहे. विदित होये.

---

# १४५. धोडपची लढाई: दादांचा मोड

---

पेशवेदप्तर, भाग १९, नं० ८८ | १५-६-१७६८

[ माधवराव पेशव्याचें रामशास्त्रीस पत्र. माधवराव-राघोबा हें प्रकरण मराठी मनोवृत्तीचा एक नमुना आहे. नात्यामुळें निष्ठुर होता येत नाहीं, पण अशाही स्थितींत बंदोबस्त केला पाहिजे, अशी दुहेरी अडचण. राघोबास राज्याची विभागणी हवी होती ती त्याची मागणी गैर होती.

---

१ अर्थात् पेशव्यांच्या सुरक्षिततेसाठीं.

पण पूर्वीच्या पेशवाईत जसें बाजीराव व चिमाजी, बाळाजी बाजीराव व सदाशिवरावभाऊ यांनीं न फुटतां कारभार केला तसा उभयता माधवराव-राघोबांनीं करावा असें वाटणारा एक पक्ष त्या वेळीं पेशवाईत होता. त्याप्रमाणें स्वतः माधवरावानें कांहीं वर्षें राघोबाशीं सलोखा ठेवून त्याला राज्यकारभारांत वाव दिला. परंतु पुढें हें सहकार्याचें धोरण ठेवणें माधवरावास अशक्य वाटलें. व त्याचेंच पर्यवसान धोपडच्या लढाईंत झालें. ]

वेदशास्त्र संपन्न राजश्री रामशास्त्री स्वामीचे सेवेसी.

विद्यार्थी माधवराव बल्लाल प्रधान नमस्कार विनंती. उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. खासा स्वारी पुण्याहून निघोन गंगातीरास आली, त्यास तीर्थरूप राजश्री दादासाहेब याची गांठ किले धोडप येथें किल्याखाली पडली. छ २४ मोहरमी युद्ध जाले. त्याचा मोड जाला. फौज व बुनगे सर्व लुटले गेले. तीर्थरूप तो फौजा नमूद[1] होताच आगोधर किल्यावर गेले. दुसरे रोजी माचीस[2] मार दिल्हा, तेव्हा सदर्भ[3] खाली आला.[4] उपरांत दुसरे रोजी छ २६ मोहरमी येऊन भेटले. वडीलपण खावंदपणें[5] असावे. आमचे म्हटले सर्व ऐकावे, या प्रो करारांत आले आहे. सरांश तीर्थरूप शाबुतिनिसी[6] भेटले. ज्या ज्या लोकानी लबाड्या केल्या ते फजीत पावले. हे संतोशाचे वृत तुम्हास कलावे म्हणून लिहिले असे. रा। छ २९ मोहरम सु॥ तिसा सितैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे, हे विनंती.

**अभ्यास** :—माधवराव-रघुनाथराव संबंधांचीं सर्व पत्रे वाचून त्या काळीं तुम्हीं असतां तर कोणती बाजू घेतली असती तें कारणासहित लिहा.

---

१ तयार. २ किल्ल्याच्या अर्ध्या वाटेवरील सखल भाग. ३ बेत (लढाईचे). ४ जिरले. ५ मालक म्हणून. ६ सुखरूपपणें.

# थोरल्या माधवरावांचें हस्ताक्षर

श्री

चिरंजीव राजश्री बज्याबा यांसि
प्रति माधवराव बलाळ प्रधान
आसीरवाद उपरी तुम्ही पत्र
पाठविले ते पावले त्यास तुम्ही
मोठे काम करावे हे मनात येथेही
आहे प्रसंगही पुढे आहेतच
वरकड येथे यावयाचा प्रकार
तर तसेच जरूर आढल्यावर

[ उलटून पहा.

[ दुसऱ्या बाजूस

—भा० इ० सं० मंडळ, पुणे यांच्या परवानगीनें

बोलाऊ आधी पाठऊ येथे ठेवी
त नाही चिंता न करणे प्रस्तु
त डेरे मात्र दिल्हे आहे ज्या
पक्षी केदारजीस न पाा' त्या
पक्षी निघून तिकडे जाणे
तुम्हास येणे म्हणून पत्र पाा'
अद्याप संधिक्त गोष्ट आ
हे निवडल्यावर लिहिण्यात
येईल रा छ १७ जिल्हेज हे
आसीरवाद

१ पाठविलें.

# १४६. आतेबहिणीच्या मुलीशीं लग्न सशास्त्र आहे कीं नाहीं ?

पे० द०, भा० ४३, नं० १०    ९–२–१७६९

पौ छ ४ सवाल

श्री

वेदशास्त्रसंपन्न राजश्री शास्त्रीबावा स्वामीचे सेवेसी.

विद्यार्थी मालोजी जाधवराऊ कृतानेक दंडवत विनंती. येथील कुशल ता। माघ शुद्ध तृतीया येथास्थित असे विशेष. पुरुषाकडील तीन, स्त्रीकडील चार हे करावे किंवा न करावे, याचा शास्त्रार्थ कलला पाहिजे यास्तव हे पत्र आपणास लि॥ असे; तरी शास्त्रार्थलेखन केला पाहिजे. पिढया ता॥[1] :

| पुरुषाकडील | स्त्रीकडील |
|---|---|
| १ मूळ पुरुष सुभेदार | १ मूळ पुरुष सुभेदार |
| १ सटवोजी जाधवराव पुत्र ( भाऊ ) | १ कन्या फिरंगुबाई (बहिण) |
| १ जोत्याजी जाधवराव (नातू , वर) | १ त्याची कन्या बुगाबाई (आतेमामे भावंड) |
| | १ त्याची कन्या वधू (आतेबहिणीची मुलगी ) |
| — | — |
| ३ | ४ |

याप्रमाणें असेत. कर्तव्य न कर्तव्यतेचें शास्त्रार्थ येईल त्याप्रो वर्तणूक केली जाईल. विशेष काये लिहिणे, कृपा केली पाहिजे, हे विनंती.

**अभ्यास**:—अशा प्रसंगीं आजचे लोक काय करतील ? निर्णय कोणाकडून घेतां येईल ?

---

१ तपशील.

# १४७. माधवरावाचें जानोजीस पत्र

ऐतिहासिक पत्रव्यवहार, नं० १२० } { श० १६९१ चै० व० १० ता० १-५-१७६९

## कनकापूरच्या तहाचा सारांश

श्री

राजश्री जानोजी भोसले सेनासाहेबसुभा गोसावी यांसी

छ सकलगुणाळंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो॥ माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष तुम्हांकडे श्वेत वऱ्हाड व गोंडवण व चांदें व छत्तीसगड व बस्तर व चुटियानागपूर व कटक व मकसुदाबाद व पटणें व वरघाट मूलतापी व कवाल[1] व घासदाणा[2] गंगथडी[3] सरकारचे महाल कराराप्रमाणें वजा होऊन बाकी घासदाणा व मंडाल्याचे परगणे व भूपाळचे परगणे चालतात ते व दाबिले[4] आहेत ते वगैरे कदीम[5] मुलुक कैलासवासी महाराजांपासून व आलीकडे नवे चालते आजपर्यंत ते तुम्हांकडे करार केले असे; तरी सदर्हू प्रांतांचा अंमल करून सरकारांत निष्ठेनें वर्तोन अनुभवित जाणें. वऱ्हाड प्रांताची सरदेशमुखी पेशजी[6] तुम्हांकडे दिल्ही आहे त्याप्रमाणें करार असे. अंमल करीत जावा. जाणिजे. छ २३ जिल्हेज सुरु सन तिसा सित्तैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंती[7].

---

१ येथपर्यंत महालांची नांवें. २ घोड्यास चंदी मिळावी म्हणून शत्रूचे मुलुखांत घेतलेला कर. हा शेंकडा दोन असे. गोळा करण्याचा हक्क भोसले याजकडे असे. हा प्रथम राजारामकालीं अमात्य वगैरेंनीं सुरू केला. ३ गंगा (गोदावरी) कांठचे महाल. ४ जबरदस्तीनें आपल्या अंमलाखालीं घेतले आहेत ते. ५ पुरातन. ६ पूर्वींच. ७ या तहाच्या सविस्तर अटी ‘ ऐतिहासिक पत्रव्यवहार,’ लेखांक ११७ त आहेत त्या पाहाव्या.

# १४८. हैदरावरच्या स्वारीहून परत



ऐतिहासिक पत्रव्यवहार, नं० १२५

वै० शु० १३ श० १६९२ ७-५-१७७०

श्री

पो छ २३ मोहोरम सबैन वैशाख हस्ते सखोजी सुभानजी जथे खंडोजी गुळदगड

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी पोंष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिणें विशेष. इकडील वर्तमान तर मामा व गोपाळराव यांनीं छावणीस राहावयाचा निश्चय जाहाला. हुजरातची[1] फौज सात आठ हजार पावेतों ठेविली. यानंतर सत्वरच माघारे येत असो. हैदरखानाचा सलुक[2] जाहल्याविना येणें ठीक नाहीं; परंतु राहूनही काम होत नाहीं व शास्त्रीबाबांचीहि आज्ञा न राहण्याविशीं यास्तव रहात नाहीं. चिरंजीव राजश्री नारायणरावाचे हातास गोळीची जखम लागल्याचें वर्तमान पूर्वी लिहिलें त्यावरून कळलेंच असेल. जखम हलकीच आहे. आटा चहूं दिवशीं पाणी घेतील[3]. तुम्हांस कळावें. यानंतर दरमजल येत असो. तीर्थरूप मातुश्री बाईसाहेबांनीं पुण्यास येण्याविशीं पत्रें लिहिलीं आहेत. तुम्हीं येण्याविषयींचें साहित्य[4] पाठविणें आणि लवकर येणें पुण्यास होय तें करणें. रा छ १० मोहरम. बहुत काय लिहिणें हे विनंती.[5]



१ खासा पेशव्यांची. २ सल्लोखा. ३ पाणी घेणें—स्नान करणें (?). ४ तजवीज ५ माधवराव प्रकृति नादुरुस्त म्हणून परत आला.

# १४९. मराठे दिल्ली काबीज करतात



पेशवेदप्तर, भा० २९ वा,
नं० २६६

१७–३–१७७१

[ लेखक रामचंद्र सदाशिव हा विसाजीपंत व महादजी शिंदे यांनी दिल्लीचा बंदोबस्त केला वगैरे कळवीत आहे. येथून 'पुढें सारे मंडल एक्या सूत्रे' वर्तविण्याची मराठ्यांची आकांक्षा आहे ]

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाबुरावजी स्वामीचे सेवेसी

पो रामचंद्र शिवदेव सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता चैत्र शुध १ जाणून स्वकीय लेखन केले पाहिजे विशेष. आपण गेल्यादारभ्य[1] पत्रद्वारा साभाल[2] होत नाही तरी येसे नसावे. घरी पत्र येतच आहेत त्याजबरोबर स्मरण पुरस्कर आमचाहि परामर्श करावा उचित आहे. राजश्री विसाजीपंत दादा यानी व श्रीमंत राजश्री महादजीबावा शिंदे याणी सारे सरदार मतांत मेलऊन येक विचारे दिलीचा बंदोबस्त किल्यासुधा केला म्हणौन कलले. तर ही महत्कृत्यें खावंदाची सेवकाचे हाते घडावी हे फल स्वामी सेवेवर येकनिष्ठ तिकडे आहे. पुढें पातशाही बदोबस्त होऊन पातशाह स्थापून येक्या सूत्रें सारे मंडल वर्तऊन सरकार किफायत करणे ह्या गोष्टी खावंदाचे प्रतापे घडून यश येकनिष्ट सेवकाकडेच आहे. वरचेवर कृपापत्री संतोषवीत जावे. बहुत काये लिहीणे लोभ कीजे हे विनंती.



१ गेल्यापासून. २ सांभाळ, कुशल समाचार, चौकशी.

# १५०. मराठ्यांचें पातशाही राजकारणांत वर्चस्व

पेशवेदप्तर भा० २९ वा, नं० २७० | दाखल ता० १२-६-१७७२

[ ह्या महत्त्वाच्या पत्राचा पहिला एक कागद सांपडलेला नाहीं. बादशाह, सुजाउद्दौला, हाफीजरहमत आणि इतर रोहिले सरदार ह्यांचे वकील मराठ्यांच्या गोटांत तहाचीं बोलणीं करण्यासाठीं आले आहेत. पाथरगडची लूट बादशाह व मराठे ह्यांच्यामध्यें विभागली जावी असें ठरलेलें दिसते. पत्रांत महादजी शिंद्यांच्या कामगिरीचा उल्लेख केला आहे. ]

श्री

पुा सेवेसी विज्ञापना

शाहाकडून[१] नवाब इसामुदाखान व सुजादवल्याकडून येलजखान व अनुपगीर गोसावी आले आहेत. ते त्रिवर्ग पातशाहनी पाठविले आहेत. रा दादाचे[२] व त्याचे वलणे जाहले. त्याजवर तोफाहि देशाकडे रवाना जाहल्या. पातशाहाहि येका दो रोजानी कूच करून येतील. सुजादवले याजकडे महिरजी ताकपीर व बालाराव गोविंद गेले होते तेहि आले. समागमे गोसावी व येलजखान आणिले आहेत. आद्याप निश्चये ठरला नाही. जापतेखानाची[३] मुले माणसे तेथेच आहेत. जापतेखान फाहाडात आहे. हाफीज व दुंदेखान याचे वकिल आहेत त्यां (चें) बोलणे चालणे जाहाले नाही. थोरले काम वजिराकडून निश्चये कामाकाजाचा करार जाहलियावर किरकोली सर्व होऊन येतील. दौ चौ रोजात काय तो मनसबा होईल. परंतु स्नेहाचा प्रकार आहे. रा पाटीलबावा व सुजादवले पगडीभाई[४] जाहले. येथे (प)गडी पाठविली होती. सरदचा[५] सुभा पातशाहानी मोगल ओलीस दिल्हा आहे. पथरगडची

---

१ बादशाहाकडून. २ विसाजी कृष्ण. ३ झबेताखान. ४ मित्र. ५ सरहिंदचा.

वस्ताभाव[1] निघाली ती निमे पातशाहास दिली. बाकी राहिली ती सरकारात निम व निमे सरदाराकडे दिली. हाती[2] व नगदी व जवाहीर हे राहिले आहे. पातशा रुपये मागता(त) त्यासहि दो लाख रुपये द्यावेसारीखे करार जाहला आहे. माहाराजाचे प्रतापेकरून सर्व गोष्टी हा कालपर्यंत चांगल्या आहेत, पुढेही उ(त)मच होतील. वरकड बारीक मोठ वर्तमान वकील शेवेसी लिहीत असतील त्याजवरून श्रुत होईल. रा पाटीलबावास रा राघो मल्हार यास सरकारची पत्रे येवजाविसी ताकीद पाठ(वा)वी व सिष्टाचारी येक पत्र राघो मल्हार यास. ते म्हणतात की आम्ही चाकरी करितो परंतु धण्याचे पत्र कधी येत नाही. याजकरितां आगत्य कृपा करून पत्र पाठवावे. येथील वर्तमानें परभारे कळतच असतील. परंतु आपले आज्ञेखेरीज कोणी नाही. हिंदुस्तानांतहि दबाव[3] माहाराजाचा भारीच आहे. व सरदारा*-चाहि दबाव चांगला आहे. कोणविसीची फिकीर नाही. हुंडया पावलियावर कृपा करून उत्तर पाठवावयास आज्ञा जाहली पाहिजे. वरचेवर ताकीद पाठवावी म्हणजे येवज हातास येईल. तेथील ताकीद आल्याखेरीज येथे कोणी बोलणार नाही. स्वामीचा पायाशिवाय दुसरींकडे चित्त नाहीं. परंतु लढल्याचे डोहीं[4] पडलो आहे. स्वामी सेवा होऊन धण्याचे पाये दृष्टीस पडतील तो सुदीन असे. हुंडीच्या चिठ्या १० दाहा आहेत. हिंदवी तीन व गुजराथी सात येकूण दाहा चिठ्या पावतील. कासीद[5] उद्या घेऊन सेवेसी येतील. त्यास काही इनाम द्यावयाची आज्ञा केली पाहिजे. चोवीसा रोजाचा करार आहे. कराराप्रमाणे पावतील. श्रुत होय हे विज्ञापना.

**अभ्यास** :—‘ उत्तरेकडे मराठ्यांचा दरारा ’ अशीं दर्शविणारीं वाक्यें या पत्रांत कोणतीं आहेत ? कोणत्या सरदाराची स्तुति आहे ? असा प्रसंग मराठी राज्यांत कधीं आला होता काय ?

---

१ चीजवस्त. २ हत्ती. ३ वजन. *शिंदे यांचा. ४ डोही पडणें—संकटांत पडणें. ५ जासूद.

# १५१. शुद्धी सशास्त्र नसल्याची तक्रार

पे० द० भा०, ४३, नं० २५ } { २४–८–१७७२ (?)

पौ छ २७ जमादिलावल श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक महादाजी नारायण सा नमस्कार विज्ञापना......हुजूरचे आज्ञापत्र सादर जाले तेथें आज्ञा कीं, नरहरि रनाळेकर याजला येवनानी पानपथातून धरून नेऊन भ्रष्ट केले. तो दाहाबारा वर्षे त्यांतच राहून येवनमय जाहला असतां त्याजला पैठणास कांहीं ब्राम्हणानी शुध केला. येविसीचा[1] कजिया हुजूर पडला होता तेव्हां वैदिक व पंडित यांची सभा करून शास्त्रता मनास आणितां दाहाबारा वर्षे येवनमय जाला त्याजला शुध्ध करावयाची अर्हता नाहीं, शुध केला हे अयोग्य, याप्रमाणें ठराव होऊन ज्यानी शुध केले त्या ब्राम्हणास बहिष्कार पडला होता. त्यांपैकीं बहुतेकांनी प्रायेश्चित घेऊन शुध जाले. बाकी चालीस पनास आसामी अत्याग्रहे प्रायश्चित न घेत यामुळें बहिष्कृत राहिले होते ते हलीं पैठणी मोगलाकडील कमाविसदाराची हिमायत[2] करून जबरदस्तीने आपली व शुध ब्राम्हणाची पंक्ति करून येकाकार केला आहे म्हणोन हुजूर विदित जाहालें, त्यावरून हे पत्र सादर केले असे. तरी पठणकर ब्राम्हण असल्यास त्याजला ताा अमदानगर येथें पंक्तीस न घ्यावें. याप्रमाणें सर्व ब्राम्हणाचे घरीं ताकीद करणें म्हणोन आज्ञा. त्यास हुजूरचे आज्ञप्रमाणें तालुके मजकुरीं सर्व ब्राम्हणांस पेठणकर ब्राम्हण पंक्तीस न घेणे म्हणोन ताकीद केली. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

**अभ्यास** :—या पत्रकावरून सरकारचा सामाजिक कार्यांत हात, त्याचे बरे वाईट परिणाम, आजची व त्या काळची तुलना यावर एक टांचण करा.

---

१ याविषयीचा कज्जा, वाद. २ आश्रय, आधार.

# १५२. थोरल्या माधवरावाचा मृत्यु

ऐतिहासिक लेखसंग्रह नं० १२२८, भा० ४ था

कार्तिक वद्य १० श०१६९४ ता० २०-११-१७७२

श्री

सेवेशीं[1] आपाजी त्रिंबक. साष्टांग नमस्कार विज्ञापना. श्रीमंताची स्मृति अमरणांत होती. दोन घटकानें पुढें[2] प्राण जातेसमयीं सर्व मंडळी व वैदिक मोठे मोठे ब्राह्मण बोलावून आणून नमस्कार केला. "महायात्रेस आह्मी जातों. आमचे स्वारीची तयारी करा." असें सांगोन 'गजानन' 'गजानन' असें ह्मणतांच नेत्रद्वारें प्राण गेला! त्याचप्रमाणें श्रीमंत सौभाग्यवती मातुश्री बाईसाहेबानीं शर्त[3] केली. जवाहीर जें होतें तें आपलें हातानें वांटून धर्मशिलेवर उभें राहून श्रीमंत दादासाहेबांस बोलावून आणून धाकटे श्रीमंतांस त्यांच्या हातीं दिलें. "सर्वांचें वडीलपणें यथास्थित चालवावें" ह्मणोन सांगोन (सती) गेली. (बाईसाहेबानीं) मोहरांच्या पिशव्या दोन जवळ ठेवून घेऊन जो नमस्कार करावयास आला त्यास कनिष्ठास देखील एक मोहोर दिली. श्रीमंतांनीं आपल्या खाशा गाई होत्या त्यांस ते दिवशीं आपले हातें ब्राह्मणास दान दिल्या. धर्माविशीं श्रीमंतांनीं कांहीं मनाई केली नाहीं. मोक्षधेनूचा संकल्प आपण स्वमुखें करून दानें दिलीं. वैद्यास प्रार्थना अगोदरच असे कीं 'अतिसार[4] मरणसमयीं व्हावा हें उत्तम. कफ होऊ न द्यावा. नाहीं तर स्मरण गजाननाचें व्हावयाचें नाहीं' असे अगोदर दोन चार दिवस बोलत असत. प्राण जाऊं लागला ते समयीं 'अन्न घालूं नका. दूध अथवा गंगोदक मिळोन घालणें.' अशी ताकीद. त्याचप्रमाणें ते पुण्यवंत ह्मणून अतिसार झाला. कफ झाला नाहीं. स्मृतींत 'गजानन' 'गजानन' ह्मणत मोठ्या योग्याप्रमाणें नेत्रद्वारें प्राण गेला! बाईनीं समागमे यावें अशी पहिलीच आज्ञा.

---

१ पत्र पांडुरंगरावास. हें माधवरावाच्या मृत्यूनंतर दोन दिवसांनीं लिहिलें आहे. २ प्राण जाण्यापूर्वीं दोन घटका. ३ कमाल. ४ हगवणीचा रोग.

त्याप्रमाणें बाईनीं शर्त केली. (नारायणरावसाहेब) हा विधि उरकल्यानंतर साताऱ्यास जाऊन आल्यानंतर पुढील कर्तव्य काय योजतात पहावें. श्रीमंत बाबास हिऱ्याची अंगठी आंत गणपतीची मुहूर्त[1] असलेली (बाईसाहेबानीं) दिली. अंगठी चांगली दिली. भाऊंस पाचेची दिली तीही चांगली आहे. चरकडास मोहरा दोन चार पांच अशा दिल्या. हे विज्ञापना.

---

## १५३. वाघ गेला! कोल्हीं मात्र राहिलीं!!

ऐतिहासिक लेखसंग्रह,
भाग ४ था, नं० १२४३

१३-१-१७७३

[गंगाधर बापूजी फडणीस यांचें केसोपंत व रामचंद्रपंत यांस पत्र पुण्याहून पौष वद्य पंचमीचें.]

"इकडील वर्तमान तर आम्हीं हिशेब लिहून तयार केले आहेत परंतु पुसत कोणीच नाहीं! श्रीमंत सौभाग्यवती पार्वतीबाईचा विधि[2] (व्हावयाचा, त्याविषयीं बोलणें) तिजपासून कांहींच नाहीं! परंतु (श्रीमंतांस) वस्त्रें झालीं. साताऱ्यास त्या दिवसापासून मुख्य कारभारी व धणी[3] जेष्ठ इतक्यांचे मनांत होतें जे, 'विधि उरकावा.' परंतु कनिष्ठ यांचे मनांत नव्हतें. त्याचे पर्याय बहुत आहेत. तेव्हां पुण्यांत येऊन वचनें काढून सिंहस्थपावेतों राहविलें. त्यास (पार्वतीबाईस) विचारून करावें. असा मनसबा होता, परंतु ती ह्मणणार जे 'पर्वतवासी (तोतया) आणून फडशा करून टाकणें. मग विधि उरकून टाकावा.' परंतु तें झालेंच नाहीं. सकारनामकाचे[4] मनांत विधि उरकून मग

---

१ मूर्ती. २ सोंवळी करण्याचा विधि. ३ राघोबा. एकूण पार्वतीबाईस सोंवळी करण्याचा आग्रह दादासाहेब व सखारामबापू यांचा! ४ सखारामबापूचे मनांत वळजबरीनें हा वपनविधि उरकून घ्यावयाचा होता.

ब्राह्मणांस सांगावें असें आहे. कारभारी यांचें व फडणीसांचें विसाजी केशव लेले यांजमुळें वांकडें आलें आहे. फडणीसांचें घर कारभारसंबंधें राहिलें. तेरीख[1] मात्र घालावी, (इतकें करितात.) श्रीमंतांचा प्रकार तर—बालकृष्णच आहे! परंतु केवळ कारभारी यांचे स्वाधीन नाहीं. आमचे येथील तर कांहींच पुसूंच नका! बारीक सारीक गोष्टींतसुद्धां कारभारी यांस पुसावें लागते! असो. श्रीमंत[2] रावसाहेब गेले याजमुळें सर्वच फसल्यासारखें झालें आहे. वाघ गेला! सारीं कोल्हीं राहिली आहेत! ईश्वर सत्ताप्रमाण!"

---

# १५४. नारायणरावाचा खून

ऐतिहासिक लेखसंग्रह, भाग ४ था, नं० १२५७ — २ सप्टेंबर १७७३

[पत्र शिवाजी बावाजीचें पुण्याहून वामनरावास मिरजेस. हें पेशव्यांचा खून झाला त्याच्या तिसरे दिवशीं लिहिलेलें आहे. खून ता. ३०–८–१७७३ रोजीं झाला.]

श्री

सेवेशीं साष्टांग नमस्कार विनंती. तागायत गुरुवार दोनप्रहर वर्तमान तर काल लेखकांच्या[3] माणसाबरोबर त्वरेनें येण्याविषयींचा प्रकार दर्शविला होता. तेसमयींचा प्रकार तसाच होता. व लेखकांचे विचाराप्रमाणें पत्र पाठविलें होतें. अलीकडील अर्थ—गाडद्यांचें प्राबल्य बहुतच होतें कीं, (आम्हीं) "राज्याचा खावंद मारिला. होता तो मारिला. आतां निम्में राज्य वांटून देणें" असें

---

१ कारभार सखाराम बापूचा व कागदावर तारीख फडणीसांनीं घालावयाची. २ माधवराव. ३ नाना फडणीस व मोरोबा फडणीस यांच्या.

बहुतच पाय पसरून बोलत होते. आंत तमाम बंदोबस्त सुमेरसिंग व महमद इसफ व खरगसिंग चौकीदार यांचा. परवानगी रसानगी[1] त्याची. मराठे माणूस आंत अगदीं नव्हतें. शहर लुटितात अशी धास्त बसून कोणास कोणी न पुसे. अशी अवस्था होती. गाड्यांस हा मनसबा सांगितला ते समयींचा करार—किल्ल्यांपैकीं पुरंधर व नगर व साष्टी हे तीन किल्ले व पांच लाख रुपये रोख द्यावे. येणेंप्रमाणें करार असतां आडमुद्दे राज्याचे वगैरे गाड्यांनीं मनस्वी घातले. "नाहीं तरी त्यांची गत ती यांची! अल्लीबहादर राज्यास खावंद करूं." असें चित्तास येईल तसें बोलत. गांवांत जितका मुसलमान होता तितक्यांनीं बदुका घेऊन वाड्यांत जथ[2] पाडिला. तोफखान्यांतून धाकट्या तोफा आणून बुरजावर ठेवाव्या असा मनसबा विलक्षण करून बसले. तेव्हां भकारनाम[3] प्रतिनिधि यांणीं सांगितलें कीं, "राज्य अथवा किल्ले कोणाचे? वांटून देणार कोण? राज्याचे चाकर आम्हीं. जतन करावें (हें काम आमचें.) द्यावयाचा अखत्यार आह्मांवर नाहीं. चार रुपये अधिक आगळे[4] मागितल्यास चिंता नाहीं. देऊं. परंतु किल्ले अथवा राज्य देणार आम्हीं कोण?" तेव्हां रदबदली[5] पडून पांच लक्ष रुपये द्यावेसा करार होता ते व किल्ल्याचे तीन लक्ष, एकूण आठ लक्ष रुपये द्यावे येणेंप्रमाणें ठराव होऊन दोन तीनशें गाडदी बाहेर निघोन दरवाजे मोकळे झाले. मराठे आणून आंत दोन तीनशें हत्यारबंद जमा झालें. आतां विचारें विचारें गाडदी बाहेर निघतील. परवानगी रसानगी दरवाजास गाड्यांची नाहीं. आंत लोक जातात येतात असें झाल्यामुळें जरा स्वस्थ झालें आहे. कर्म झाल्यावर दुसरे दिवशीं मकारनामक[6] लेखक यास बोलावून नेऊन (श्रीमंतांनीं) सांगितलें कीं नकारनामकास घेऊन येणें. तेव्हां ते येऊन त्यांस (आंत) घेऊन गेले. उभयतांस सांगितलें कीं, तुह्मीं फडणीसीचें कामकाज करीत जाणें. तेव्हां उत्तम म्हणून (त्यांनीं) बाजीपंत व परचुरे यांस सांगितलें कीं, लिहिण्याचे जाबसाल[7] आज्ञा होईल त्याप्रमाणें करीत जाणें ह्मणून सांगोन घरास आले. उभयतां नित्य जातात. (श्रीमंत) सांगतात त्याप्रमाणें कागदपत्र समजा-

---

१ चिठ्ठीनें दिलेली परवानगी. २ तळ दिला. ३ भवानराव. ४ जास्त, वरती. ५ भीड. ६ मोरोबा फडणीस; नकारनामक—नाना फडणीस. ७ संभाषण, तोंडी.

वितात. रोजमरा[1] गाड्यांस वगैरे देवितात त्याप्रमाणें देतात. चिकारनामक[2] व भिडे उभयता कामकाजाच्या गडबडींत आहेत. मकारनामक प्रा। व सकारनामक मच्छाहारी[3] वकारनामक[4] बरवे व सकारनामक[5] परभू सारा दिवस (श्रीमंतां) जवळ असतात. चौघांपैकीं थोरले दोघे[6] या राजकारभारांत पुर्ते होते असें म्हणतात. त्यासारखें दिसून आलें. (श्रीमंतांनीं) तमाम शागीर्द लहान मोठ्यांस तमाम बोलावूं पाठविलें. चिरंजीव[7] आणविले. बारामतीकर गृहस्थांस तीन चार पत्रें गेलीं ते येणार. काम कारभार त्यांच्या विचारें करावा असें मानस दिसतें. मुख्य कारभारी समाधान नाहीं ह्मणून या मंत्रापूर्वींच[8] चार दिवस दरबारास येतच नव्हते. हें झालें, गाड्यांची गोळागोळी होऊं लागली, तेव्हां कोतवाल चावडीजवळ बापूनीं सारे मुत्सद्दी जमा केले होते. राउतांचा जथ पाडिला तों आंतून चिठ्ठी आली कीं, "गुंता उरकला. आतां बाहेर बसून खटपट कायनिमित्य करितां? आंत येणें." तेव्हां (सखारामबापू) वाड्यांत गेले व त्यांचे कानीं लागून सांगितलें कीं, "गोष्ट फटफळ[9] झाली. फडणीस लेखणीचे धणी आहेत त्यांस बलावून सांगावें. लिहिण्याचें कामकाज त्याणीं केल्याखेरीज परिणाम नाहीं. आह्मांस समाधान नाहीं घरास जातों." ह्मणून सांगून गेले त्यापासून दरबारास येत नाहींत. चिकारनामक त्यांजकडे जाऊन खलबत करून येत असतात. (सखारामबापू) काल दोनप्रहरीं पळून गेले. पर्वतीजवळ माणसास आढळले. वायकामुळें घरांतच आहेत. चार कोस गेला. मागती काय विचार केला न कळे, फिरोन रात्रौ घरास आला. कारभार करावा असें चिकारनामक नित्य त्यांसीं बोलतात. त्रिकारनामकही[10] नित्य वाड्यांत जात असतात. फडके[11] याजवर फारच रोष याजकरितां त्या गडबडंत ते निघोन गेले. मोरेश्वरपावेतों गेलेले आढळले. घरीं चौकी बसली आहे. त्या गडबडींत इच्छाराम-

---

१ मुशाहिरा, पगार. २ चिंतो विठ्ठल रायरीकर व हरिपंत भिडे. ३ मत्स्याहारी, शेणवी, सदाशिव रामचंद्र. प्रसिद्ध रामचंद्र बाबाचा मुलगा. ४ बाजीराव गोविंद बर्वे. ५ सखाराम हरि. ६ हे कोण? ७ दत्तक पुत्र अमृतराव. माजी पेशव्यांच्या कारकीर्दीत यास पुणें मना होतें. त्यामुळें ते वडगांवांस राहात. ८ खून करण्याच्या मसलतीपूर्वीं. ९ अशुभ. १० त्रिंबकराव मामा. ११ हरिपंत फडके.

पंतास[1] तीन जखमा लागल्या. दुसरे दिवशीं मृत्यु पावला. नारायण सदरेस[2] बसल्यावर मारून टाकिला. त्याप्रमाणेंच फडके यांस करावें ह्मणून बोलिले. आणखी ब्राह्मण चार पांच व चाफाजी खिजमतगार ठार झाला. त्या गडबडेंत (धाकटे श्रीमंत) थोरल्यांजवळ जाऊन पोहचले होते. "दादा-साहेब! वांचवावें, किल्ल्यावर घालावें, नाचण्यांची भाकर द्यावी," असें ह्मणून गळां मिठी घातली तेव्हां (त्यांणीं) लोटून दिला. तुळाजी पवार भेदला होता त्याणीं पायांस धरून ओढिला. सुमेरसिंगानें वार टाकिला. पांच सहा वारांनीं पुरा झाला. तेथेंच चाफाजी ठार झाला. असें होतांच (दादासाहेब) सदरेस जाऊन बसले. तमाम चोपदारांस वगैरे यांस बोलवूं पाठवून बदोबस्त करूं लागले. सुतक नाहीं. नित्य नमस्कार सूर्यास घालितात. "वैरियाचें सुतक कशास?" ह्मणतात! गोवधदेखील वाड्यांत झाला. दोघी कुणबिणी मेल्या. बालहत्या, ब्राह्मणहत्या, गोहत्या, स्त्रीहत्या सारेंच झालें!!! गंगाबाई आनंदीबाईनें कोंडोन खोलींत ठेविली, दहनास तिकडे गेल्यावर विधि[3] उरक-विला. रात्रीस करूं नये पण ते समयींच गुंता उरकविला! हें राजकारण फार दिवस घांटत होतें त्यांत मोठे मोठे होते असे आतां उद्गार निघतात. ज्यांनीं राजकारणें केलीं होतीं त्यांचें मानस (पेशव्यांस) कैद करावें असें होतें. परंतु करावयास गेले एक आणि झालें एक! ईश्वराच्या चित्तास आलें तसें झालें! आतां त्राता कोणी नाहींसा झाला. आपण येसाजीबरोबर पत्रें पाठविलीं तीं पावलीं. मजकूर कळला. पढरपुराकडे जावयाचा प्रकार लिहिला, त्यास इकडून पत्रें वरचेवर गेलींच आहेत. त्वरेनें येण्याविशीं (आपणास) पत्रें गेलीं होतीं, त्यास (आतां) गाड्यांचा उलगडा होतच आहे, आतां लेखकाचे व आमचे मतें तूर्त न यावें येणेंप्रमाणें ठरोन त्यांचें पत्र व आमचें पत्र लिहिलें आहे. थोडक्या फौजेनिशीं येथें येणें हेंही ठीक नाहीं. जेथें पत्र पावेल तेथें मुक्काम करोन राहावें. फौज जमा करावी. कोसीं अदकोसीं कूच तासगांवाकडे केल्यास चिंता नाहीं. मागें मात्र जाऊं नये. हे विज्ञापना.

---

१ ढेरे. २ मुख्य कचेरी. ३ वपनविधि. पण ही बातमी पुढें खोटी ठरली.

**अभ्यास :**—१ नारायणरावाच्या खुनानंतर पुण्यांतलि परिस्थिति किती बिकट होती याचें वर्णन करा. २ नारायणरावाच्या खुनाबरोबर आणखी कोणत्या प्रकारचे खून करण्यांत आले ? ३ मुत्सद्यांचीं नांवें संपूर्ण न लिहितां नकारनामक, मकारनामक अशीं कां लिहिलीं असावींत ?

---

# १५५. साऱ्यांचें दैव फिरलें ! काय करावें ?

ऐतिहासिक लेखसंग्रह, भाग ५ वा, नं० १२६१ — सप्टेंबर १७७३

श्री

सेवेशीं[1] विज्ञापना. आपण पत्रें पाठविलीं तीं पावोन लिहिला मजकूर कळला व जिवाजी माळी याजबरोबर चिठी पाठविली ती काल संध्याकाळीं पावोन मजकूर कळला. येथून जाहले वर्तमान व अलीकडील वरचेवर लिहितच आहों. सारांश आपली फौज जमा सत्वर व्हावी. तरतूद आधीं करावी. इकडील प्रकार 'सकार[2] नामक' यास कारभार करावा ( असें श्रीमंत) ह्मणतात. नित्य वाड्यांत बलावितात. कारभार करीत नाहीं. असें [ सखाराम बापू ] तोंडानें ह्मणतात; परंतु आंतून राजकारण आहे जे, महिना दोन महिने जाऊन येऊन कारभार करावा. कां कीं, लौकिकांत वाईट होईल कीं, "त्यांची गत तशी झाली आणि कारभारी कारभार यांजवळ करूं लागले, तेव्हां राजकारणांत होते;" असें होईल. यासाठीं ह्मणतात जे 'बोलावाल तेव्हां येऊं. पुसाल तें सांगो. चिंतो विठ्ठल शहाणे आहेत. त्याणींच कारभार करावा' असें ह्मणतात. चिंतो विठ्ठल जालें वर्तमान यांचे घरास जाऊन सांगतात (व सखाराम बापू सांगतील) त्याप्रमाणें कारभार करितात. आबाजी

---

१ शिवाजी बावाजीचें वामनरावास पत्र. २ सखारामबापू.

महादेव ही काल आले. शिष्ये सवाशें जमा झाले आहेत. वरचेवरी येतच आहेत. मामलती विल्हेस लावावयास सांगितल्या.' चिंतो विठ्ठल याणीं व नाना फडणीस याणीं एकविचारें करून मामलतीचा कारभार करावा. याचें कारण चिकारनामक माहीत झाल्यावर नानास आंत घेणार नाहीं असें दिसतें. नानानीं होय न ह्मणावें तर अबरू राहिली पाहिजे यास्तव बोलावूं पाठवितात तेव्हां जातात. सांगतात तें मान्य करितात ! राजश्री मोरोबा दादास नित्य एक वेळां बोलावितात. त्यांशींही (श्रीमंत) खलबत करितात. (त्यांजवर) ममता बरीच दिसत्ये पण विश्वास पुरत नाहीं ! आह्मांविशीं दादाच थोरल्यांजवळ[2] बोलिले. त्याचें उत्तर झालें कीं फौज सारी जमा करावी. आहेत तेथेंच राहावें. आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करावी असें ह्मणतात. दादा वरचेवरी निखालसतेचा प्रकार करावयाच्या योजनेंत आहेत. आमची कारस्थानी चालेल तेथवर करीत आहों असें ह्मणतात. जितके मातबर आहेत तितक्यांचे घराचे आसपास दोन तीन प्रमाणें जासूद ठेविले आहेत. बातम्या वरचेवरी ठेवितात. कोण कोणाचे घरास जातो अशी बातमी ठेवितात. याजकरितां दादानीं सांगितलें कीं, घरास येत न जाणें. सांगून पाठवूं. तुह्मीं वर्तमान सांगून पाठविणें अथवा चिठ्ठी पाठवीत जाणें. असें सांगितलें आहे. नानाच्या वाड्यांत जात असतों. उभयतांच्या[3] विचारें येईल तसें करितों. सकारनामकाच्या घरास जात असतों. मामाच्या घरास जातों. चिंतो विठ्ठल याच्या घरास जाण्याचा राबता[4] अतःपर घालितों ! साऱ्यांचेंच दैव फिरलें काय करावें ! रास्ते यांजकडे कुबारी व दुसरा किल्ला आहे तो व बागलकोट सोडून देणें असें ह्मणतात. आंतून राजकारण होत आहे. रास्ते यांजवर आमच्या पेक्षां कटाक्ष अधिक आहे. (श्रीमंत) कोणास काय ह्मणतील, कोणाचें काय घेतील, हा भरंवसा नाहीं.

---

१ वसुली-प्रदेशांची व्यवस्था लावावयास सांगितली. २ दादासाहेबांजवळ. ३ नाना व मोरोबा यांच्या. ४ उपक्रम.

# १५६. इंग्रजांचें राघोबास पत्र



इ०इं० इंडिया कंपनीचा पेशवेदरबारशीं फारशी पत्रव्यवहार, पत्रांक† १७

बंदर चिनापट्टण १७-१९-१७७३ नंतर

## नारायणरावाचा मृत्यु

[ हें पत्र म्हणजे मुत्सद्देगिरीच्या लेखनाचा अर्क आहे. ]

श्री

मे. रावसाहेब पंडित प्रधान यांचे सेवेसी विशेष. आपलें स्वतःच्या मोहरे-निशीं कृपापत्र ता. १७ ऑक्टोबर सन १७७३ इ. मुताबिक* छ २९ माहे रजब सन ११८६ हिजरी रोजीं लिहिलेलें माणसाहातीं पोहोचले. त्यांत नारायण राव मृत्यु पावल्याबद्दल लिहिलेलें होते. त्यामुळें मला इतकें वाईट वाटलें कीं त्याच माणसाबरोबर आपला गादीवर बसण्याचा इरादा असल्याबद्दल मजकुराचे पत्र आले नसतें तर तें दुःख मला आवरलें नसतें. ही शुभ वार्ता अमलांत आल्याबद्दल समजण्याची रात्रंदिवस वाट पहात आहे. शक्य तितके लवकर आपणही शुभेच्छा अमलांत आणून मला खबर द्यावी. म्हणजे समाधान होईल. सुखाचा काल असो.



†मराठी भाषांतर-संशोधक : सरदार गं. ना. मुजुमदार. *जुळणारा (Corresponding).

# १५७. बारभाईंचें कारस्थान

पेशवेदप्तर, भा० ५ वा, नं० १२ | ८-२-१७७४

## गरोदर गंगाबाईची पुरंधरास रवानगी

सखारामपंत बापू स्वामीचे शेवेसी.

पोष्ये त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनती उपरी. येथील कुशल तागाईत छ २६ जिलकाद पावेतो मुा गंगातीर नांदेडासंनिध असो विशेष. छ १७ जिलकादची पत्रे तुम्ही पाठविली तीं छ २५ माहे मजकुरी संध्याकाली मुा मजकुरी पावली. पत्री लिा कीं वांकडे घडोन पुढें कैलासवासी नानाचे वंशास ठिकाण नाहीसें भावी दिसो लागलें; त्यामुळे श्रीकृपेने राज्याचाहि बंदोबस्त व्हावा आणि चांगलेंहि दिसावे, याकरिता आम्ही व राजश्री नाना फडणीस व राजश्री मोरोबा दादा फडणीस व हरीपंत फडके येकत्र होऊन उभयता मातुश्री थोरले बाईचे अनुमते युक्तीने काढून किले पुरंधरास घेऊन गेलो. पुण्यातील बंदोबस्तास मोरोबा दादा ठेविले. वरकड कितेक साधनाचे प्रकार पूर्वी सागोन पाठविलेच आहेत, त्यांत मुख्यत्वेकरून मातबर साधन यवनाचे,* त्याविसीची चिंता न करावी येसे निरोपात सागून पाठविलेच होते. रा सिंदे होल्कर याजविसीहि साधन केलें. राजश्री फतेसिंग गायकवाड आपलाच आहे. तुम्हाजवल सर्व मंडली राजश्री आनदराव रास्ते सुधा आहे ती आपलीच आहे. राजश्री साबाजी भोसल्यासी बोलण्याचा सिलसिला[१] होताच. त्यांचीहि अनकूलता तुम्ही करून घेतलीच आहे. फौजेचा जथ तुम्हाजवल आहे. पैक्याची काळजी न करणें. जो पैका लागेल त्याची पुरवणी होईल. आम्ही चांगले लौकिकांत दिसावें, चांगले व्हावें याकरितां समजोन केलें. तुमचा सर्व प्रकारे भरवसा, यास्तव पुढील

---

* निजाम. १ संबंध.

कर्तव्य ते सुचेल त्या प्रकारे आम्हीहि लिहून पाठऊ आणि तुम्हीहि लिहून पाठऊन करणे तसे करावे. त्यास "श्रीमंताचे जालें ते जालें, परंतु पुढें वंशास उचीत, सर्वाचे संरक्षण होऊन राज्यकारभार मार्गे करून चालविते', तर इतके करणेहि प्रयोज्यन नवते. परंतु उचीत प्रकारच दिसेनासा जाणोन करणेहि सर्वास प्राप्त. इत्यादिक प्रकारें तुम्ही व राजश्री नाना फडणिसानी लिा ते कलले. प्राप्त जाल्या प्रकार केलाच पाहिजे.... ...

---

## १५८. दादांचें निजामाशीं सख्य

पेशवेदप्तर, भा० ५ वा, नं० ३२ — फेब्रुवारी १७७४

श्री

नकल

सिका

तहनामा श्रीमंत राजश्री रघुनाथ बाजीराव प्रधान यांचा व नवाब निजामुदौले बाहादर आसफज्याहा यांचा जे. तर्फैनची[२] दोस्ती जफरूदौले बाहादर यांचे मारफतीनें[३] ठरली. नवाब आसफज्याहानी, हालीचा बखेडा* सखाराम भगवंत व बालाजी जनार्दन याणी मुलाचे नाव करून केला आहे, त्यांचा पक्ष सोडावा. जे सरकारचे दुशमन लाहानमोठे ते नवाबानी आपले मोजून[४] त्यांचे पारपत्यास सर्व प्रकारे अनकूल असावे. मागील जाहाला प्रकार ते दोहोकडेहि मनात नसावे. आणि आता हा तह दोस्तीचा ठरला तो सेवट-

---

१ राघोबा हें सर्व करतां तर आम्हांस राजकारण करण्याचें कारण नव्हतें असा भावार्थ. २ तर्फ—बाजू, तर्फैन—हें अनेकवचन, दोन्ही बाजूंची. ३ मार्फतीनें, ओळखीनें. *अर्थात् बारभाईंचें कारस्थान. ४ समजून.

पर्यंत निभवावा. या कामासंमंधे नवाब आसफज्याहा यास नफा येणेप्रमाणं :—

सखाराम भगवंत व बालाजी जनार्दन प्रथम कलम

याणी मुलाचे लिहिले आहे त्याखेरीज अणी

[अपूर्ण]

**अभ्यास** :—हीं पत्रें वाचून राघोबाबद्दल काय मत बनतें? परकीयांनीं राघोबास कां मदत केली? बारभाईंस कां केली नाहीं?

---

# १५९. सवाई माधवरावाचा जन्म

**पेशवेदप्तर, भा० ५ वा, नं० ४५** {२१–४–१७७४

श्री

मेवेसी धोंडो माहादेव मां नमस्कार विनंती. ताा छ ९ सफर गुरुवार दोन प्रहर पावेतो वर्तमान यथास्थित आसे. यानंतर पुरंधरचे पत्र येच क्षणी आले. श्रीमंत मातुश्री गंगाबाई यास आधिक (वैशाख) शुाा ७ इंदुवारी[1] प्रसूत जाली; पुत्ररत्न जाले, आपणास कलावे. राजश्री बाजीपंत आंणा यांनी पत्र लिहिले. त्याचे उतर आले तेच पा[2] आहे, त्यावरून कळेल हे विनंती.

राजश्री बाजीपंत आंणास मां नमस्कार. आपलें पत्राचे उतर पुरंधराहून आलें ते पा आहे. पावेल हे विनंती.

**अभ्यास** :—हा जन्माची बातमी ऐकून तत्कालीन महाराष्ट्रीयांच्या मनांत कोणते विचार आले असतील? रघुनाथरावास व बारभाईंस काय वाटलें असेल?

---

१ सोमवार १८–४–१७७४. २ पाठवीत.

# १६०. बालपेशव्यास पेशवाईचीं वस्त्रें

पेशवे दप्तर भा० ५ वा. नं० ४९ | १४-५-१७७४

श्री

वेदशास्त्रसंपन्न राजश्री शास्त्रीबावा[1] स्वामीचे शेवेसी:—

विद्यार्थी सखाराम[2] भगवंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। वैशाख शु॥ चतुर्थीपर्यंत यथास्थित असे विशेष. आम्ही पुरंदरीहून निघोन मातारियास आलो. श्रीमंत माहाराज राजश्रींची भेटी जाहली. उदईक पंचमीस रविवारी पेशवाईची वस्त्रे श्रीमंतास होतील. त्याउपरी येथून पुरंदरी जाऊं. त्यास आपण निघोन पुरंदरी यावे. येथून आपणाकडे माहादाजी रामचंद्र पाठविले आहेत हे सांगतील ते ध्यानांत आणून आपण पुरंदरास यावे. अगत्य[3] यावे. बहुत काय लिहिणे. आसो दीजे हे विनंति.

---

१ रामशास्त्री. २ सखाराम बापू बोकील. ३ येथून अक्षर पत्रलेखकाचे.

# १६१. महादजीचा बारभाईंस पाठिंबा

महादजी शिंदे यांचीं कागदपत्रें,† नं० ३ | २७ एप्रिल १७७४

पैवस्ती चंद्र ८ रविलावल आर्वा.

श्री

श्रीमंत मातुश्री बाईसाहेबाचे* सेवेसीं :—

विनंती सेवक महादजी शिंदे कृतानेक विज्ञापना तागाईत चंद्र १५ सफर मुक्काम उज्जेन जाणोन वर्तमान यथास्थित असे. विशेष :—आपण दोन पत्रें चंद्र १७ व चंद्र २७ मोहरमचीं पाठविलीं, तीं चंद्र ७ सफरीं पावलीं. तीर्थस्वरूप[1] यांनी त्रिंबक[2] विश्वनाथ यास दगा करून धरलें. उपरांत सरकारची फौज व भोसले व मोगल कूच करून तीर्थस्वरूपांवर गेले. तीर्थस्वरूप पळत पळत खानदेशांतून जाऊन नर्मदा पार होतील. सरकारची फौज व भोसले व मोंगल पाठलागावर आहेतच. तुम्ही व होळकर एक होऊन, नर्मदा पार जाहाल्यास हस्तगत करावे. न बनल्यास रुख[3] चुकवून इकडे सत्वर येणें म्हणोन आज्ञा. ऐसियास, मामांनीं उतावळी करावयाची नव्हती. असो. होणारासारखी मामांस बुद्धि जाहली. याउपरी आळा घालीं असा सरदार पाठलागावर फौज आहे त्यांत असोन, मोंगल व भोसले एक विचारे मजबुतीने वर्तेत, असें करावें. येथील वोढीचा[4] प्रकार किती लिहावा? परंतु श्रीमंत खानदेशांत आले, स्वारी पुढें येईल, याजकरितां चंद्र १२ रोजीं डेरे दाखल जाहले[5]. असो. श्रीमंत नर्मदा उतरणार नाहींत. वरकड सविस्तर अर्थ राजश्री सखारामपंत बापू व राजश्री बाळाजीपंत नाना यांचे पत्रीं लिहिले आहे. विनंती करतील. सेवसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

†संपादक रियासतकार सरदेसाई, प्रथम प्रकाशन डिसेंबर १९३७.
*गंगाबाई, नारायणरावाची बायको. १ दादासाहेब. २ त्र्यंबकराव मामा पेठे. ३ रोख. ४ त्रास, कष्ट. ५ त्यांस तोंड देण्यास आम्ही निघतों. राघोबास नर्मदेअलीकडे येऊं देत नाहीं असा भावार्थ.

# १६२. पुरंदरचा तह

ऐतिहासिक लेखसंग्रह, भाग ५ वा, पत्र नं० १८२२

पैवस्ती ८-३-१७७६

श्री

विज्ञापना.' पत्रीं आज्ञा कीं 'इंग्रजाकडील तहाचा ठराव कसा झाला तो लिहून पाठवावा.' त्यास परवां सिद्धांत ठरोन यादी जाहल्या. पहिल्यापासून वकील आल्यावर त्यांनीं आडमुद्दे फारच घातले होते. "साष्टी घेतलीच आहे. वसई द्यावी. श्रीमंतां[२] समागमे सामान आपलें आहे त्यास ऐवज चाळीस पन्नास लक्ष रुपये लागले आहेत ते द्यावे, सुरत अठ्ठाविसीचे[३] वगैरे महाल राजश्री फत्तेसिंगराव गायकवाड याजपासून महाल त्याच्या बचावासाठीं त्यांनीं आह्मास दिले आहेत त्यांचा गुंता[४] नाहीं." असा फारच फैलाव[५] होता. चार वेळां रुसवेही मधीं जाहले. निरोपही मागत होते.[६] कारभारी याणीं निरोप दिला. जितकें त्यानीं ओढावयाचें तितकें त्यानीं वोढिलें. याणीं थांग लागों दिला नाहीं. आणखी वोढून त्यास कांहीं न देतां तह करावा असें मानस कारभारी यांचें होतें. परंतु तहाचें बोलणें सुरू होऊन दिवस फार झाले, फौजेस पोटास नाहीं, फौज फार हैराण, दिवस अखेरीचे येत चालिले, याजकरितां कांहीं इंग्रजांचें ऐकावें याजकरितां इतका विचार चित्तांत आणून तह करून घेतला. सर्वत्रांस पत्रें इंग्रजांकडील तह झाला इतकाच मजकूर कागदोपत्रीं लिहिला. यादी[७] प्रगट केल्या नाहीत... ...

**अभ्यास :**—'पुरंदरच्या तहाचीं कलमें इंग्रज-मराठ्यांचें तत्कालीन राजकारणांतील सापेक्ष स्थान स्पष्ट करतात.' या वाक्यावर टिपण लिहा.

---

१ शिवाजी बावाजीचें पांडुरंगरावास पत्र. २ राघोबा. ३ अठ्ठावीस महालांचा सुरत प्रांत. ४ प्रश्नच नाहीं, म्हणजे तो आम्हाकडे असणारच असा अर्थ. ५ विस्तार. ६ समेट होत नाहीं, जातों म्हणत होते. ७ तहाच्या अटींचे मुद्दे.

# १६३. इंग्रजास दादावाचून दैवत नाहीं

मराठी रियासत,
उत्तर विभाग, भा० १ ला,
पृ० ३९–४०

श० १६९६ फाल्गुन शु० १२
१३–३–१७७५

श्रीमंत पंतप्रधान स्वामींचे सेवेसी विनंती सेवक बाजी गंगाधर मुा बेलापूर

"सरकारचे वकील रणछोड शेणवी मुंबईस होते, त्यांस सुरतेस रवाना करावें म्हणून दादांनीं मुंबईस लिहून पाठविलें. हें वर्तमान त्यांस मॉस्टिननीं सांगितलें, त्याजवरून चंद्रगमनी होऊन[1] येथें प्रहर रात्रीस पावले. त्यांनीं सांगितलें, दादासाहेबांस सुरतेस जागा इंग्रजांनीं महंमुदी बागांत दिला आहे. बराबर अमृतराव, आठ नाटकशाळा व ४९ खिजमतगार आहेत. इंग्रज सर्व साहित्य करीत आहेत. बडोदें सर करून गोविंदरावास द्यावें, नंतर अमदाबाद घेऊन, हरिपंतांशीं लढून देशीं पुण्यास जावें, असा बेत आहे. प्रस्तुत दादावांचून इंग्रजांस दुसरें दैवत नाहीं. सुरतेहून दर दोन दिवशीं फतेमार[2] मुंबईस येते. इंग्रजांस प्रस्तुत स्वर्ग ठेंगणा झाला आहे. धुळपाचे आरमाराची मोठी सलामत[3] इंग्रजांवर आहे. त्यास पुण्याहून मदत करून मुंबई लुटून फन्ना करावी म्हणजे इंग्रजांचा गर्वपरिहार होईल. श्रीमंतांस मुंबईस आणण्याचें मानस इंग्रजांचें नाहीं."*......

**अभ्यास** :—इंग्रज दादासाहेबास कोणकोणत्या प्रकारें साह्य करीत होते? 'इंग्रजांस प्रस्तुत स्वर्ग ठेंगणा झाला आहे' कां?

---

१ रातोरात जावयास निघून. २ जलद चालीचें लहान गलबत. ३ सुरक्षितपणा. *खंड १०, पत्रांक १५७; मुळांत फरक करून.

# १६४. तोतयाचा मोड



**महादजी शिंदे यांचीं कागदपत्रें, नं० २६** | **१७ नोव्हेंबर १७७६**

श्री

राजश्री सखारामपंत बापू गोसावी यांसी :—

दंडवत विनंती. उपरी. आपणाकडून या दिवसांत पत्र आले नाहीं, तर लिहीत असावे. यानंतर राजश्री राघोजी आंगरे यांनीं तोतया हस्तगत केला. त्यास आणावयाकरितां येथून राजश्री बाळाजी गोविंद व राणेखान पाठविले होते. ते आंगरे यांसी घेऊन पंधरावे दिवशीं खालापूरचे[1] मुक्कामीं आले. भेटी जाहल्या. तोतया मंडळी सुद्धां बंदोबस्तांत आहे. आज मंदवारचा[2] येथें मुक्काम, आंगरे यांचे वुनगे यावे म्हणोन जाहला. उदईक रविवारीं कूच करून खालापुरास मुक्काम योजिला आहे. दरकूच घाटावर चढोन पुण्यास येत आहों. कित्येक मजकूर राजश्री नारो शंकर यांसी लिहिले आहेत, ते श्रवणारूढ करून, उपयुक्त असेल तें लिहावें. व लिहवावें, रवाना चद्र ५ सवाल. बहुत काय लिहिणें, लोभ कीजे हे विनंती.

**अभ्यास** :- -हा तोतया कोण ?



१ हें ठिकाण कोंकणांत आहे. २ शनिवार.

# १६५. मोरोबाचें कारस्थान

अधिकारयोग, पृ०९३–९४ } { ले० वा०वा०खरे

## सांकेतिक पत्र व त्याचा उलगडा

"आपण लग्नाचा प्रकार दर्शविला, त्यास अवकाश थोडका राहिला. वऱ्हाडी जमा झाले पाहिजेत, समारंभ चांगला लौकिकाप्रमाणें झाला पाहिजे. येथें लग्नाच्या साहित्यांत आहेत. येथील साहित्यास गुंता नाहीं. तिकडून लग्न आलें म्हणजे कार्यसिद्धि होईल. साहित्य करून गृहस्थ वाट पहातात. पहिलेंच नाहीं ह्मटलें असतें ह्मणजे निश्चित राहते. निश्चयाचें मांगोन आतां अडचणी सांगों लागले, तथापि यानीं वचन बळकट धरून बसले आहेत. त्यांचें येणें न झाल्यास आणखीकडे जसा मिळेल तसा (वर) पाहतील."

या (पत्रा) वरून काय समजावें ? पत्रावर नांव नाहीं गांव नाहीं ! रवाना तारीख मात्र छ ४ रबिलाखर (२–५–१७७८) अशी आहे. पत्राच्या प्रारंभीं दोन तीन ओळींत लोकप्रसिद्ध गोष्टींचा उल्लेख करून पुढें हा वर उतरून घेतलेला मजकूर आहे. याचा सरळ मराठींत तर्जुमा करावयाचा ह्मटला ह्मणजे असा होतो—"शिंद्याची फौज इकडे येणार ह्मणून लिहिलेंत, पण आतां मोहिमेचे दिवस थोडके राहिले. तितक्यांत मोरोबाचें खूळ मोडण्याची तजवीज झाली तर बरें. नाहीं तर मृगसाल सुरू झालें ह्मणजे मोरोबा राज्यांतील मामलतींची[1] घालमेल करणार आणि रसदेच्या[2] रूपानें निम्मा वसून मामलेदारापासून घेणार. मग शिंदे येऊन काय उपयोग ? दुसरे सरदारही जमा झाले पाहिजेत. बंदोबस्त चांगला झाला पाहिजे. नाना

---

१ वसुलाचे प्रांत. २ वसूल गोळा करण्याची जबाबदारी घेऊन आगाऊ भरलेली रक्कम.

येथें मसलतीची तयारी करीत आहेत. येथल्या तयारीची काळजी नको. तिकडून फौज आली ह्मणजे कामच होईल. नाना तयारी करून वाट पहातात. शिंदे प्रथमच येत नाहीं ह्मणते तरी हरकत नव्हती. येतों असें खात्रीनें सांगून आतां तकरारी त्यांनीं सांगितल्या तरी त्यांच्या प्रथमच्या वचनावर विश्वास ठेवून नाना स्वस्थ आहेत. ते येत नाहींत असेंच झाल्यास नाना अन्यत्र राजकारण करितील.''

**अभ्यास** :—सांकेतिक पत्रें कां लिहिलीं जातात ?

---

## १६६. मुलगी पळवून लग्नाचा यत्न

पे० द०, भा० ४३, नं० १४५ } { पैवस्ती २०–६–१७७८

### गांवांत भीक मागून फुटाणे खाण्याची शिक्षा

श्री

त्रिंबक धारप याण करमरकर याची मूल पलून नेऊन लग्न लावीत होता, त्यांतील जोसी व त्याचा चुलतभाऊ हे दोघे वाडयांत होते त्यास शहरात फिरऊन दंवडी पिटून असे फिरोन[1] कोणी न करी असे लोकास कलऊन[2] तोफखान्यांत[3] आटकेस[4] बिडीखेरीज[5] ठवावे आण[6] फुटाणे गावात भीक मागून खावे. याजप्रा॥ वो॥[7] राजश्री शास्त्रीबावाची आज्ञा जाली आहे हे विनंती.

**अभ्यास** :—अशा प्रकारची शिक्षा आतां दिली तर ?

---

१ पुनः. २ कळवून. ३ तोफखान्याच्या जागेंत. ४ कैदेंत. ५ बेडी न घालतां. ६ आणि. ७ वेदशास्त्रसंपन्न.

# १६७. वडगांवची लढाई

ऐतिहासिक लेखसंग्रह भा० ७ वा, पत्र नं० २४६४ | २२ जानेवारी १७७९.

" इंग्रज[1] वडगावावर जातांच फार करून लुटले गेले. फारच गेले. पुढें परिणाम नाहींसें समजोन थैली[2] पाठविली कीं, (या) पत्राचें उत्तर येतांच भल्या माणसास[3] पाठवूं. तेव्हां (इकडून) पत्राचें उत्तर गेलें. त्याजकडून भला माणूस आला. त्यानें लिहून पाठविलें त्याजवरून (इंग्रजांकडून) यखत्यारी[4] आला. त्याचें नांव मेस्तर होम (Mr. Holmes). त्यानें ठराव केला कीं, " साष्टी, उरण व जंबूसर वगैरे गुजराथचे महाल सरकारचे व गायकवाडाकडील घतले आहेत त्यासुद्धां झाडून सोडून देऊन श्रीमंत नानासाहेब व माधवराव साहेबापासून तहनामा चालत आला त्याप्रमाणें चालावें. श्रीमंत राजश्री दादासाहेबांस हवालीं करून द्यावें. कलकत्याहून (बुंदेलखंडांत) कपू[5] आले आहेत त्यांस (इकडून) दस्तक[6] द्यावें ह्मणजे ते परत जातील." येणेंप्रमाणें ठराव झाला. साष्टी वगैरे ठाण्यांसाठीं इष्टुर फांकड्याचा पुतण्या (Lieutenant Charles Stuart) ओलीस राहिला. आणि दुसरा फरमार (Mr. Farmer) म्हणून इंग्रजच. येणेंप्रमाणें ओलीस राहिले...... (इंग्रज) इतके दमानें[7] आले असें असतां असें कसें जाहलें असें आपण म्हणतील, त्यास मुख्यत्वें श्रीमंतांचें पुण्य विचित्र, अवतारी पुरुष, त्यासारखे योग घडले! ज्या माष्टीमानें (मॉस्टिन् यानें) मसलत केली तो घांटावर येतांच समाधान नाहीं म्हणून मुंबईस गेला तेव्हां मृत्यु पावला. इष्टुर फांकडा[8]

---

१ पत्रलेखक शिवाजी बावाजी. २ दरबारी पत्र. ३ अर्थात् तह करण्यास. ४ जबाबदार माणूस. ५ फौजेची तुकडी, एका कंपूंत (Brigade) दहा पायदळ पलटणी, एक पांचशें लोकांच्या शिबंदीची तुकडी, पांचशें तुर्कस्वार व साठ तोफा अशी भरती असे, असें कै. प्रो. लिमये हे 'गनिमी कावा व कवाइती कंपू' या निबंधांत लिहितात. ६ परवाना. ७ हिमतीनें. ८ तडफदार.

मोटा लढाव, तो गोळा लागोन ठार झाला. कर्णेल की (Lieutenant Colonel Kay) ह्मणून होता त्यास बाण लागोन जेर झाला. आकारिक[1] होते त्यांची अशी अवस्था झाली. इकडून फौज तिकडे येईल म्हणून (त्यांस) भरंवसा होता, (पण ती) फौज मिळाली नाहीं. इकडील फौजेंत देण्या-घेण्याचा दंगा, यास्तव फौज (एकत्र) मिळणार नाहीं असा त्यांचा समज; त्यास उभयतां सरदारसुद्धां पन्नास हजार फौज जमा झाली. चोंहोंकडून फौजांचे भार[2] पहातांच छाती तडकली; तेव्हां माघारें कूच केलें. सारांश श्रीमंतांचा प्रताप हें खरें! (पत्रांत थोडा फरक करून)

**अभ्यास**:—वडगांवच्या लढाईत मराठे जय पावले याचीं पत्रलेखकानें दिलेलीं कारणें कोणतीं? तुम्हास तीं पटतात काय?

---

## १६८. बालपेशव्याची मुंज

---

ऐतिहासिक लेखसंग्रह भाग ७ वा, नं० २४९२ } { एप्रिल १७७९

श्रीगणपति.

सुरू सन तिस्सा सबैन.

चिरंजीव[3] राजश्री बळवंतराव यांसा आशीर्वाद उपरी.....श्रीमंतांचा व्रतबंध होणार, काय पाठवावें लागेल, ह्मणोन लिहिलें, त्यास वैशाख शुद्ध पंचमीस व्रतबंध होणार. स्वारी जेजुरी व मोरेश्वर व थेऊर येथें जाऊन देवदर्शन करून पुणियास जाऊन तेथें व्रतबंध करणार; म्हणोन कालच बाळाजीपंत यांचीं पत्रें आलीं. त्यास 'पुणियास व्रतबंध करणें ठीक नाहीं. किल्ल्यावरच करावा,'

१ प्रमुख, महत्त्वाचे. २ संख्यावल. ३ पत्र परशुरामभाऊंचें मिरजेस गंगाधररावांस.

अशी सूचना लिहोन पाठविली आहे. कोठें करितात पहावें! श्रीमंतास अहेर चिरंजीव राजश्री शिवराम सुभेदार यांजबरोबर पाठवून द्यावा. तेथेंही चिरंजीव राजश्री बळवंतराव[1] व हरीपंततात्या आहेतच. कोणी गेल्याशिवाय ठीक नाहीं. सुभेदारांस पाठवावें हें चिरंजीव राजश्री दादाचेही विचारास आलें. एक कंठी हजार रुपयेपर्यंत श्रीमंतास पाठवावी. शिवाय एक झगा, टोपी, वोढणी[2] व अंगवस्त्राबद्दल धोतरजोडा एक येणेंप्रों पाठवावें...बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे आशीर्वाद.

**अभ्यास :**—तत्कालीन नजराण्यांची कांहींशी कल्पना या पत्रावरून दिसून येते. आज उपनयनासारख्या प्रसंगीं कोणत्या वस्तू भेटीस दिल्या जातात?

---

# १६९. बालपेशव्याचा दिनक्रम

**काव्येतिहाससंग्रह, लेे० ३९३, पृ० ३३९**

**पौष शु० ६ श० १७०४ ता० ८–१–१७८३**

['पेशवाईतील राजपुत्रांचें शिक्षण' या विषयाची या पत्रानें बरीच कल्पना येईल.]

श्रीयासह चिरंजीव राजश्री माधवराव प्रधान यांसि प्रती गोपिकाबाई[3] मुक्काम नाशिक अशीर्वाद उपरि येथील कुशल तागायत छ ४ माहे सफर जाणून स्वकीन[4] कुशल वर्तमान यथास्थित असे विशेष. तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें.

---

१ पुण्यास बळवंतराव कृष्ण व हरिहरराव पुरुषोत्तम पटवर्धन मंगळवेढेकर आहेतच. २ अंगावर खांद्यावरून घ्यावयाचें वस्त्र. ३ नारायणरावची आई. ही विरक्तीनें नाशिकला जाऊन राहिली होती. ४ स्वकीय.

"मी लहान, वडीलीं सर्व-त्याग करून श्रीक्षेत्रीं वास केला आहे, त्यास सर्व माहित वडिलांस, यास्तव कोणे रीतीनें चालावें हें सर्व त्याहावयास आज्ञा व्हावी," म्हणोन लिहिलें. त्यास सूर्यग्रहणसंधि अन्वयें कृष्ण पक्ष होऊन लोप जाहला होता, तो हल्लीं पुण्योदयें करून दुष्टांचा संहार व सुष्टांचे पालग्रहणार्थ तुम्ही या कुळांत जन्म घेऊन पुरंदर येथें उदयास आलां'; त्यापक्षीं इकडून लिहावयाचें कारण दिसत नाहीं. परंतु मानवी देह आणि तुम्हीं लिहिलें, त्यापेक्षां तूर्त चालावयाचे जें सुचलें तें लिहिलें आहे. तपसील कलम बंदी: —

१ प्रातःकालचे घटका रात्रौ उठोन दिशेस जाऊन पादप्रक्षालन मुखप्रक्षालन करून दिवाणखान्यांतील श्रीमृत्तिका गणपतीचें दर्शन घेऊन प्रातःस्मरणाचे श्लोक म्हणावे. नंतर सूर्योदयाबरोबर वैद्यांनीं येऊन हात पहावा. प्रकृतिअन्वयें औषध घ्यावें. नंतर लिहावयास बसावें. कित्यांत हात फिरवून मग ज्या कागदावर निशाणें[2] व्हावयाचीं असतील तें लिखितान्वयेंच[3] वाचावें. ते समयीं जवळ गुरुजी व आणखी एक दोघे सभावित योग्य असतील ते असावे. जास्त असो नये. येणेंप्रमाणें घटिका तीन. येकूण घटिका. कलम १

१. तालिमखान्यांत जाऊन दंड[4] काढावे. दिवसेंदिवस शक्ति अन्वयें चढते[5] दंड असावे. बरोबर समवयी मुलें पांच चार संभावितांचीं असावीं. व जेठी[6] एक दोघे व नेहमीं विश्वासुख गृहस्थ बरोबर असावयाचे तें असावें खिसमतगार कार्याकारण असावे. जेठी यांनीं कुस्तीचे डाव शिकवावे. नंतर समवयी मुलांसुद्धां प्रकृतीस जो खुराख मानेल तो नेमेंकरून घेत जावा. येणेंप्रमाणें घटिका दीड. येकूण घटी साडेचार. कलम २

२. स्नान करावयाचे समयीं पंचांग जोशी वाचून संकल्प सांगावा. नंतर गंगाष्टक म्हणावें, संध्या थोडकी, परंतु न बोलतां करावी. कलम ३

१. कचेरीस यावें ते समयीं सर्वांस येऊन योग्यतेनुरूप नेत्रलाभ व भाषण होत असावें. कचेरींत लघु शब्द बोलूं नये व गैर नि हीं [?] बोलूं नये.

---

१ नारायणवाच्या वधावर सूर्यग्रहणाचें हें रूपक आहे. सवाई माधवराव हा अवतारी आहे असा तत्कालीन समज गोपिकाबाईच्या मनांतही आहे. २ शेवटील अक्षरें "आज्ञा प्रमाण" हीं अक्षरें सहीच्या ऐवजीं घालीत. ३ लिहिलेलें समजून घेऊन वाचावें. ४ जोर. ५ वाढते. ६ मल्ल, कुस्तीगीर.

मनुष्यपरीक्षा असावी. गैरवाखा[1] एखाद्यानें समजाविलेस पक्केपणीं विचार करून अपराध ठरल्यास दुसऱ्याकडून त्यास निषिद्ध करवावें. आपण नेत्र-कटाक्ष करून पहावें. अपराधानुरूप पारपत्य करावें, परंतु संभावित गृहस्थ बहुत दिवस पदरींचा प्रामाणिक अशानें रदबदली केली असतां क्षमा करावी. दुसऱ्याचें क्षुद्र काढूं नये. येणें करून त्याचा अपमान होतो, आणि तो त्याचे मनांत दंश राहतो, साधल्यानुरूप नाश करील. आणि आपल्यास लघुपणा येईल. संन्निधानीं[2] लोभांत लघुमनुष्य[3] राखल्यास जें केलें त्यास ते रुकार देतात, परंतु जन लोक वाईट म्हणतात, थोरपणास हानि होती. येणेंप्रमाणें घटी तीन. येकूण घटी अकरा. कलम ४

१. भोजनाचे पूर्वीं सोवळें जाहले नंतर थोरल्या देवघरांत जाऊन, फुलें घालून, नमस्कार करून, ब्राह्मणांस उदक सोडून, भोजनास बसावें. ते समयीं आपण करणें ते राजसुययज्ञांतील ब्राह्मणभोजन प्रकरणीं वगैरे योग्य सर्वांस दिसेल तें बोलावें. पाक[4] करणार व शिष्य मंडळी सुशिक्षित विश्वासुक असतील ते बाळगावे. घटी २. येणेंप्रमाणें घटी १३. कलम ५

१. भोजनोत्तर आचमन करून शतपदी[5] करून तांबूल घ्यावा. नंतर दोन घटिका राजविलास खेळ खेळावे. येणेंप्रमाणें घटी २. येकूण घटी पंधरा. कलम ६

१. शास्त्री यांजवळ विराटपर्वापासून भारतांतील चिंतनिका[6] करीत असावी; व वृद्ध मनुष्यें पदरचीं बहुत दिवशीं[7] व अन्यत्र शहाणे असतील त्यांशीं दिल्लीप्रकरणीं व महाराजप्रकरणीं गोष्टी कशा जाहल्या त्या ऐकण्यांत असाव्या. आपले वडिलांच्या गोष्टी कारभारी यांसि एकांत स्थळीं विचारीत असावें; व तसबिरा व नकाशे अनेक पहात असावे. ते समयीं शाहाणे बुद्धि-मान् असतील ते जवळ असावे. येणेंप्रमाणें घटिका चार. एकूण घटिका १९. कलम ७.

१. खडें लिहावयास बसावें. ते समयीं एक दोन मुलें संभावित गृहस्थांचीं बुद्धिमान पहावयास असावीं. करदन[8] बस्तन[9] गुणाकार भागाकार करा-वयाचा सराव बहुत असावा. गुरुजी यांणीं विद्याभ्यासाकरितां बोलणें[10]

---

१ गैरवाजवी, बनावट. २ जवळ. ३ हलका. ४ स्वयंपाक. ५ शतपावली. ६ मनन. ७ दिवसांचीं. ८ बेरीजवजाबाकी. ९ ताळा. १० रागें भरणें.

प्राप्त आहे. परंतु लिहावयाचे जागींच बोलावें. तेथें विशेष कोणी असो नये. घटी चार. एकूण घटिका तेवीस. कलम ८

१. लिहिणें जाहलेनंतर कांहीं उपकार थोडासा मर्जी असल्यास मुलासमवेत घेऊन करावा. नंतर तांबूल घ्यावा. घटी एक. एकूण घटिका चोवीस.

कलम ९

१. घोडीं फेरावयास चार रोजांनीं जात जावें. ते समयीं बरोबर पटवर्धन मंडळी व अन्यत्र सरदार असावे. त्यांशीं भाषण करणें तें संतोषवृत्तीनें करावें. परंतु अत्यंत लोभही नसावा व विरुद्धही न दाखवावें. कांहीं अंतर[1] जाहल्यास क्षमा होणार नाहीं असे भय असावें. योग्यता बघून त्याशीं भाषण संतोषेंकरून करावें. दिवाण यांणीं राजकारणाचें वर्तमान व पुढील योजना करावयाचा विचार करून विनंती करीत असावी. त्या समयीं अन्यत्र कोणी असों नये. व त्यांतील अभिप्राय दुसऱ्यापाशीं निघों नये. म्हणजे मसलती असाध्य होत नाहीं. बातमी हरतऱ्हेची राखावी म्हणजे मसलतीस बल बहुत आहे. पदरच्या मनुष्यांचें चालवावयाचें त्यास जिकीर करू नये. एकूण घटी चार. एकूण घटिका अठ्ठावीस. कलम १०

१. तिरंदाजी करावयास जावें.—तेथें बरोबर सरदार व पागे व मानकरी बराबर असल्यास तीर कोण कसे मारताहेत ध्यानांत असावें. व हरएक खेळ पहावयचे ते सर्वत्र समवेत पहावे. येणेंप्रमाणें घटिका दोन. एकूण घटिका ३०.

कलम ११

१. दीपदर्शन जाहल्यानंतर संध्येस वस्त्रांतर करून बसावें. संध्या जाहलेनंतर स्तोत्रपाठ म्हणावा. नंतर पुरुषसूक्त अथवा पवमानांतील[2] अध्याय म्हणावे. ते समयीं आश्रितांनीं जवळ असावें. नंतर भोजनास जावें. भोजन होऊन उठेपर्यंत घटी चार. कलम १२

१ भोजनोत्तर तांबूल खावयास दिवाणखान्यांत क्षणभर बसून तांबूल घ्यावें. नंतर कार्याकारण मंडळी जवळ असावी. ते समयीं बातमीदार यांणी वर्तमान गुप्त सांगत असावें. व हरएक बातमीचीं पत्रें आलेलीं पहावयाजोगीं असतील तीं पहावीं. बाकीचीं पत्रें विश्वासूक मनुष्य कोण असेल त्याजकडे

---

१ फरक, गैर गोष्ट. २ पुरुषसूक्तासारखा एक मंत्र.

काम योजावें, त्यांणीं सांगावें. व त्यावर ही बातमी प्रमाण अथवा अप्रमाण सांगतात याची चौकशी असावी. नंतर निद्रेस जावें. येणेंप्रमाणें घटी तीन. एकूण घटिका सात. कलम १३

एकूण कलमें तेरा लिहिलीं आहेत, तीं ध्यानीं आणोन चालल्यास उपयोगीं पडतील. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

**अभ्यास**:—पेशवाईतील राजपुत्रांचें शारीरिक शिक्षण व बौद्धिक शिक्षण कोणतें होतें? या शिक्षणांत आणखी कोणती भर सुचवाल? त्यांच्या जीवास कोणत्या प्रकारें जपत?

---

## १७०. उत्तरकडे दुर्लक्ष : ग्वालेर गमावलें !

**महादाजी शिंदे यांचीं कागदपत्रें, नं० १०८** — **१३ ऑगस्ट १७८०**

श्री

राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसी:—

छ दंडवत विनंती उपरी :—पातशाहा व नजफखान यांजकडील पत्रें आलीं, त्यांचा मजकूर सविस्तर आपणास दोन तीन पत्रीं पेशजी लेहून पाठविला आहे. आपल्या पत्राचीं उत्तरें यावीं त्याप्रमाणें करावें हे प्रतीक्षा करीत होतों. तों आज छ १२ साबानीं रा आंबाजी इंगळे यांचे फौजेंतून पत्रें आलीं कीं ग्वालेरचा किल्ला इंग्रजांनीं दगा करून श्रावण शुा चतुर्थीस* घेतला. किल्लेदार रघुनाथराव रामचंद्र गोळी लागोन ठार पडला त्याच्या बायकामुलें होतीं त्यांनीं पोटकटारी' करून घेतली म्हणोन वर्तमान आलें.

---

*४ ऑगस्ट १७८०. १ पोटांत कट्यार खुपसून आत्महत्या.

किल्लेदाराकडे येथून खर्चास पाठविलें. सावधानीविसीं वरचेवरी लिहीत असतां बेफाम राहिले, त्यामुळें दगा होऊन जागा गेली. इंग्रजांस मोठा थांगा[१] जाला. तेथील मजबुदी करून पुढें यावयाचा विचार त्यांचा आहे. जैपूरकर[२] व नजफखानाची फौज एंशी नव्वद कोसांवरी येथून आहे. याप्रो इकडील वर्तमान. केसोपंत दातार श्रीमंत दादासाहेबांकडील व पलटणें सुल्तानपूर, नंदुरबार येथें येऊन अमल बसविला. गुलजारखान व चंदरराव पवार ते सारे एकत्र होणार हेंही वर्तमान आलें. आपलें पत्र राजश्री सदाशिव दिनकर यांसी आलें कीं पाटीलबाबास घेऊन कोंडाईबारीकडे यावें. त्यास आम्ही तिकडे आलों ह्मणजे ग्वालेरीकडील इंग्रज माळव्यांत येऊन बंदोबस्त करीत पुढें देशीं येतील याचा विचार कसा करावा ? कोंकण पट्टींत इंग्रजांचा उपद्रव तो एक शह, दुसरा, खानदेश व गुजराथ. तिसरा, ग्वालेरीहून कंपू येतात ते व जैपुरकर व नजफखान, याप्रमाणें तीन मसलती[३] येऊन सध्याच ठेपल्या. ह्या जिकडील तिकडे थोपवून न राखतां सारें एकत्र जालों तरी एका तोंडावरी राहूं. दोन तोंडें मोकळीं. इकडून आटपीत[४] येतील तेव्हां मुलुकचा मुलूक त्यांचे हातीं जाऊन भारी[५] पडतील. मग कांहींच होणें नाही. याकरितां आपले विचारें येईल तरी एक सल्ला आहे. खानदेश व गुजराथ दोन तोंडें होळकरांनीं सांभाळावीं. आपण कोंकणपट्टीचें तोंड सांभाळून ठासून राहावें, आणि होळकरांकडील उपराळा[६] राखावा. आपणाकडे निकड पडल्यास होळकरांनीं उपराळा करावा. आम्ही ग्वालेरीकडन कंपू येतात ते व जैपुरकराची व नजफखानाची फौज आली अशीं दोनीं तोंडें आम्ही सांभाळतों. इंग्रज चहूंकडून वेष्टीत चालले, या समयीं चवघांनीं चहूंकडे मसलती आटोपल्यास बंदोबस्त होईल. नाहीं तरी कळतच[७] आहे......

---

१ थारा, सोयीची जागा. २ जयपूरकर, ३ मोहीम, फौज. ४ आक्रमण करीत. ५ प्रबळ होतील. ६ मदत, साह्य. ७ लक्षांत येईलच कीं कांहीं होणार नाहीं, असा अर्थ.

# १७१. इंग्रजाकडून शकटभेदाचा यत्न

काव्येतिहाससंग्रह, ले० २७७ | शके १७०२ श्रा० शु० ४ ता० ४-८-१७८०

[ पेशवे, निजाम व हैदर या तिघांशीं वेगवेगळीं कारस्थानें करून तिघांसही बुडवावें हा इंग्रजांचा बेत हैदरनें ओळखला होता व तो नानास व शिंद्यास सावध करीत आहे. ]

श्री

राजश्री सदाशिवपंत* स्वामीचे सेवेशीं.

विनंती उपरि. हैदरखानास मसुद्याप्रमाणें पत्र राजश्री पाटीलबावांचें पाठविलें तें पावलें म्हणून पूर्वी तुम्हांस लिहिलेंच होतें...चेनापट्टणची बातनी[१] आली त्यांत लिहिलें आहे कीं, हैदरखान बिघाड करून येत आहे, यामुळें महंमदअल्लीखान[२] व चेनापट्टणकर[३] इंग्रज बहुत घाबरे होऊन लढाईची तरतूद करतात; व वकिलानें कु पी या[४] बातनीत सूचना लिहिली आहे कीं, इंग्रज व महंमदअल्लीखान मनसबा करतात कीं, पंतप्रधान यांकडे अनुसंधान लावावें; आणि हैदरखानास सांगावें कीं तुम्ही पंतप्रधान यांचा काय भरंवसा धरलात ? आम्हांस म्हणतात कीं, " तुम्ही आम्ही मिळोन हैदरखानचें पारपत्य करूं. त्यास आम्ही पंतप्रधान यांचा स्नेह चाहत नाहीं. जर तुम्ही नच एका तर आम्ही या प्रमाणें करतों आणि तुम्ही आम्हांस अनकुळ झाले तर पंतप्रधान यांची दौलत तुम्ही आम्ही मिळोन घेऊं. " असा शकटभेद[५] हैदरखानाचें व सरकारचें द्वैत पडावें या करतां करणार आहेत. सावधता असावी. हैदरखानानें सरकाराशीं स्नेह संपादून इंग्रजाशीं बिघाड केला हा ये समयीं मोठा

---

*नाना फडणवीसाचें शिंद्यांच्या दरबारीं पेशव्यातर्फे नेमणूक झालेला सदाशिव दिनकर यास पत्र. १ बातमी. २ कर्नाटकाचा नबाब. ३ मद्रासकर. ४ कुपिया (हिंदी खुफिया)—गुप्त. ५ फूट पाडण्याचा डाव.

उपयोगी आहे. इंग्रजांचें मानस आहे कीं, हैदरखान, श्रीमंत व नबाब तिघांच्याही दौलता घ्याव्या. त्यास कोणेंही प्रकारें एकाशीं शकटभेद करून एकास खालीं पाडावें, असें करतां एक राहील त्यास आपण शेवटीं गुंडाळावें. याची पूर्ती बंदोबस्ती असावी'[1] म्हणोन वकिलानें[2] लिहिलें आहे, हें वर्तमान पाटीलबावांस सांगावें... हे विनंती

पैा* छ १७ सबैन सुरुसन इहिदे समानीनमुक्काम उजैन.

---

# १७२. हैदरशीं तह

---

**ऐतिहासिक लेखसंग्रह, भा० ७ वा, नं० २५४९** | **इ० स० १७८० पौष–जानेवारी**

[ नारोपंत नाना दामले यांस जनार्दन माधवराव यांजकडून पत्र बिनतारखेचें. ]

"हैदर नाइकाचा तह जाहला ऐसें वर्तमान आहे. तहांत ठरलें कीं झाडून बंद[3] सोडावे. त्यास पेशजी खंडणी लाख होनाचा करार झाला; त्यास हल्लीं याप्रमाणें ठराव जाहला आहे कीं कृष्णेअलीकडे त्यानें येऊं नये; यांनींही[4] पलीकडे जाऊं नये; याप्रमाणें वदंता ऐकितों. त्यास आपल्यास जालें वर्तमान कळलें असेल तरी लिहून पाठवावें. चिरंजिवांची[5] सुटका कैसी होती ही चिंता बहुत लागली आहे."

---

१ हें ओळखून पूर्ण सावध असावें. २ हैदरच्या वकिलानें. *पोहोंचल्याची तारीख. ३ कैद. ४ श्रीमंतांनीं. ५ धाकटे बंधु आनंदराव तोफखानेवाले यांची.

# १७३. हैदरचा मृत्यु

काव्येतिहाससंग्रह, लें० ४०१

माघ व० श० ९, १७०४, ता० २५–२–१७८३

श्री

राजश्री नारोपंत स्वामींचे सेवेशीं.

विनंती उपरि. हैदरखान वारले, त्यांचे चिरंजिवांस मातमपुरशींची[1] वस्त्रें पाठविलीं, हा मजकूर पेशजीं लिहिलाच होता, पुत्रही पराक्रमी आहे. परंतु हैदरखानाचा दाब इंग्रजांवर मातबर होता. यामुळें इंग्रज खानास वचकत होते. खान वारल्यावर इंग्रजांनीं तिहींकडे तीन टोळ्या करून त्याच्या मुलखांत पाय शिरकाविला. एक टोळी बिदनुराकडे येऊन बिदनूर संस्थान मोठें तें इंग्रजांनीं हस्तगत केलें. थोडा थोडा कदम[2] पुढें टाकीत चालिले म्हणोन बातमीचीं पत्रें आलीं. त्यावरून वर्तमान कळावयाकरितां लिहिलें आहे. इंद्रसेन[3] पाटीलबावांजवळ आहे तो हेष्टीना[4]पासून आला. मुकत्यार[5] आहे. याकरितां सरकारचा तह पेशजी लिहिल्याप्रमाणें याउपर दिवसगत न लागतां दादासाहेब कुटुंबसुद्धां हस्तगत करून घेऊन पक्का तह लौकर व्हावा. या उपर विलंब लाऊं नये. राा छ २२ रबिलावल हे विनंती.

**अभ्यास :—हैदरच्या मृत्यूमुळें कोणत्या गोष्टीबद्दल सावधता बाळगावी असें लेखकानें म्हणणें आहे ?**

---

१ दुखवट्याची (मातम – दुःख + पुर्शीस–विचारपूस). २ पाऊल. ३ अँडरसन. ४ हेस्टिंग्ज. ५ जबाबदार.

# १७४. सवाई माधवरावाचें लग्न



काव्येतिहाससंग्रह, लें० ३९७ | १०-२-१७८३ (?)

## कामांची नेमणूक व विल्हेवारी

[ ही ४८ कलमी याद मूळांतून वाचण्यासारखी आहे नमुन्यादाखल एक कलम दिलें आहे. यावरून नानांची दक्षता व बारीक नजर लक्षांत येते. ]

नेमणूक लग्न* श्रीमंत राजश्री रावसाहेब सुरू सन सल्लास समानीन मया व अलफ. कामें नेमून सांगितलीं :—

.... .... .... .... ....

(८) गंध अक्षत उगाळून लावण्याचें काम जनार्दन मुकुंद यांजकडे व बाबाजी लंबोदर.

केशरी गंध अर्काचें व मध्यम ऐशीं दोन प्रकारचीं चांगलीं, रंगदार कपाळीं लावावयासि; व अंगास लावण्यास केशर व अर्गजा वगैरे सुवासिक एक व साधें पांढरें एक व गुलाबी चंदनाचें व कृष्णागराचें[1] याप्रमाणें चांगलीं उगाळावीं. केशरी गंधांत केशराची कसर राहूं नये. व अक्षता उंच कस्तुरीची व मध्यम कस्तुरीची ऐशा दोन कराव्या. गंधअक्षत खासा मध्यम असामी पाहून लावीत जावी. उभे खोडानें गंध उगाळावें.

गंध लावणारे चांगले कुशल चौकस माणूस असावे. त्याणीं सांखळीनें कपाळीं लावावें. वांकडें गंध लागूं नये व अक्षत लावते समयीं नाकास धक्का न लागतां कपाळाचा मध्य पाहून लहान मोठी अक्षत ओघळ न येतां वाटोळी लावावी, व गंध उभें आडवें ज्यांस जसें पाहिजे तसें लावावें. कोणी मातबर

---

* हें लग्न माघ शु. ९ श. १७०४ ता. १०-२-१७८३ रोजीं झालें.
१ एक प्रकारचा चंदन.

असतील त्यांच्यापुढें गंध व अक्षत ठेवीत जावी. व हातास लावण्याचें गंध देते समयीं भागीरथीचा गुलाब[1] वाटींत पुढें ठेवीत जावा. गंध अक्षता लावणार यांणीं नखें कादून बोटें चांगलीं करून लावावें......

[ अशीं एकंदर ४८ कलमें आहेत. ]

---

## १७५. टिपूशीं लढण्यास इंग्रजास मदत करा

**महादजी शिंदे यांचीं कागदपत्रें, नं० २५१** | **७ सप्टेंबर १७८३**

[ नाना व महादजी यांच्या धोरणांची तुलना करतांना नानानें इ. स. १७९० त टिपूचा पाडाव करण्यास इंग्रजांस मदत केली याबद्दल दोष देण्यांत येतो. या पत्रांत महादजी नानास काय सल्ला देत आहे तें पहा. ]

राजश्री बाळाजीपंत नाना गोसावीं यांस :—

दंडवत विनंती उपरी. सरकारचा व इंग्रजांचा तहनामा जाला, त्यांत हैदरखानाकडील कलम लिहिले आहे कीं, इंग्रजांचा घेतला मुलूख व पाडाव[2] सोडावे... ...फरासिसाचा[3] मजकूर तरी, विलायतेस फरासिसाचा व इंग्रजांचा सलूख[4] जाहल्याचें वर्तमान आहे. तेव्हां फरासीस आले* ते माघारे जातील अथवा इंग्रजांस सामील होऊन टिपूवरच मसलत करतील. तहाचे तारखेपासून साहा महिन्यांत टिपूनें मुलूख व पाडाव सोडून द्यावे, ते गोष्ट न जाहली. छ २१ रमजानीं साहा महिने होऊन चुकले. आत[5] फरासिसांचा व इंग्रजांचा सलूख जाहला, हें वर्तमान टिपूस समजल्यावरी सलुखाचा पैगाम[6]

---

१ गुलाबपाणी व गंगा एकत्र मिसळलेली (?). २ कैदी. ३ फ्रेंच. ४ सलोखा, तह. *युरोपांत इंग्रज-फ्रेंचांचें युद्ध चालू असतां फ्रेंचाचें आरमार अरबी समुद्रांत आलें होतें. ५ मध्यंतरीं. ६ बोलाबोली.

टिपूनें आपणांसीं लाविला, तरी इंग्रज ऐकणार नाहींत. साहा महिन्यांत करारप्रमाणें टिपूनें ऐकलें असतें, तरी इंग्रजांस त्यासीं बोलावयास जागा नव्हती. वाइदा[1] टळला, त्या अर्थी सरकार, आपण मिळोन, टिपूचें पारपत्य करावें, असा निश्चय इंग्रजांचा आहे. तेव्हां इंग्रज टिपूस जाहगीर व एखादा किल्ला द्यावयाचें कबूल करतील, हें कळतच आहे. वाइदा होऊन गेला, याउपरी फौजेची रवानगी टिपूवरी जलद व्हावी. फौज निघोन त्या सुमारें चालली म्हणजे आम्हांकडील कंपू सामील होतील, फौजेस दिवसगत नसावी, याप्रमाणें इंग्रजांकडील निकड आहे तरी फौजेची रवानगी भाद्रपद मासीं व्हावी, ते न जाहली. दसऱ्यास तरी रवानगी जरूर जाहली पाहिजे. फरासिसांचा व इंग्रजांचा सलूख जाहला. फरासिसांचा आसरा टिपूस होता तो तुटला. या उपरी इंग्रजां टिपूवरी जरब बसवून त्याजवरी मुलूख घेतील. आपली फौज न पोहचतां, ते मुलूक घेतील त्यांत वांटणी इंग्रज देणार नाहींत. फौज सामील जाहल्या दिवसापासून मुलूक सुटेल त्याची वांटणी घ्या म्हणतील. या करितां फौजेची तर्तूद जाहली पाहिजे. फौज लौकर न गेल्यास इंग्रजांसी बोलावयास जागा राहणार नाहीं. पुढें आपण आह्मांवरी शब्द ठेवतील यास्तव लिहिलें असे. रा[2] छ ९ सवाल. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

---

१ वायदा. २ रवाना.

# १७६. राघोबाचा मृत्यु



ऐतिहासिक लेखसंग्रह, भा० ७ वा, नं० २६९९

२५-१२-१७८३
मार्गशीर्ष व० ६ श० १७०५

श्री

राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसीं :—

सकळ गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो

तुकोजी होळकर दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. श्रीमंत दादासाहेबांचे शरीरीं समाधान नव्हतें, मध्यें चांगलें आरोग्यही झालें होतें, फिरून ज्वर होऊन मार्गशीर्ष वद्य तृतीयेस गुरुवारीं अवशीचे सहा घटका रात्रीस कैलासवास झाला,* म्हणोन लिहिलें. ऐकून चित्तास बहुत खेद जाहला. जी गोष्ट घडणार त्यास यत्न कोणाचाही नाहीं. श्रीसत्ता प्रमाण. राजश्री विसाजी आपाजी यांची रवानगी श्रीमंत मातोश्री आनंदीबाई व श्रीमंत राजश्री बाजीराव यांचे समाधानार्थ केली, उत्तम आहे. रवाना चंद्र २० मोहरम. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे ही विनती.



*११ डिसेंबर १७८३.

# १७७· शिंदे व इंग्रज यांचा सलूख

महादजी शिंदे यांचीं कागदपत्रें, नं० ३३८ | इ० स० १७८४ सप्टेंबर

[ या पत्रावरून हेस्टिंग्ज महादजीस किती वचकून होता तें दिसून येतें. ]

छ विज्ञापना ऐसीजे*:—धाकटा इंद्रसेन[1] लखनहून येथें आला आहे. राजश्री पाटिलबावांचीं त्याचीं दोन खलबतं जालीं. वर्तमान ऐकिलें जे. अफराशाबखानानें अबदुल अहदखान कैद केल्यामुळें इंग्रजांचा मनसबा[2] कच्चा पडला. बादशाहाजादा आपणाजवळ आला तो कशास ठेवावा? बादशाहींत आम्ही शिरत होतों, याकरितां पाटिलबावांस राग आला असेल, म्हणून समाधान करावयास इष्टिनानें[3] धाकटा इंद्रसेन येथें पाठविला. बावांसीं भेटून, केल्या केल्या कर्माचा परिहार[4] करून, मनांतील विक्षेप[5] दूर करावा; बादशाहाजादा आम्हांजवळ आहे याचा विचार काय तो पुसावा, म्हणून आला. भेटून दोन वेळ खलबतं जालीं. त्यांतील आशय कळला जे, बावांनीं इष्टिनास पत्र पारसी[6] लेहून दिलें कीं, बादशाहाजाद्यास आमचे स्वाधीन करावा. बादशाहा यासीं रुष्ट असतील तर चिंता नाहीं. आम्ही विनंती करून तकसीर[7] माफ करून घेऊं, आणि याचे खर्चाचा बंदोबस्त करून देऊं. बादशाहा नच मानीत, तर आम्ही आपणापासून खर्च चालऊं असें पत्र इंद्रसेनाजवळ दिलें. तेव्हां सफाईचीं[8] बोलणीं जालीं असतीलच... सेवेसीं श्रुत होय. हे विज्ञापना.

---

* पत्रलेखक सदाशिव दिनकर. १ अँडरसन. २ कारस्थान. ३ हेस्टिंग्ज. ४ निरसन. ५ किल्मिष. ६ फारशी. ७ गुन्हा. ८ दिलसफाईचीं, सलोख्याचीं.

# १७८. टिपूशीं लढाई

ऐतिहासिक लेखसंग्रह, भाग ८ वा, नं० ३००५ } { २६-७-१७८६

श्री

शिक्का

*राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसीं.:—

दंडवत. विनंती उपरी. आपण छ० १ रज्जबचें पत्र पाठविलें तें पावलें ......ऐसीयास प्रथम नबाबाची आपली भेट जाहली. दोहींकडील फौजांचा जमाव भारी, यावरून टिपूवर जरब चांगली बसली होती. त्याच समयीं एक विचार होऊन दिवसगत न लागतां कूच दरकूच तुंगभद्रेपर्यंत जाणें जालें असतें तरी मुलूख ठाणीं सुटोन टिपूचें पारिपत्य होऊन नक्ष[1] अधिकोत्तर जाहला असता. भेटी जाहल्यावर एक जागां मुक्काम बहुत जाहले यामुळें शत्रूस फुरसत पडली. तशांत नबाबानीं भागानगरास जावयाचा विचार केला! प्रथम मसलत पक्केपणें टिपूवर करावी असा विचार नबाबाचा आपला ठरून मोहिमेस निघाले असतां मधींच हा विचार केला, हें सविस्तर आपले लिहिल्यावरून समजलें. हैदरनाइकाचें पारिपत्य आजपर्यंत एक सरकारचीच फौज करीत आली आहे[2] व पुढेंही श्रीमंतांचे प्रतापें टिपूचें पारिपत्य सरकारचे फौजेनेंच होईल. नबाबानीं आपलेकडील तहवारजंग ठेविलेच आहेत. नबाब गेल्यावर आपण बदामीस मोर्चे लावून जागा घेतली. पुढें छावणी जाहलीच आहे. श्रीमंतांचें दैव समर्थ आहे! शत्रु पादाक्रांत होतील. राजश्री हरिपंततात्या व होळकर वगैरे सरदार मोहीमशीर आहेत. त्यांस आपलीं पत्रें मजबुदीनें[3]

---

*हें पत्र महादजी शिंद्यांचें नाना फडणवीस यांस. १ दरारा. २ याचा संदर्भार्थ असा कीं इंग्रज हैदरापुढें घाबरतात, निजामाचा तर प्रश्नच नाहीं; पण मराठे तेवढे हैदरास तोंड देऊं शकतात. ३ पाय रोवून.

राहून टिपूकडील मुलूख घेऊन त्याचें पारिपत्य करीत येविशीं जातच असतील. त्यांची पुस्तपन्हां[1] आपणाकडूनही वरच्वेवर व्हावी. तिकडील वर्तमान वरच्वेवर लिहून संतोषवावें. रवाना छ० २९ रमजान. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

---

## १७९. लालसोटची विपत्ति : साहयार्थ विनंति

महादजी शिंदे यांचीं कागदपत्रें, नं० ५०१ | १८ ऑगस्ट १७८७

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं :—

छ विनंती सेवक ह[2]महादजी शिंदे कृतानेक विज्ञापना तागाईत छ ४ माहे जिल्काद मक्काम नजीक डीग पर्यंत स्वामींचे कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष :— इकडील वर्तमान, लढाई रजपुतांची मारली असतां पलटणांनीं वगैरे हिंदुस्थानी यांनीं फितूर केला. हें सविस्तर दोन तीन विनंतिपत्रीं लिहिलें आहे, त्यावरून श्रुत जालेंच असेल. सांप्रत डिगेचे मुक्कामीं येऊन, कुटुंब वगैरे खटला[3] मार्गस्त ग्वाल्हेरीस करून सडे जाहलों. याउपरी शत्रूस घेराघेरी करून जेर करावें हाच इरादा आहे. ओढीमुळें[4] मोठा पेंच पडला आहे. बादशाहाचे नऊ महिने चढले[5] आहेत, त्यांचा तगादा. या समयीं बादशाहा बाहेर निघून आपलेजवळ आल्यास हातीं सर्व गोष्टी राहतील. बादशाहा बाहेर निघून आपलेजवळ न आल्यास

---

१ पाठपुरावा. २ हें अक्षर चुकून पडलें असावें. ३ परिवार. ४ अर्थात् पैशाची ओढ. ५ तैनात नेमणुकीची बाकी थकली.

सर्वांस राजकारणें करावयासी जागा आहे. बादशाहाही कायम मिजाज[1] नाहीं, लोभी, याकरितां त्याचे महिने तरी त्यास कसेंही करून पावते करावे, येविसीं सावकारांसीं बोलून जितका प्रयत्न करावयाचा तितका केला. परंतु सावकारांचीं मागील देणीं, त्यांचीच निर्गत[2] नाहीं यामुळें कोणी उभा राहात नाहीं. नाइलाज गोष्ट जाणून विनंती लिहिण्यांत येती. त्यास, बादशाहाचे नऊ महिने चढले. त्यांचे ऐवजाची तर्तूद सरकारांतून जरूर जाली पाहिजे. येविसीं राजश्री कृष्णाजी महादेव यांसीं बोलण्यांत आलें आहे. त्याप्रमाणें बुंदेले यांजवर वरात[3] होऊन आली पाहिजे. या गोष्टीनें उपयोग बहुत पडेल व आखबारेवरून[4] पेशजी[5] हिंदुस्थानास व बादशाहास सरकारांत आह्मांसी नीट नाहीं हें समजलें आहे. तें दूर होऊन, एक नाद[6] आहे, इकडे मसलत पडतांच[7] ऐवजाची तर्तूद करून पाठविली, फौजही रवाना केली, हें सर्वांस समजोन दबतील. इंग्रज वजीर आदिकरून हवा बिघडली आहे, यांत शिरूं पावणार नाहींत.[8] यास्तव वारंवार सेवेसीं विनंती लिहिण्यांत आली आहे. लिहिल्याप्रमाणें आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ एकनिश्चयी, करारी (मिजाज—स्वभाव). २ परतफेड. ३ सरकारी हुंडी किंवा मागणीपत्र. ४ परराष्ट्रीं ठेवलेल्या वकिलाकडून आलेलें बातमीपत्र. ५ पूर्वी. ६ ध्यास, धोरण, दोघेही एक धोरणानें चालतात असा भाव. ७ उत्तरेचें राजकारण उलटतांच दक्षिणेकडून मदत आली असा अर्थ. ८ हवा बिघडली......नाहींत.—फसलेल्या डावाची संधि साधून आपला हात शिरकावण्याचा यत्न करणार नाहींत.

# १८०. साताऱ्याप्रमाणें दिल्लीचें संस्थान जाहलें आहे

महादजी शिंदे यांचीं कागदपत्रें, नं० ५५५ | ६ जानेवारी १७८९

[ उत्तरेकडील रोहिले वगैरे शत्रूंचा नाश केल्यावर महादजी, नाना फडणवीसास उत्तरेची जबाबदारी घेण्यास अलिबहाद्दरास नेमावें व दक्षिणेंतून त्यास साह्य करावें असें सुचवीत आहे. ]

श्री

राजश्री बालाजीपंत नाना गोसावी यासीं :—

छ दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे विशेष :—सांप्रत आपणांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं, तरी सविस्तर इकडून वरच्यावरी पत्रें रवाना जाहलीं आहेत त्यांचीं उत्तरें यावीं. इकडील बंदोबस्ताचीं पैरवी[1] होळकर व अलीबहाद्दर यांसी पत्रें येऊन व्हावी. त्या उत्तराची प्रतीक्षा आजपर्यंत जाहली. सांप्रत रांगडयांची[2] नजर इकडे राहूं न द्यावें, चमेल[3] पार ठिकाणास घेऊन जाऊन, आपलें फडशा[4] करून घ्यावें हीच पाहिली. लोकांसी वायदेही बहुत होऊन गेले. सवड बोलण्याची कांहींच राहिली नाहीं. तेव्हां अलीबहाद्दरबाबा यांसी इकडील माहितगारी करून दिल्ही आहे. रोहिला शत्रु भारी होता. त्याचेंही पारपत्य जाहलें. जिवत धरून आणिला. खूळ मोडलें. याउपरी अलीबहाद्दरबाबा इकडील बंदोबस्त राखतील. सरकारांतून आपण अलीबहाद्दर यांची पुरवणी[5] पैक्यानें व फौजेनें करावी. इकडील मुलूक निर्वेध[6] जालाच आहे. एक वर्षानें पुढें इकडे फौजा राहतात त्याचे खर्चाचा सुभत्ता[7] इकडे पडेल.

---

१ व्यवस्था. २ गुजराथ व मेवाड यांमधील देशास रांगडा म्हणतात. तेथील राहणारा, सामान्यतः राजपूत. ३ चंबळा. ४ नाश. चंबळेपर्यंतची ठिकाणें घेऊन आम्हास इकडे राहूं देऊं नये. आमचा नाश करावा, असा अर्थ. ५ साह्य. ६ सुरक्षित. ७ सुबत्ता, पुरवठा.

सारांश, आम्ही लोकांपुढं आपलं स्वाधीन असें नाहीं.'[1] गेलेली मसलत[2] श्रीमंताचे प्रतापें सुधारली आहे. साताऱ्याप्रमाणें दिल्लीचें संस्थान जालें आहे. बंदोबस्ताची पैरवी करणें आपल्याकडे आहे. येविसीं वरचेवर पत्रें पाठविलीं आहेत, तीं पावोन तर्तूद[3] जाहलीच असेल. रा छ ९ रबिलाखर. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

---

# १८१. पेशव्यास वकील-इ-मुत्लकीचीं वस्त्रें

| | |
|---|---|
| पुणें रेसिडेन्सी पत्रव्यवहार (इंग्रजी) भा० १ ला,[4] पृ० ३७०, पत्र २६४ | शिंद्याची छावणी ११-८-१७९० |

[ इंग्रजाचा वकील कर्नल पामर शिंद्याचे छावणींत असे. त्यानें लॉर्ड कॉर्नवॉलीस यास लिहिलेल्या पत्रांतील उतारा. ]

आपले ता. २७ जुलैचें पत्र पावलें व त्याबरोबर महादजी शिंद्यानें आपणांस पाठविलेल्या पत्राचें उत्तर त्यास देण्याकरितां धाडलें होतें तेंही त्यास दिलें......

शिंद्यास बादशाहाकडून पेशव्याचे नांवानें कायमची वकील-इ-मुत्लकच्या जागेची सनद मिळाली व गेल्या ८ तारखेस त्यानें या संबंधीचा एक दरबार समारंभही करविला. त्याच्या आदले दिवशीं त्यानें मला सांगितलें कीं या समारंभाचे योगानें वझिराचे हक्क व दर्जा यांच्यावर कोणत्याही प्रकारें

---

१ आपले—लोकांचे (स्वाधीन) 'आम्हीं परस्वाधीन नाहीं' असा अर्थ. २ बिघडलेलें कारस्थान. ३ व्यवस्था. ४ **महादजी व उत्तरेकडील घडामोडी,** संपादक सर जदुनाथ सरकार, प्रकाशन वर्ष १९३६. यानंतर या पत्रव्यवहाराचे ९ भाग प्रसिद्ध झाले आहेत, आणखी होत आहेत.

गदा आणण्याचा आपला उद्देश नाहीं असें मी आपणांस व वझिरास कळवावें. त्यानें सांगितलें कीं, तो व पेशवा असे दोघेही त्यांचा मान राखीत जाऊं. या मानसमारंभाचा उद्देश एवढाच कीं, साम्राज्याचा कारभार त्या योगानें सुरळीत करणें त्यास अधिक सोपें जाईल.

शिंद्यानें मला याप्रमाणें सांगितल्यावर मीं म्हटलें गव्हर्नर जनरल व वझीर या उभयतांनीं इतके दिवस दिल्लीचे राजकारणांत आपल्या कारभारांत कोणत्याही प्रकारें ढवळाढवळ केली नाहीं व पेशव्याचे नांवानें दिल्या गेलेल्या वकील-इ-मुल्लकीसही हरकत घेतली नाहीं यावरून ते उभयतां ( गव्ह-र्नर जनरल व वझीर ) आपल्या नव्या अधिकारास कांहीं हरकत घेतीलसें मला वाटत नाहीं. दुसरें असें कीं, "बादशाह जर आपला कारभार करण्यास असमर्थ आहेत हें उघड दिसतें तर तो अधिकार गव्हर्नर जनरल व वझीर यांच्याशीं विरोधानें असणाऱ्या दुसऱ्या कुणाकडे जाण्यापेक्षां आपल्यासारख्या सर्वस्वीं हितैक्य असलेल्या त्यांच्या दोस्ताकडे ( शिंद्याकडे) गेलेला त्यांना खात्रीनें आवडेल."

नंतर शिंद्यानें मला सांगितलें कीं, पुण्याच्या दरबारीं टिपूला अनुकूल असलेल्या पक्षावर नाना फडणवीसांनीं मात केली आहे. या पुण्याहून आलेल्या बातमीनें शिंद्यास बराच आनंद झाल्याचें दिसलें.........

---

## १८२. शिंद्यांनीं दक्षिणेंत येऊं नये

---

**महादजी शिंदे यांचीं कागदपत्रें, नं० ६०२**      **डिसेंबर १७९१**

छ[1] पुरवणी सेवेसीं विज्ञापना ऐसीजे:—तुमचें येणें देशीं हें मनसुब्याचे[2] विचारें पहातां येणें देशीं जाल्यावरी तिकडील बंदोबस्त राहणार नाहीं. अनेक

---

१ पत्र महादजी शिंदे याचें पेशव्यास. २ मुत्सद्दीपणाचें राजकारण.

## महादजी शिंदे यांचें हस्ताक्षर

भारत-इतिहास-संशोधक-मंडळ पुणें.

न मया व आलफ विवेक करूनचि
ताचे समाधान करणे उ
दास न व्हावे बहुत काये लि
हिणे हे विनती

मोर्तब
सुद

प्रकारचे बखेडे उभे राहतील. फौजा ठेवून बंदोबस्त करून देशीं येऊं म्हट-ल्यास फौजाच राहून बंदोबस्त राहणार नाहीं. आजपर्यंत श्रम साहास केले. मुलख व कित्येक स्थळें मातबर घेऊन शत्रू पादाक्रांत करून पातशाहीचा बंदोबस्त केला, तो राहणार नाहीं. फिरोन श्रम पडतील. हिंदुस्थानियांचा इतबार[1] नाहीं, ही सर्व माहितगारी तुम्हांस आहे. याजकरितां तुमचें येणें मसलतीचें विचारें पाहतां चांगलें दिसत नाहीं म्हणोन पत्रीं आज्ञा. त्यास, इकडील बंदोबस्तास फौज व कंपूसुद्धां सरदार पोक्त[2] सरंजामानिसीं ठेविले आहेत. स्वामींचे पुण्यप्रतापेंकरून कोणी बखेडा करावा असी जुरत[3] राहूं दिल्ही नाहीं. स्वामींचे दर्शनास बहुत दिवस जाहले. एक दिवस चरण-दर्शन ही लालसा आहे, व देवाचाही उपद्रव[4] वारंवार होतो, याकरितां येणें जरूर जाणोन येत असों. सरदार इकडे आहेत. बंदोबस्त राखतील. इस्माइलबेगाचें खूळ थोडकेसें होतें. त्याचेंही पारपत्य राजश्री खंडेराव हरि यांणीं केलें. तोफा चोवीस त्यांच्या पाडाव आल्या. कानोडच्या किल्ल्याचे आसऱ्यास पळोन गेला, हें वर्तमान सेवेसीं पूर्वींच लिहिलें आहे. बाहेर मैदानांत येऊन लढाई करावी हे ताकद त्यांत राहिली नाहीं. मथुरेहून फौजा व कंपू कानोडास येऊन कानोडचे किल्ल्यांतच त्यास घेरून पारपत्य करतील. घरच्या फितुरानेंच इस्माइलबेग कानोडास गेला. परंतु स्वामींचें पुण्यप्रतापें त्याचें पारपत्य जाहलें. पुढें बाहेरील कोणी बखेडा करील असा दिसत नाहीं. घरचा फितूर झाल्यास न कळे[5]! सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ विश्वास, भरवंसा. २ भरपूर. ३ बिशाद, ताकद. ४ देवाचा उपद्रव, नवस फेडावयाचे वगैरे (?). ५ हें वाक्य किती कौशल्यानें व खोचकपणानें लिहिलें आहे. पेशव्यांकडून शिद्याचे साह्यास म्हणून गेलेले सरदार वारंवार त्याच्याशीं बखेडा करीत.

१७म०प०१०

# १८३. टिपूवर विजय

महादजी शिंदे यांचीं कागदपत्रें, नं० ६०५ | ३ एप्रिल १७९२

## महादजीकडून अभिनंदन

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसीं :—

छ विनंती सेवक महादजी शिंदे कृतानेक विज्ञापना.—स्वामींनीं कृपा करून पत्र छ २७ रजबचें पाठविलें तें पावोन संतोष जाहला. राजश्री हरि बल्लाळ व निजामअल्लीखानबहादूर याचे पुत्र पोलादजंग व इंग्रज मिळोन फौजसुद्धां पट्टणानजीक* तीन कोसांवर गेले. तेथून छ १३ जमादिलाखरीं रात्रीस इंग्रजांनीं सडीं पंधरा पलटणें तोफा खरीज घेऊन पुढें चालोन गेले. टिपूस खबर कळली. तोही तयार होता. इंग्रजांची व टिपूची लढाई सुरू जाहली तों दुसरा दिवस उगवला, प्रहर दिवस आला तोंपावेतों जहाली. दोहीकडील माणूस ठार व जखमी तीन हजार जाहले. प्रातःकाळीं लढाई होतच आहे, तो सरकारची व नबाबाकडीलही फौज जाऊन पोंहचली. टिपू माघारा हटून गेला. नंतर टिपूनें सलूखाचा पेगाम[1] लाविला. वकील पाठविले. त्यांसीं सरकार व नबाब व इंग्रज मिळोन बोलणें होऊन तहाचा जाबसाल[2] ठरला.† टिपूकडील मुलकापैकीं निमे मुलूक व तीन क्रोड रुपये तिन्ही सरकारांस द्यावे याप्रमाणें ठरोन, सदरहू जाबसालाचा फडशा होय तोंपावेतों टिपूचे दोघे पुत्र ओलीस ठेवावे असें ठरलें. त्याप्रमाणें दोघे पुत्र ओलीस आले येऊन भेटले. याप्रमाणें हरि बल्लाळ यांजकडून पत्रें आलीं. तुम्हांस कळावें याकरितां लिहिलें आहे म्हणोन पत्रीं आज्ञापिलें. ऐसियास[3], टिपू पैकेपूर[4], यामुळें

*श्रीरंगपट्टण. १ बोलणें. २ मसुदा. †७ फेब्रुवारी १७९२. ३ येथपर्यंत मूळ पत्र, ज्यास हें पत्र उत्तर आहे तें. ४ भरपूर पैसेवाला.

उन्माद होऊन अलीकडे अमर्याद वर्तणूक करूं लागला. त्यावरून त्याचे पारपत्याच्या विचार, सरकारांतून नबाब, इंग्रज यांच्या फौजा सरकार फौजेस सामील करून ठरला... ...टिपूचा सरंजाम जगी मातबर असतां व पट्टण त्याची रहावयाची जागा, कलब[1] तेथवर फौजा जाऊन लढाई केली पट्टणा-नजीकच्या बातेऱ्या[2] घेतल्या, आणि शत्रूस जेर केला. हा प्रताप एक स्वामींचाच... ...लिहून कळविणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

# १८४. गोविंदराव काळे यांचें नाना फडणीसास पत्र

इतिहाससंग्रह, व० १ लें,
अं० ३ रा, ऐतिहासिक टिपणें,
भा० १ ला, टिपण १३

२–७–१७९२

[ गोविंदराव काळे हा सवाई माधवरावाचे पेशवाईत निजामाचे दरबारीं पेशव्यांचा वकील होता. त्याला नाना, महादजी वगैरेंचे 'परस्परांतील संशय दूर झाल्याचें' कळल्यावर पेशवाईच्या वाढत्या वैभवाचें त्यानें पुढीलप्रमाणें अंतःकरणपूर्वक वर्णन केलें आहे. पत्रांत लिहिल्याप्रमाणें या वैभवास लौकरच दृष्ट लागावी असा योग होता ! पत्र पेशवाईतील मराठी गद्य वाङ्मयाचा एक उत्कृष्ट नमुना आहे. ]

....ऐशियास पत्र पाहतांच रोमांच उभे राहून अति संतोष जाला. याचा विस्तार पत्रीं किती लिहूं ? सीमा असे. यावरून ग्रंथांचे ग्रंथ मनांत आले. ते लिहिल्यानें बहुचकपणा[3] दिसतो. दिसो, परंतु जें मनांत आलें त्यांतून किंचित् अमर्याद[4] करून लिहितों. एक एक रक्कम[5] मनांत आणून दीर्घ

---

१ काळीज. २ बॅटरी, मोर्चे बांधलेल्या तोफा. ३ भोचकपणा, वाचाळता. ४ मर्यादा सोडून. ५ गोष्ट.

दृष्टीनें तोलून पाहिल्यास खरें आहे असेंच निघेल. तें काय? तपशील:— अटक नदीचे अलीकडे दक्षिण समुद्र पावेतों हिंदूंचें स्थान—तुरकस्थान[1] नव्हे —हे आपली हद्द पांडवांपासोन विक्रमाजितपावेतों त्यांनीं राखून उपभोग केला. त्यामागें राज्यकर्ते नादान निघाले. यवनांचें प्राबल्य जालें. चकत्यांनीं[2] हस्तनापूरचें पद घेतलें. शेवटीं आलमगिराचे कारकीर्दीत यज्ञोपवीतास साडे[3]-तीन रुपये जेजया[4] बसून, ओलें अन्न विकावें, सर्वांनीं ध्यावें, हें नौबत[5] गुजरली.

त्या दिवसांत कैलालवासी शिवाजीमहाराज शककर्ते व धर्मराखते निघाले. त्यांनीं किंचित् कोन्यांत[6] धर्मसंरक्षण केलें. पुढं कैलासवासी नानासाहेब, भाऊसाहेब प्रचंड प्रतापसूर्य असे जाले कीं, असें कधीं झालें नाहीं. अमुक ब्राह्मणांनीं राज्य केलें असें शास्त्रीं पुराणीं वर्णन नाहीं. परशुराम अवतारीं काय असेल तें असो. त्या गोष्टी यांस शिंदे-होळकर दोन बाजू होऊन प्राप्त जाल्या. हल्लीं श्रीमंतांचे पुण्यप्रतापेंकरून व राजश्री पाटीलबावांचे बुद्धि व तरवारेच्या पराक्रमेंकडून सर्व घरास आलें. परंतु जालें कसें? प्राप्त जालें तेणेंकडून सुलभता वाटली. अगर मुसलमान कोणी असे, तरी मोठं मोठे तवारीखनामे[7] आले असते. यवनाच्या जातींत तिळाइतकी चांगली गोष्ट जाल्यास गगनाबराबर करून शोभवावी; आमचे हिंदूत गगनाइतकी जाली असतां उच्चार न करावा हे चाल आहे. असो. अलभ्य गोष्टी घडल्या. उग्याच दौलती पुसत घरास आल्या. यांचें संरक्षण करणें परम कठिण! दोस्त दुश्मन फार. यवनांचे मनांत कीं काफरशाही[8] जाली हें बोलतात.

लेकीन[9] ज्यांनीं हिंदुस्थानांत शिरें उचललीं, त्यांचीं शिरें पाटीलबावांनीं फोडिलीं. कोणाच्याही मनांत हे वहाडले[10], तें शेवटास जाऊं नये. यास्तव, नाना स्वरूपें व युक्तींकडून नाश करावे ऐसे आहेत. न लाभाव्या त्या गोष्टी लाभल्या. त्यांचा बंदोबस्त शककर्त्याप्रमाणें होऊन उपभोग ध्यावे हें पुढेंच

---

१ मुसलमानांचा देश, यवनभूमि. २ झगताईखानाच्या वंशजांनीं, मोगलांनीं. ३ दर ब्राह्मणास. ४ जिझिया. ५ द्वाही फिरली. ६ देशाच्या लहानशा कोपऱ्यांत. ७ बखरी. ८ लबाड लोकांची बादशाही (काफर हा शब्द मुसलमान हे मुसलमानेतरांस केव्हां केव्हां तुच्छतेनें लावतात). ९ परंतु. १० वाढले.

आहे. कोठें पुण्याईत उणें पडेल आणि काय दृष्ट लागेल न कळे. झाल्या गोष्टी यांत केवळ मुलूख, राज्यप्राप्त, इतकेंच नाहीं, तरी वेदशास्त्ररक्षण, धर्मसंस्थापन, गोब्राह्मणप्रतिपालन, सार्वभौमत्व हातीं लागणें, कीर्ति, यश यांचे नगारे वाजणें, इतक्या गोष्टी आहेत. हे किमया[1] संभाळणें हक्क[2] आपला व पाटीलबावांचा! यांत वेत्यास[3] पडला की, दोस्त दुष्मन मवजूद.[4] संशय दूर जाले, हे अति चांगलें! अति चांगलें! या उपरी हे जमाव व या फौजा लाहोरच्या मैदानांत असाव्या. त्यांचे मनसबे[5] दौडावे[6], वेत्यास पडावे, तमाशे पहावे, असे जन जे आहेत ते उशापायथ्यास लागून आहेत. चैन नव्हते. आतां आपण लिहिल्यावरून स्वस्थ जालें. जितकें लिहिलें इतक्याचें उगेच मनन व्हावें. खरें कीं लटकें हें समजावें. रवाना छ ११ जिल्काद हे विनंती.

**अभ्यास**:—या लेखकाचें प्राचीन इतिहासाचें ज्ञान कितपत आहे? मराठी राज्य वाढविण्याचें ध्येय काय? यवन व हिंदु यांच्या स्वभावांत यानें कोणता भेद दर्शविला? यानें म्हटल्याप्रमाणें मराठी राज्यास कोणती दृष्ट लागली?

---

१ अद्भुत कृति. २ अधिकार. ३ व्यत्यय, अंतर. ४ मौजूद, भांडण्यास तयार. ५ मसलत, राजकारण. ६ पराभूत पावावें.

# १८५. नाना शिंदे वगैरेच्या आणाशपथा

पुणें रेसिडेन्सी पत्रव्यवहार भाग १ ला, पृ० ३९०, पत्र नं० २८३

फत्तेगड, २१ जुलै १७९३

कर्नल पामर—लॉर्ड कॉर्नवॉलिस

मला पुण्याहून विशेष ठिकाणाहून बातमी कळली कीं, महादजी, नाना फडणवीस, हरीपंत फडके यांची पूर्व संकेतानें पेशव्यासमक्ष नुकतीच मुलाखत झाली. त्या तिघांनीं पेशव्याच्या राज्यास पाठिंबा देण्यासाठीं आपले मतभेद मिटविण्याचें ठरविलें. तसेंच उत्तरेंत शिंद्याची सत्ता प्रस्थापित व्हावी, शिंदे व तुकोजी यांच्यामधील भांडणें मिटतीं घ्यावींत व नबाब निझाम-अलीखानावरील आपले हक्क उगवून घ्यावे यासंबंधींचेही करार झाले. ह्या करारांना पक्केपणा यावा म्हणून सर्वांनीं देवळांत जाऊन आणाशपथा घेतल्या.

हें वृत्त पुणें दरबारच्या पक्षोपपक्षांतील लोकांतून मिळविलें आहे. एकाद्या घडलेल्या सभेचा किंवा खलबताचा वृत्तांत असा नाहीं. पण असा मिळणें शक्य नाहीं व हा वृत्तांत बराच विश्वसनीय वाटला म्हणून आपणांस कळविला; कारण यापुढें पावसाळ्यानंतर पेशवे आदिकरून दक्षिण सत्ताधिशांच्या हालचाली कशा होत जातील त्याचा या बातमीचे आधारानें आपणास तर्क करतां येईल'… …

---

१ मूळ इंग्रजी.

# १८६. सवाई माधवराव : रंगाचा पोवाडा

ऐतिहासिक पोवाडे, संo श्रीoयoनoकेळकर, पृo १९८-२०१ | शo १७१४ फाल्गुन वo १४ ताo ४-३-१७९३

[ शाहीर प्रभाकर† ]

## ऐन पेशवाईतील रंगलेल्या पुण्याचें वर्णन

चाल—जय शिवलिंगा मस्तकीं गंगा पार्वतीला चोरून ठेविलें ।
ज्या गंगेनें जग उद्धरलें त्रैलोक्यामधि नाणवलें ।।
चाल दुसरी—भरजरी पैठणचें पातळ लफा घे टाचांची खबर ।। जसा रंग श्रीरंग खेळले वृंदावनि द्वापारांत । तसा रंग श्रीमंत खेळले कलियुगांत अति आदरांत ।। ध्रु० ।।

**धन्य धन्य धनि सवाई माधवराव प्रतापी अवतरले । कीर्त दिगंतरीं करून कुळांतील सर्व पुरुष पहा उद्धरले ।। एकापरीस एक मंत्रि धुरंधर बुद्धिबळें शहाणे ठरले । दौलतिचा उत्कर्ष दिसंदिस नाहिं दरिद्री कुणी उरले ।। शालिवाहन शक नर्मदेपावत जाऊन जाळ घोडे विरले । श्रीमंतांस करभार घेउन आले शरण रिपू पृथ्वीवरले ।।** (चाल) **।। महावीर महादजीबावा हूजरातीचे ।। आणुनि मरातब बाच्छाई वजिरातीचे ।। केले महोच्छाव खुब मोठ्या गजरातीचे ।।** (चाल) **।। तऱ्हे तऱ्हेचे ख्यालतमाशे बहुत होती दलभारांत । श्रीमंतांचा संकल्प हाच कीं रंग करावा शहरांत ।।१।।**

---

† जन्म इ. स. १७५३।५४ चा सुमार. मृत्यु इ. स. १८४३. केळकर प्रस्तावना पृ. ९४–९६ पहा. अति आदरांत–अतिशय हौसेनें. दिसंदिस–दिवसेंदिवस; उत्तरोत्तर. विरले–न्हाले. करभार–खंडणी. मरातब–मरातीब–बहुमान किंवा पदवी. खुब–खूप. गजरातीचे–कडाक्याचे. दळभार–सैन्यसमूह (शिंद्यांच्या सैन्यांत). ख्यालतमाशा–नाचरंग; चैन, विलास..... १

कल पाहुन मर्जिचा बरोबर रुकार पडला साऱ्यांचा । सिद्ध झाले संपूर्ण पुण्यामधें बेत अधिक कारभाऱ्यांचा ॥ मधें मुख्य अंबारि झळाळित मार्गे थाट अंबाऱ्यांचा । चंद्रबिंब श्रीमंत सभोंवतां प्रकाश पडला ताऱ्यांचा ॥ हौद हांडे पुढें पायदळांतरीं पाउस पडे पिचकाऱ्यांचा । धुमाधार अनिवार मार भर बंबांच्या फटकाऱ्यांचा ॥ (चाल) ॥ नरवीर श्रेष्ठ कुणी केवळ कृष्णार्जुन ॥ वर्णिती भाट यश कीर्ति सकल गर्जुन ॥ चालली स्वारि शनवार पेठ वर्जुन ॥ (चाल) ॥ घरोघरीं नारी झुरुझुरुक्यांतुन सजुन उभ्या श्रृंगारांत । गुलाल गर्दा पेल दुतर्फा रंग रिचविती बहरांत ॥२॥

सलाम मुजरे सर्व राहिले राव रंगाच्या छंदांत । हास्यवदन मन सदय शोभलें शूर शिपाईवृंदांत ॥ दोहों दोहों हातीं भरमुठीं दिल्हे छत लाल दिसे खुब बुंदांत । तक्तराव जिलेवंत नाचती सभांगना आनंदांत ॥ सुदिन दिवस तो प्रथम दिसाहुन शके सत्राशें चवदांत । परिधावी संवत्सरांत फाल्गुन वद्य चतुर्दशी धारांत ॥ (चाल) ॥ बाळाजि जनार्दन रंगामधें रंगले ॥ रंगाचे पाट रस्त्यांत वाहुं लागले । किती भरले गुलालें चौक ओटे बंगले ॥ (चाल) ॥ कुलदीपक जन्मले सगुणी गुणी महादजीबावा सुगरांत । पराक्रमी तलवारबहाद्दर मुगुटमणी सरदारांत ॥३॥

... ... ... ... ...

---

अधिक–श्रीमंताची मर्जी आणि सर्व लोकांची सिद्धता आणि त्यांत नाना फडणीसाची तरतूद इतका अर्थ 'अधिक' या शब्दांत आहे. धुमाधार–धो धो. बंब–वेळूची मोठी पिचकारी. वर्जुन–ओलांडून. झुरुझुरुका–खिडकी किंवा झरोका. गुलाल गर्दा–गर्द लाल कुसुंबी रंग. पेल–फैल; फेल, मारा. रंग रिचविती–रंग फेंकती; रंग खेळती. ... ... ... २

छंदांत–नादांत. दोन दोन हातांनीं मुठी भरून गुलाल दिला (फेंकला) त्यामुळें छत (छप्पराची आंतील बाजू) लाल बुंद दिसूं लागलें. बुंद–सुरेख, अतिशय. तक्तराव–गाड्यावरील फिरत्या चाकावर घातलेला नाचणाऱ्या कलावंतिणीचा ताफा. जिलेवंत–शोभिवंत. सभांगना–कलावंतिणी. प्रथम दिस–पाडवा. हा रंगाचा खेळ फाल्गुन व. १४ स झाला. रंगपंचमीस कांहीं कारणानें होऊं शकला नसेल. धारांत–पावसांत अर्थात् रंगाच्या. सुगरांत–सुगर–चतुर, कुशल. मुगुटमणी–श्रेष्ठ. ... ... ३

**· आधिच पुणें गुलजार तशामधें अपूर्व वसला आदितवार। त्यांत कृष्ण श्रीमंत आवंतर समस्त यादव परिवार ॥ हरिपंत तात्यांनीं उडविला रंग केशरी अनिवार। हास्यवदन राजेंद्रमुखावरि शेला लाविती वारंवार ॥ पाटिलबावानीं नेउन शिबीरा रंग केला जोरावार। वस्त्रें देउन किनखाब वांटिले ठाण कुणाला गजवार ॥ (चाल) ॥ उलटली स्वारी मग महिताबा लाउनी ॥ कुरनिसा करति जन वाड्यामधें जाउनी ॥ दाखवी पवाडा गंगु हैबती गाउनी ॥ (चाल) ॥ महादेव गुणिराज फेंकिती तान तनन दर-बारांत। प्रभाकराचें कवन पसरलें सहज शतावधि नगरांत ॥५॥**

**अभ्यास:**—आजच्या गणपतीच्या मिरवणुकीचें वर्णन करा. पोवाड्यांत वर्णिलेली मिरवणूक व आजची मिरवणूक यांत फरक काय ?

---

आदितवार ही पूर्वी श्रीमंतांची पेठ होती. आजही तिकडे सराफांचीं दुकानें आहेत. आवंतर—अवांतर; निराळे. यादव परिवार—शिद्यांचे लोक. राजेंद्र—अर्थात् सवाई माधवराव. त्याशिवाय, पाटिलबोवांनीं पेशव्यांना आपल्या शिबिरांत नेऊन आणखी जोरानें (जोरावार) रंग केला. वाटिलें ठाण कुणाला गजवार—कुणाला ठाणभर, कुणाला गजभर, कुणाला वारभर अशीं सणगें दिलीं. महिताबा—महताबा, चंद्रज्योती दारुकाम. कुरनिसा—मुजरा. शतावधि—शंभर पटीनें, शेंकडों मुखांनीं. (टीपा संपादकांच्या. थोडा फेर करून.) ... ... ... ... ... ५

# १८७. महादजीच्या मृत्युप्रकरणीं शोअरचा डायरक्टरर्सकडे खलिता

रेसिडेन्सी रेकॉर्डस, भाग १ ला, पत्र* नं. २८९ — कलकत्ता, ७ एप्रिल १७९४

... ... ...

शिंद्याच्या स्वभावाचें मुख्य लक्षण म्हणजे त्याचा महत्त्वाकांक्षीपणा. याच्या जोडीस धूर्तपणा, दीर्घोद्योग व निर्भयवृत्ति या गुणांनीं त्यास सर्वत्र यश आलें. थोडयाच वर्षांत गोहद, आग्रा, दिल्ली हे प्रांत, मीरतचा कांहीं भाग व दुआबांतील गुलाम कादरचीं ठाणीं हीं शिंद्यानें आपल्या राज्यास जोडलीं. जयपूर जोधपूरचे राजे त्यास खंडणी देऊं लागले. व नजफखानादि करून मोगल मुत्सद्यांनीं जें मुसलमानी वर्चस्व दिल्लीस पुनरुज्जीवित केलें होतें तें त्यानें कधीं युक्तीनें तर कधीं जबरदस्तीनें मोडून काढलें. वझीरास कंपनीचा पाठिंबा होता म्हणूनच काय तो वांचला.

... ... ...

महादजीच्या स्वभावाचें मी वर केलेलें चित्रण जर बरोबर असेल तर कंपनीला त्याच्या मृत्यूबद्दल वाईट वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. अनेक कारणांनीं त्याचे व कंपनीचे सलोख्याचे संबंध टिकून राहिले होते. एकतर आपण त्याच्या दिल्लीच्या भानगडींत पडणार नाहीं हें त्यास पक्कें माहीत होतें. आपल्या शब्दावर त्याचा पूर्ण भरंवसा होता. व आपल्या मैत्रीमुळें त्याला पुणें दरबारीं, व उत्तरेकडील सत्ताधीशांमध्यें दबदबा बसविण्यास त्यास मदत होई हेंही त्यास कळून चुकलें होतें.

---

* मूळ इंग्रजी.

पण महत्त्वाकांक्षा मैत्री जाणत नाहीं. कदाचित् याच महत्त्वाकांक्षेच्या पूर्ततेसाठीं त्यानें इंग्रजांची मैत्री तोडलीही नसती पण प्रसंग पडला तर या मैत्रीला तो गुप्तपणें सुरुंग लावण्यास कचरला नसता. नुकतीच निजामाच्या हातून पुण्याकडील जी खरीखोटी बातमी आली आहे त्यावरून शिंद्यानें मृत्यूपूर्वी काढलेले उद्गार कळतात. त्या उद्गारांचा मतितार्थ मी त्याच्या स्वभावाबद्दल केलेल्या विधानांशीं एकंदरीनें विसंगत नाहीं.

निजामाच्या प्रधानाला महादजीच्या मृत्युबद्दल फार दुःख झाल्याचा त्यानें बहाणा केला असला तरी निजामला शिंद्याच्या मृत्यूबद्दल वाईट वाटण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. शिंद्यानें त्याच्या मार्फत पुणें दरबारचे आपले हेतु उगवून घेतले. तसेंच निजामानें, कां कुणास ठाऊक पण, शिंद्यास वेळोवेळीं मोठमोठया रकमांचा भरणा केला. यामुळें शिंद्याची भूक मात्र खवळून त्यानें दिल्लीच्या बादशाहाच्या नांवानें त्याजकडे आणखी मोठ्या रकमेची मागणी केली. या रकमा, निजाम समजे आपण शिंद्यास कर्जवारी दिल्या व शिंदा समजे, कीं निजामाला दक्षिणेंत निर्वेधपणा मिळावा म्हणून दिल्लीपतीच्या नांवें आपण वसूल करीत आहोंत. असा प्रकार उभयतांमध्यें शिंद्याच्या हयातींत चालू होता. पण शिंद्याच्या मृत्यूनंतरही निजामानें दौलतरावाकडे पैसे रवाना केले तें कोणत्या उद्देशानें ते कांहीं कळत नाहीं.

... ... ...

आपले दिल्लीच्या बादशाहाशीं संबंध नुसते औपचारिक स्वरूपाचे आहेत. गेल्या कित्येक वर्षांत बादशाहाला आपण आपल्या कारभारांत हात घालूं दिला नाहीं, तेंच धोरण पुढें चालेल. पण असें असलें तरी इंग्रजी सत्ता बाल्यावस्थेंत असतां आपण बादशाहाशीं जसें आदरार्थी बोलत चालत होतों तसेंच पुढेंही चालूं. बिचाऱ्या दुर्दैवी बादशाहाच्या मनाला आणखी दुखवावें असें मला वाटत नाहीं.

... ... ...

---

# १८८. हरिपंत फडके यांचा मृत्यु

इतिहाससंग्रह वर्ष १ लें अं० ४ था, ऐतिहासिक टिपणें नं० १७, ले० २, पृ० २४ | रविवार २२ जून १७९४

[ हें पत्र हरिपंतांच्या वडील चिरंजीवांचें म्हणजे बाबा फडके ह्यांचें नाना फडणीसांस लिहिलेलें आहे ]

" स्वामींचे सेवेसी विज्ञापना :—स्वामींनीं चद्र २२ जिल्कादचें आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. त्यांत वडील कैलासवासी जाले; मरणापूर्वीं दोन घटका माझें[1] नांव घेऊन स्मरण केलें; त्यावरून फार श्रम चित्तास वाटले. ते ईश्वर जाणे! त्यांचा ऋणानुबंध माझे मनास ठाऊक! याचें उत्तर ल्याहावयास लेखणी चालेना! होणार चुकत नाहीं. 'विवेक करावा' ह्मणोन आज्ञा. त्यास स्वामींनीं आज्ञा केली ते प्रमाण. तसाच ऋणानुबंध स्वामीचा त्यांचा होता. तेव्हां लेखणी कशी चालेल? विवेक करण्याविषयीं आज्ञा. त्यास वडिलांचे ठायीं आतां स्वामी. आज्ञापत्र आलें हे वडिलांचें असेंच मनास वाटलें. सर्वप्रकारें स्वामी आहेत. आम्हांस काळजी काय आहे? आज्ञेप्रमाणें विवेक करितों. सर्व भार स्वामींवर. स्वामींनीं चित्ताचें शांतवन करावें अशी विनंती कोणीं करावी? स्वामी सर्वज्ञ आहेत. विवेक मनास करून सांभाळ करणें हें स्वामींकडे आहे. विशेष विनंती काय लिहूं? रवाना रविवार चार घटका रात्र अवशींची सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

---

१ अर्थात् नाना फडणविसाचें.

# १८९. अहिल्याबाईची कार्यनिष्ठा व धर्मनिष्ठा

**इतिहाससंग्रह वर्ष ३ रें, मे जून जुल १९११ महेश्वर* दरबारचीं बातमीपत्रें ले० २७३, पृ० २६४** — ६ फेब्रुआरी १७९५

श्री

" सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि॥' केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १५ माहे रजब भृगुवासर† प्रातः-कालपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष :—येथील वर्तमान काल डांकेबरोबर विनतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केली आहेत. त्यानतर इकडील वर्तमान, सरकारी लाखोटा एक, मुजरद[२] काशीद[३] जोडीबराबर रवाना जाला, छ ८ रजबीं. तो येथें छ १३ माहे मीनहूस मागील चार घटका दिवस राहतां पोहोंचला. गंगाजळ निर्मळ मातुश्री अहिल्याबाई यांचे नांवाचा लाखोटा होता. पावतांच क्षणीं जाऊन, वर्तमान कानावर घातलें. सायंकाळचें स्नान करून जपांत होती. खुणेंकरून सांगितलें कीं, भोजनोत्तर पत्रें श्रवण करीन. ते दिवशीं ग्रहणाची कर होती. स्नानें करून, दानें करून श्रमली होती. दिवसभर उपोषण. रात्रीस भोजन जाल्यानंतर कांहीं कचेरी जाली होती, ती बरखास करून, बिछान्यावर एकलीच बसून, कारभारीयापैकीं राजश्री विनायक बाजीराव व बाळाजी कृष्ण यांस बोलावून, त्यांजकडून पत्रें अक्षरशा श्रवण केलीं. सरकारचें पत्र एक व नबाबकडील वकिलाचे पत्राची नकल एक होती. मजकूर, प्रेमसुक जोहरी याचा होता. तो ध्यानास आणून, सरकार आज्ञेप्रमाणें तेच क्षणीं, सवाप्रहररात्रपर्यंत बसून, जागां जांगां घांटनाकें[४] येथील कमाविस-

---

*अहिल्याबाईनें केलेली होळकरांची राजधानी. येथून पुण्यास गेलेलीं पत्रें इतिहाससंग्रहांत प्रसिद्ध झालीं आहेत. १ निसबत, मार्फत. †शुक्रवार. २ तांतडीचा. ३ जासूद. ४ विंध्यपर्वतांतील घाटमार्ग, व नर्मदेचे उतार मुख्यत्वें होळकरांच्या मुलुखांत असत. त्यांचें रक्षण करून पेशव्यांच्या सैन्याची सुरक्षित ये-जा होण्याची जबाबदारी होळकरांकडे असे.

दार यांस पत्रें लिहून रवाना केलीं, व आसपासचे जवळ होते त्यांस समक्ष बोलावून ताकीद करून, बंदोबस्त करविला. दक्षण उत्तर पहाडाचे घांट, व नाके, चोरवाटा व उभय रेवातीर[1] येथील नांव घांट पायउताराचे तर[2] नेमावरपर्यंत, यांजकडील जिल्ह्यांतील झाडून बंदोबस्त करविला. राजश्री रघुनाथपंत यांस ब्र्हाणपुर येथें पत्रें पाठविलीं...येथील कमाविसदार यांस व जमीदार भूमे[3] वगैरे यांस ताकीदी सांगून पाठवून, नंतर सवाप्रहररात्रीस निद्रा केली. प्रत्योत्तराविशीं विनति काल केली. त्यावरून सरकारचे पत्राचें उत्तर रात्रीस लिहून दिल्हे; तें आज सेवेसीं रवाना केलें आहे. सरकारांतून हुजरे व कासीदज़ोडी नेपाळचे कामगिरीस[4] रवाना केले; ते येथें पोंहचून, त्यांच्या मार्गाचा बंदोबस्त करून देऊन, छ ५ रजबीं कूच करून पुढें गेले. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## १९०. खड्र्याची स्वारी

---

ऐतिहासिक लेखसंग्रह,<br>भा० ९ वा, नं० ३६१७ — ९ मे १७९५

लक्ष्मण आपाजी भिडे यांजकडून बाळासाहेबांस पत्र:—

"छ० १९ साबानीं नबाब निजामअल्लीखान याची लढाई दोनचार दिवसापासून सायंकाळपर्यंत मातबरच जाली. त्यांजकडील सरदार मातब्बर ठार, कांहीं जखमी जाहले. इकडील सरदार जखमी व भले लोक जखमी, कांहीं ठार, फारच जाहले. ते दिवशीं सायंकाळपासून एक प्रहर रात्रपर्यंत

---

१ नर्मदातीर. २ होडी. ३ स्थायिक रहिवाशी. ४ नेपाळांत कसली कामगिरी? शोध केला पाहिजे.

शिंद्यांकडील जिउबादादा यानीं तोफांची मारगिरी भारी केली तेव्हां जेर जाला. नंतर पहाटेचे प्रहर रात्रीस कूच करून खर्ड्याचे किल्ल्यांत पळून गेला. तळावर दारूगोळा, तोफा तशाच राहिल्या. सरकारांत झाडून आणल्या. बाजारबुनगें पेंढारी यानीं लुटून नेलें. त्यांजकडील तसनस' बहूत जाहला. श्रीमंतांचा पुण्यप्रताप थोर. एक लढाई होतांच जेर होऊन सल्ल्याचें बोलणें लाविलें! प्रथम बोलावयासीं गोविंदराव काळे वकील एक दोन वेळां येऊन गेले. नंतर राव रंभा निंबाळकर येऊन बोलोन गेले. तिसरे खेपेस त्यांचे दिवाण मशीर-उल्मुलूक आले ते आघाडीवर आले. श्री॥ रा॥ नाना फडणीस पाऊण कोस सामोरे गेले होते.....मशीराचा चेहरा अगदीं उतरला आहे. श्रीमंतांचे प्रतापें मशीर पादाक्रांत आहे. नबाब खर्ड्याचे मुक्कामीं दाणावैरण पाण्यावांचून फार जेर आला होता. त्याचे लष्करांत धारण एक रुपयास दोन शेर धान्य; पाणी बारा रुपयानीं पखाल[2] एक. वैरण अगदींच मिळत नव्हती. याच मुक्कामीं आपले पेंढारी यानीं सरकारांत हत्ती एक पाडाव करून आणून दिला. हल्लीं नबाबाचा मुक्काम पारगांव येथें आहे. वकील बोलावयास गेले आहेत. नबाबाची चिठ्ठी बाबा फडके यांस आली त्यांतील मजकूर कीं 'आपण कूच करून पुढें येऊं नये. तुमचे करारप्रमाणें जाबसाल[3] उरकोन पुढें जाईल.' दाणा-वैरणीमुळें कूच करून दोन मजली अलीकडेस आला आहे. रवाना १९ रमजान खमस तिसैन."

---

१ नासाडी, धूळदाण. २ बैलाच्या पाठीवर पाणी वाहण्याची कातडी पिशवी. ३ कराराचीं उत्तरप्रत्युत्तरें.

# १९१. खर्ड्याचा तह

ऐतिहासिक पत्रव्यवहार, ले. ३१४ | शके १७१७ वै० शु० २ २१-४-१७९५

## तहाचीं कलमें

१. मुलूख हिंदुस्थान व दक्षिण हिंदुस्थानचे पादशहाचे तात्रे[1] आहेत. पादशाही बंदोबस्त त्याचे अखत्यार[2] त्याचे तात्रे दक्षण तालुका जो पादशाही कायदा आहे व तेथून जो अहकाम[3] पोहोंचेल त्याची मुताबत[4] असावी.

दक्षिणेंत बिलकुल गोवध न करावा. मुसलमानीचा जो धर्म निमाज, रोजा,[5] बांगसलबात,[6] इकारानें[7] खुदापस्ती[8] करावी.

१. हिंदुमुसलमान ईश्वराचे घरची, दोन्ही धर्म चालत असतां मुसलमानानें हिंदूचे जाग्यास उपद्रव करावा, हे बेमुनसफी[9] व हिंदूनें आजतागाईत मुसलमानीचे जागे पीर पैगंबर यांसी दुसरी गोष्ट समजण्यांत आणिली नाहीं. तेव्हां मुसलमानानें हिंदूचे धर्मास खलश[10] करूं नये. आपले चालीनें धर्मावरी कायम असावें परस्परें मुजाहीम[11] नसावें.

१. शाहाजादे पादशाही दक्षिणेंत आले त्याचा खर्च येथून निभतो, त्याची जायदाद[12] व मकान[13] नबाबांनीं द्यावी......

[ याखेरीज मीररुकनुद्यौले यांस नोकरींतून काढावें वगैरे आणखीही कलमें आहेत. ]

---

१ अंमल. २ अधिकार. ३ हुकूम. ४ बजावणी; बादशाहाचे नांवें येईल तो हुकूम बजवावा. ५ उपवास. ६ बांग-प्रार्थनेसाठीं हांक मारण्याची आरोळी (सलबात-सलवात-प्रार्थना). ७ इकरान (?) इकरम, इक्रम-दान. ८ 'खुदापरस्ती' पाहिजे, ईश्वराची पूजा. ९ अन्याय्य. १० खंड, अंतर. ११ अडथळा, प्रतिबंध. १२ सैन्याच्या खर्चास लावून दिलेली जहागीर; सैन्याचा खर्च. १३ घर, राहण्याची व्यवस्था.

# १९२. सवाई माधवरावाचा मृत्यु

| | |
|---|---|
| **राजवाडे, खं० ५ वा, लेखांक २४१ शेवटचा कागद*** | **मृत्यु ता० २७-१०-९५ सायं० ७ वा०** |

'द्वादशीचे दिवशीं श्रीमंतांस ज्वरांशांत वायु झाला होता. प्रातःकाळीं गणपतीचे दिवाणखान्यावर रंगमहाल आहे, तेथें निद्रेचें स्थान, तेथें गेले. पलंगावर बसले होते. वायूचे भिरडींत[१] काय मनास वाटलें न कळे, पलंगावरून उठून दक्षिणेकडील खिडकींत उभे राहिले. खिजमतगार यानें शालेस हात लाविला कीं, येथें उभें राहणें ठीक नाहीं. तों एकाएकींच तेथून उडी टाकिली. खालीं दोड भाला खोल कारंजी हौद आहे, तेथें कांठावर पडून आंत पडले. उजवी मांडी मोडून हाड बाहेर निघालें. दांताची कवळी पडली. नाकावाटे रक्त निघालें. तेथून उचलून नानांनीं ऐने[२] महालांत नेलें. तबीब[३] आणून हाड बसवून, टाके देऊन शेक केला. चहूं घटकेनंतर शुद्धीवर येऊन डोळे उघडले. वायूचा प्रकोप[४] होताच. कांहीं सावध होऊन बोलत, कांहीं वेळ भ्रंश होऊन बोलत. आश्विन शुद्ध १४ सात घटकांनंतर पौर्णिमा मंगळवार, ते दिवशीं प्रथम घटका रात्रीं कैलासवासी जाले, म्हणोन बाळाजी रघुनाथ व केशवराव कोंडाजी यांचें पत्र मुक्काम हैदराबाद येथें आलें.'

---

*पत्र गोविंदराव काळे यानें लिहिलें आहे. खेरीज रेसिडेन्सी प. व्य., व्हॉ. दुसरा, पृष्ठ ३९१, लेखांक २६४ पहा. आत्महत्या केली हें इंग्रजी रेकॉर्डवरून खरें नाहीं. १ लिरिमिरी, आवेश. २ आरसे. ३ हकीम, वैद्य. ४ जोर.

# १९३. पेशव्याचा मृत्यु व ब्रिटिशांचें राजकारण

पू०रे०प०व्य०भा०२ रा, नं०२७१ पूना अफेअर्स, १७८६–९७ मॅलेटची वकिलात

फत्तेगड २८–११–९५

पामर–मॅलेट

पेशव्याच्या आकस्मिक मृत्यूची बातमी जामगांवाहून माझ्या डाकेनें १० दिवसांत मजकडे आली. या बातमीचें आश्चर्य तर खरेंच, पण त्याच्या मृत्यूनंतर कारभाऱ्यांनीं जवळच्या नातलगास गादीवर बसविण्याविषयीं जी हो ना चालविली तिचें आश्चर्य त्याहूनही अधिक. आतां एक बाजीराव मार्गांतून निघाला पाहिजे, नाहीं तर नानांचा तरी पाडाव होणार हें मी निश्चित सांगतों.

या भानगडींतून ब्राह्मणी व राजपूत ( मराठे ) प्रमुखांत भांडण उत्पन्न होईल. जर राजपूत प्रमुखावर ब्राह्मण सल्लागारांचें वजन पडलें तर मात्र तें टळूं शकेल. या घालमेलींत कोण पुढें येतो त्यावर हिंदुस्थानांतील आपल्या सत्तेचें भवितव्य अवलंबून आहे. या सर्वांची चढाओढ चांगली रंगली तर परकीय सत्ताधीशांना तिचा अनुकूल-प्रतिकूल निंकाल करण्याबाबत आपला भाग उचलावा लागेल. अशा वेळीं त्रयस्थपणें मजा पाहात राहणें हें आपल्या दृष्टीनें सुरक्षित वा मुत्सद्दीपणाचें होणार नाहीं. पण तुम्ही तेथें आहांत, तेव्हां या बाबतींत तुमचा शब्द अधिक प्रमाण.

आपल्या ( कंपनी ) सरकारनें निःपक्षपातीपणाच्या दृष्टीनें पुणें व्यवहारांत हात घालण्याचें ठरविलें तर तुम्ही मराठी राज्यांतील घालमेलीचा शेवट करण्यांत किती महत्त्वाची कामगिरी करूं शकाल. असें झाल्यास मला मोठा आनंद होईल.

पेशव्याच्या मृत्यूनें इकडील मराठे दरबारांत थोडी गडबड उडाली आहे. बंदोबस्त अधिक कडक झाला आहे. दौलतरावास आतां दक्षिणेंत अधिक दिवस राहावें लागेल यामुळें राजपूत राजे चळवळ करूं लागतील. खंडणी

देण्याचे थांबतील. अजून कांहीं गडबड उडाली नाहीं. पण पुण्याकडील एक एक बातमी येईल तसतशी गडबड उडेलच.

मराठयांना यापुढें नर्मदा ते यमुना या प्रदेशांत कितपत अंमल चालवितां येईल याची मला शंकाच आहे. अनेक अडथळे उत्पन्न होणार व ते निवारणें त्यांना जिकीरीचें होईल. आणि आपल्या हिताच्या व सुरक्षिततेच्या दृष्टीनें जेव्हां जरूर तेव्हां एक एक भानगडी उभ्या करणें हें आपल्या हातांत आहे.

... ... ...

डिबॉईन सेवानिवृत्त व्हावें म्हणतो पण तो दर वेळीं ही गोष्ट लांबणीवर टाकीत आहे. त्याला खरोखरी सेवानिवृत्त व्हावयाचें आहे कीं नाहीं याची मला शंका आहे. तो गेला तर शिंदे सरकारची लष्करी सत्ता व वर्चस्व बरेंच कमी होईल कारण त्या लष्करांत पूर्वीइतका जोर राहणार नाहीं.

---

# १९४. बारा बलुत्यांत सुतार श्रेष्ठ

पे० द० भा० ४३, नं० २७ } { १७९५ पूर्वी

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

परशराम रामचंद्र स्वामी गोसावी यांसी:—

पो॑[1] माधवराव नारायण प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणें विशेष. समस्त सुतारांचा बारा बलुत्यामध्यें वडीलपणाचा मानपान सुदामत[2] चाल(त) असतां कोठे कोठे नवीन दिकत[3]

---

१ पोष्य. २ बिनतक्रार. ३ हरकत.

करितात ती करूं नये. सुदामत बारा बलुत्यामध्यें सुतारांचे वडीलपण चालत आल्याप्रों चालवावयाचा करार करून देऊन नजरेचा[1] ऐवज सुतार वगैरे ज्ञात खूम[2] तीन यांजपासून सरकारांत घ्यावयाचा करार केला. त्यास तुम्हाकडील सरकार कमाविसीचे माहाल व फुटगावदेखील[3] दुमाले[4] येथील कमाल बेरजेवर दर सद्दे[5]

१ सुतार बलुत्यांत श्रेष्ट सा[6]
·।।· लोहार
·।।· परीट
२

येकूण दोन रुो[7] प्रों[8] सरकारांत घ्यावयाचा करार करून हे सनद सादर केली असे. तरी सदरहूप्रों तिही खुमापासून ऐवज वसूल घेऊन शंकराजी बली खिजमतगार हुजूरून पाठविला आहे याचे मारफातीने[9] ऐवज सरकारांत पावता करणें.

---

# १९५. बाजीरावांकडून पटवर्धनांची पायधरणी

ऐतिहासिक लेखसंग्रह, भा० ९ वा, नं० ३६८३ } { २६–२–१७९६

श्री

विज्ञापना. राजश्री बाजीराव साहेब यांची व श्री।। राजश्री भाऊसाहेब यांची बैठक एकांतीं दोघांचीच जाली. त्या बैठकेंत भाऊसाहेब यांच्या पायांवरी

---

१ नजर म्हणून घ्यावयाची रक्कम. २ जात (ज्ञात म्हणजे जात; अर्थात् खूम हा शब्द (आरबी कौम पासून) जात या अर्थी आहे. सुतार, लोहार, परीट या तीन जाती.). ३ सुद्धां, सह. ४ जेथें सरकारी वसुलाचा अंश स्वत:साठीं राखून ठेवण्याचा हक्क कोणास दिला जातो तीं गांवें दुमाले गांवें म्हणतात. ५ सदे, शेंकडा. ६ समजून. ७ रुपये. ८ प्रमाणें. ९ मार्फतीनें, तर्फेनें.

डोकी ठेऊन पदर पसरून अंजुळीपुट[1] जोडून विनंती केली जे, "मागील द्वेष तुम्हीं मनांत आणूं नये. मी आणणार नाहीं. वडिलांच्या जागां मला आपण मान्य. हाच मनोदय माझा शपथपुरस्कर आहे. धाकट्यास[2] दौलतेवरी बसवावें आणि मीं बंदींत रहावें हें आपल्या विचारास येतें कीं काय?" या-अन्वयें बहुत ग्लानतेचीं बोलणीं बोलून अश्रुपात गळूं लागले. तेव्हां त्याहीपेक्षां विशेषात्कारें भाऊसाहेबीं विनंती केली जे, "स्वामी म्हणतात त्यास कबूल आहों. परंतु या गोष्टीचा इतल्ला[3] नानास देऊन स्वामींस घेऊन जातों." त्याजवरून गोविंदराव यांस पाठविलें होतें. पत्राचें मनन होऊन विसर्जन[4] व्हावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

**अभ्यास** :—या पत्रावरून बाजीरावाच्या स्वभावासंबंधीं तर्क करा.

---

# १९६. श्रीमंतांस विश्वास शिंद्यांचा

| | |
|---|---|
| ऐ० ले० सं० भा० ९, नं० ३७३७ | २७–३–१७९६ |

[बाजीराव व दौलतराव शिंदे यांची ही भेट झाली तेव्हां बाजीराव २१ वर्षांचा व दौलतराव अवघा १६ वर्षांचा होता.]

सेवेसीं बळवंत[5] लक्ष्मण. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत. छ० १७ रमजान स्वामींचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष इकडील वर्तमान :—

१ हाताची ओंजळ. २ चिमाजी. ३ खबर, बातमी. ४ पत्र फाडून टाकावें. ५ उपनांव लेले, हा कुरुंदवाडकरांचा कारकून; त्याचें हें मिरजेस बाळासाहेबांस पत्र.

१ फाल्गुन व॥ प्रतिपदा गुरुवारीं श्रीमंतांच्या व शिंद्यांच्या भेटी जाहल्या. समारंभ अपूर्व जाहला. मोत्यांची माळ व फुलांचा तुरा श्रीमंतांनीं शिंद्यांस भेटीनंतर दिला. मर्जी बहुत प्रसन्न जाहली. "आपली श्री एतन्मूलक[1]," असा भाव दर्शविला. व बोलण्यांतही समय विशेषीं येतें, "मला पेशवाई शिंद्यांनीं दिली. त्यांची सर्फराजी[2] सर्वात्मना करावयाची. त्यांस अंतर द्याव-याचें नाहीं." असें प्रसन्नतेनें बोलत असतात. भेटी होऊन शिंदे गोटास गेले. दोन घटकांपर्यंत तोफांची सरबत्ती होत होती. श्रीमंत डेऱ्यास आले. रात्रौ अपररात्रीस[3] वाड्यांत यावयाचा निश्चय होऊन समारंभेंकरून वाड्यांत आले. कलम

... ... ...

१ मुख्य चित्रगुप्त[4] पुरंदरास जाऊन साताऱ्यास गेले. त्यांचें व शिंद्यांचें सख्यत्व करावें, अगोदर स्वच्छता करून मग साताऱ्यास स्वारी पोहोंचावी, असा आशय दिसतो. प्रस्तुत मनसबा उभयतांच्या सख्याचाच उपस्थित आहे. काय होतें पहावें. कलम

... ... ...

येणेंप्रमाणें वर्तमान आहे. सारांश आजच्या प्रसंगीं शिंद्यांपेक्षां दुसरे कांहीं थोर श्रीमंतांस नाहीं असा लौकिक आहे. वरकड सविस्तर स्वामीस विदित होतच आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ माझें वैभव आपल्यामुळेंच. २ बढती; प्रशंसा. ३ रात्रीचा दुसरा भाग, उत्तररात्र. वाड्यांत प्रथम प्रवेशास मुहूर्त हवा म्हणून. ४ नाना.

# १९७. बाजीरावाची इंग्रज वकिलाशीं गुप्त भेट

पु० रे० प० व्य० भा० २ रा
पूना अफेअर्स, पत्र नं० ३४७

२०–१–१७९७

[ मॅलेटचा विश्वासू हस्तक मीर फकरुद्दीन हा ता. २०–१–१७९७ रोजीं बाजीरावास गुप्तपणें भेटला त्याचा मॅलेटला रिपोर्ट. ]

' पेशवा एकटा असतां त्यास तुमचा निरोप वगैरे कळविला, त्यावर त्यानें उत्तर दिलें कीं—

' आतां येथें कोणी नाहीं त्या अर्थीं मी काय बोलतों तें कुणास कळतां कामा नये याबद्दल सावधगिरी राखा. कंपनी सरकार व माझे वडील यांच्या मैत्रीबद्दल खातरजमेची जरूरी नाहीं, कारण माझे वडील कंपनी सरकारकडे दोन वर्षें राहिले आहेत, तसेंच मि. मॅलेट यांनीं कँबे ( खंबायत ) येथें माझे वडिलास कसें साहय केलें याचीही मला आठवण आहे. रत्नें जवाहिराबाबत जें बोलावयाचें तें तुम्ही नानांच्या मनुष्याबरोबर याल तेव्हां बोलेन. '

यानंतर मी आणखी... *या प्रश्नांचीं उत्तरें देण्याची विनंती केली असतां तो म्हणाला ' प्रथम तुम्ही माझ्या एका विश्वासाच्या इसमाला सी. डब्ल्यू. एम्. ( मॅलेट ) ला नेऊन भेटवा. त्याच्या तर्फे मला जर मॅलेटचा निरोप कळेल कीं मी तुमच्याशीं विश्वासानें बोलण्यास हरकत नाहीं, तर मी मला काय बोलावयाचें तें तुम्हाशीं बोलेन. ' यावर मी म्हटलें ' तुमचा कोण विश्वासाचा मनुष्य तो दाखवा ' त्यावर त्यानें थोडया अंतरावर असलेल्या आबा काळे यांजकडे बोट दाखविलें व त्याला मजबरोबर घेऊन जाण्यास सांगितलें. व लगेच त्याला बोलावूनही सांगितलें कीं ' तूं जातोस हें कुणासही सांगू नकोस; अगदीं अमृतरावास सुद्धां. ' नंतर मजकडे वळून म्हणाला ' हे पहा, याला तुम्ही मॅलेट साहेबास रात्रींच भेटवा. ' पण यावर आबा काळे यानें सांगितलें कीं ' मला वारंवार डॉक्टरकडे जावें लागतेंच तेव्हां मला दिवसा जाण्यास

*पत्रांत मुद्दा लिहून होणारी वाच्यता टाळावी म्हणून कांहीं न लिहितां जागा सोडली आहे.

कांहीं हरकत नाहीं.' हें ऐकून पेशव्यानें त्याला उद्यां तिकडे ( मॅलेटकडे दिवसा ) जावयास सांगून मलाही निरोप दिला.

---

## १९८. पटवर्धनांचे इसमांचा छळ

ऐ० ले० सं० भा० १०, नं० ३९२९ } { ९-३-१७९७

श्रीगणराज

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेसीं—

अपत्यें विठोबानें दोनी कर जोडून शिरसाष्टांग नमस्कार. विज्ञापना...... इकडील वर्तमान तर अधिक उत्तर लिहावेंसें नाहीं. मागाहून मकदूमजी सांडणी स्वार याजबरोबर सविस्तर लिहून पाठवितों. हरि[1] विष्णु यांस सरकारचे वाड्यांत नेऊन कोरड्यांचा मार दिला. पन्नास कोरडा मारिला. आणि पाठींतून रक्तें फार निघालीं. आणि कानास चाप लाविला. एक कान तुटला. दोन्ही हातांचे बोटांस चाप लाविले. बोटांचेही तुकडे पडले म्हणोन बाजार आवाई आहे. मार दिल्यानंतर बाजारांतून गल्लोगल्ली फिरविलें. आणि मोठे हाल केले. कळावें. इतका आग्रह मार द्यावयाचा श्रीमंत अप्पासाहेब[2] यांचा पडला म्हणोन ऐकतो. खरें लटिकें न कळे. कळावें करितां लिहिलें आहे. श्रीईच्छा प्रमाण कळावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ हरि विष्णु सहस्रबुद्धे हा परशुराम भाऊंचा कारकून. यशोदाबाईच्या मांडीवर चिमाजी आप्पास बसविण्याची मसलत ठरवून भाऊंनीं त्यांस थेऊराहून पुण्यास आणिलें तेव्हां ते बऱ्या बोलानें येईनात. त्या वेळीं हरि विष्णु यानें त्यांस जबरदस्तीनें उचलून पालखींत घातलें हा त्याचा अन्याय.
२ चिमाजी आप्पा.

# १९९. नानास कैद

ऐ० ले० सं० १०
नं० ४१९२,

८-४-१७९८

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब. वडिलांचे सेवेशीं :—

विज्ञापना[1]......श्रीमंत राजश्री नाना फडणवीस यांस शुक्रवारीं रात्रीस चंद्रोदय जाहल्यानंतर दोन घटिकांनीं अमदानगरास कैदेस नेलें......आजचा प्रसंग जो जबरदस्तीनें राहील त्याचा आहे! कोणी कोणास विचारावयाचें नाहीं. ईश्वराचे चित्तीं याजउपरी ब्राह्मणाचा हुकूम चालू नये याप्रमाणें आलें आहेसें भासतें. मग दैवदशा कळत नाहीं. तूर्त शिंदे यांचे घरीं कारभारी एक सर्जा[2] आहे. तेव्हां दौलत[3] चालणें कळतच आहे[4]! परंतु आज सद्दी त्याचीच उभी राहिली आहे. पुण्यांत मारामार चालली आहे यांत कोण पार पडतात पहावें! तूर्त श्रीमंतांपाशीं मुखत्यार राजश्री चक्रदेव, पिंगळे व कुंजर आहेत. शिंदे यांची फौज करवीरच्या पारिपत्यास येती[5], परंतु दिवसगत आहे...... रवाना चैत्र वद्य अष्टमी रविवार हे विज्ञापना.

---

१ रामचंद्र श्रीधर ऊर्फ बावा काळे याचें पत्र. २ सर्जेराव घाटगे. ३ राज्य. ४ कसें चालत असेल त्याची कल्पना येईलच. ५ येईल.

# २००. लग्नाचे बायकोचा पाट

ऐ० ले० सं० भा० १० वा, नं ४०४० } { ११-१२-१७९८

[धार्मिक बाबतींत राज्यकर्ते धर्मगुरूंचा सल्ला विचारीत आहेत.]

श्रीगणराज

रा।। जैन गुरुगोळ[1] मठ मौजे नांदणी गोसावी, यास—

स्ने।। गंगाधरराव गोविंद,[2] (मिरजकर पटवर्धन) सु।। तिस्सा तिसैन. मय्या व अल्लफ. रेवापा केंचाण्णा रयत मौजे कुपवाड यानें विदित केलें कीं, "आपली लेक लिंबी लिंगापा जैन यास देऊन लग्न केलें. नंतर तो निघून गेला त्याचा पत्ता कोठें लागेना. पोरगी थोर झाली. तेव्हां लिंगापाचा भाऊ सावंता यास विचारिलें. त्यानें सांगितलें कीं, लिंगाप्पा हल्लीं कोठें आहे त्याचा पत्ता लागत नाहीं. तेव्हां त्यापासून सोडचिठ्ठी लिहून घेऊन मी आपले लेकीचा पाट लाऊन दिला. त्यास गुदस्तां त्या पोरीचा दादला[3] लिंगापा सरकारांत फिर्यादीस आला कीं, मी लग्नाचा दादला जिवंत असतां माझे बायकोचा पाट लागला त्यास माझी बायको माझे हवालीं करवावी. त्यावरून लग्नाचे दादल्याचे हवालीं बायको झाली. परंतु आमचे जातींत पाट लागलेली बायको फिरोन लग्नाचे दादल्याचे घरीं नांदावयाची नाहीं. पोरगीही तेथून निघून आली. ती पाटाकडे द्यावयास आज्ञा व्हावी म्हणून." ऐशियास ही जैन जातीची गोष्ट. याकरितां तुम्हांस हें पत्र लिहिलें असे. तरी येविशींची चौकशी पुर्तेपणें करून तुमचे जातींत चाल असेल त्याप्रों लिहून मिरजेस सरकारांत पाठविणें. उपरांतिक[4] रेवापा केंचाण्णास आज्ञा होणें ती होईल. जाणिजे. छ० २ रज्जब. सु।। तिस्सा तिसैन मय्या व अल्लफ. बहुत काय लिहिणें.

---

१ गळू; अनेक वचनाचा प्रत्यय. हें बहुमानार्थी अनेकवचन असावें. २ आडनांव पटवर्धन, मिरजकर. ३ नवरा. ४ नंतर.

# २०१. देवळाभोंवतीं डुकराच्या प्रदक्षिणा



ऐ० ले० सं० भा० ११, नं० ४५६७ } { २१-१२-१७९८

श्रीगणपति

अपत्यें कृष्णानें करद्वय जोडून सा।। नमस्कार विज्ञापना. श्रीक्षेत्र पंढरपुरीं कौतुकार्थ आश्चर्याची गोष्ट जाली आहे ते सर्वत्र लोकानीं आपले दृष्टीनें पाहून आले. क्षेत्रीं वडरांचीं[1] घरें आहेत त्यानीं डुकरें बाळगिलीं आहेत. त्यांतून एक धाकटें दोन तीन महिन्यांचें डुकराचें पिल्लूं मार्गशीर्ष शुद्ध तृतीया सोमवारीं आपले कळपांतून निघोन चंद्रभागेंत येऊन स्नान करून पुंडलीकाच्या देवळाभोंवत्या प्रदक्षिणा करावयास लागलें. तों क्षेत्रस्थ लोकानीं पाहून त्यास धुडावून लावून दिलें. त्यास धुडावल्यानें तें डुक्कर जाईना. बळेंच धरून डुकरांच्या कळपांत लावून दिल्याही तेथें जाईना. तेथून पळोन येऊन मागती देवळाभोंवत्या प्रदक्षिणा करूं लागलें. अन्न दूध लोकानीं पुढें ठेविल्यासही खाईना. प्रदक्षिणाच करावयाचा छंद. असे चार रोज प्रदक्षिणा केली. पांचवे रोजीं डुकर मृत्यु पावलें. उपरांत पुंडलीकाच्या पुढेंच वाळवंटींत क्षेत्रस्थ लोकांनीं समारंभ करून पुरून टाकिलें. वडिलांस वर्तमान कळावें यास्तव लिहिलें आहे. स्त्रीजात डुकरी होती. ती अहिल्याबाई असा दृष्टांत जाला म्हणतात. सेवेशीं श्रुत होय. कृपा लोभ करावा. हे विज्ञापना.



---

१ इमारतीचा पाया वगैरे खोदणारी जात.

# २०२. चितपावन-कऱ्हाडे वाद

ऐ० ले० सं० भा० ११, नं० ४७३२ } { १८-२-१७९९

श्री

राजश्रिय विराजित राजमान्य राजश्री परशुराम रामचंद्र स्वामी गोसावी यांस—

पोष्य बाजीराव रघुनाथ प्रधान. नमस्कार. विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जावें. विशेष. चितपावन ब्राह्मण व कऱ्हाडे ब्राह्मण प्रांत कुडाळ, यांचा वृत्तीसंबंधानें[1] वगैरे कजिया[2] लागोन राजश्री राजे खेम सावंत भोसले बहादूर सरदेसाई प्रांत मजकूर वगैरे महालानिहाय यांजकडे फिर्याद गेले. त्याणीं त्यांचे मनास न आणितां कऱ्हाडे यांच्या समजाविल्यावरून चितपावन यांजपासून मसाले[3] व गुन्हेगाऱ्या[4] घेऊन उपद्रव केला आहे म्हणोन हुजूर विदित जालें. त्यावरून प्रांतमजकूरचे उभयतां ब्राह्मणांस इनसाफाकरितां तुम्हांकडे पाठवून द्यावयाविशीं सरदेसाई यांस आज्ञा करून हें पत्र लिहिलें आहे. तर तुम्ही त्यांचें वर्तमान बाजवी[5] मनास आणून कजिया विल्हेस लावणें. जाणिजे. छ० १२ रमजान. सन तिस्सा तिसेन. मय्या व अल्लफ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

१ निर्वाहाचें वतनी साधन. २ भांडण. ३ दंड. ४ गुन्हा शाबीत झाल्यावर गुन्हेगाराकडून चौकशी खर्चाबद्दल घेतली जाणारी रक्कम. ५ खरें.

# २०३. वेलस्लीची तडफ



पु० रे० प० व्य०, भाग ६ वा, पूना अफेअर्स १७९७–१८०१ नं० १२४

फोर्ट विल्यम् ८–७–९८.

लॉर्ड वेलस्ली–पुणें रेसिडेंट

पुढील मुद्यावर तुम्हास लवकरच सूचना मिळतील त्याप्रमाणें वागूं लागावें.

टिपूच्या गैरवर्तनाबद्दल जाब मागण्याबाबत पेशव्यानें आपल्याशीं सहकार्य करावें अशी मागणी तुम्ही पेशव्याकडे करा.

पेशव्यानें कांहीं लष्करी मदत मागितल्यास एक युरोपियन पलटण, दोन हिंदी पलटणें आणि तोफांची एक कंपनी इतकें साहय त्यास द्या. हें सैन्य तुम्ही मुंबईसरकारकडून मागावें. त्यांना मी परस्पर पत्र पाठवून तुमची मागणी पुरविण्याविषयीं लिहीत आहे.

पण पेशव्यास अशा रीतीनें मदत करण्यापूर्वी त्यानें दोन गोष्टींस संमति दिली पाहिजे. एक इंग्रज हे निजामच्या दरबारीं असलेली आपली फौज वाढवितील व दुसरें निजाम व पेशवा यांचेमधील वाद इंग्रजांकडे लवाद म्हणून सोपविला जाईल.

वरील अटी पेशव्यावर वंशपरंपरा बंधनकारक समजल्या जातील. पेशव्यानें ह्या अटी कबूल करीपर्यंत त्यास कसलीच मदत करावयाची नाहीं.

शिंद्यास आपल्या राज्यांत जाण्यास सल्ला द्या. शिंदे दक्षिणेंत आहेत तोंवर त्यांस आमच्या संरक्षक मैत्रीचा फायदा मिळणार नाहीं हें सांगा.

अफगाणिस्तानच्या झमानशाहाचें पत्र आलें असून त्यांत तो कंपनीला शिंद्याविरुद्ध मदत करण्यास बोलावीत आहे, पण शिंदा जर उत्तरेस आपल्या राज्यांत जाईल तर झमानशाहाच्या विरुद्ध त्याचें रक्षण करण्यास आपण तयार आहोंत असें त्यास सांगा.

शिंदा उत्तरेस जाण्याचें नाकारील, किंवा आपल्या किंवा पेशव्याविरुद्ध उठेल, तर त्याच्याविरुद्ध युद्ध पुकारण्यास तुम्हास अधिकार आहे.

भोसल्यानें मागितल्यावरून मी त्याच्या दरबारकडे रेसिडेंट लवकरच पाठविणार आहे या बातमीचा योग्य तो उपयोग करा.

अगदीं जरूर पडल्याखेरीज प्रकरण हातघाईवर आणूं नका.

---

## २०४. नानास स्थानापन्न करा

पु०रे०प०व्य०, भा० ६ वा, नं०१२७; १७९७–१८०१ } { फोर्ट विल्यम् ८–७–९८

लॉर्ड वेलस्ली–कर्नल पामर

या आणीबाणीच्या प्रसंगीं पुण्याचे दरबारीं तुमच्या सारखे बुद्धिमान व अनुभवी गृहस्थ आहेत याचें मला फार समाधान वाटतें. तुम्हास पाठविलेल्या सूचना नेमस्तपणाच्या व न्याय्य अशा आहेत त्या तुम्ही उत्साहानें पार पाडाल यांत मला शंका नाहीं. आपल्या तत्त्वाप्रमाणें जर नाना फडणीसास* प्रधानकीच्या जागेवर बसवितां आलें तर जरूर पहा कारण त्यायोगें आपला बेत सिद्धीस जाण्यास साह्य होईल. पण ही गोष्ट पेशव्यास कितपत आवडेल ? निझामाचा दिवाण अझीम-उल्-उमराव याला या गोष्टीचा मत्सर वाटेल कीं काय ? पण कांहीं झालें तरी नाना अनुभवी व शहाणा आहे व त्याचें आपलें हितैक्य झालें तर आपले बेत यशस्वी तऱ्हेनें पार पडतील. तुम्हास माझी विचारसरणी पसत पडून त्या धोरणानें तुम्ही पुढें पाऊल टाकल्यास त्याला माझी संमति आहे. तुम्हास जरूर लागल्यास तुमच्या मदतीस सैन्य आहेच. पण तें पुरेसें न वाटलें तर मुंबईकरांकडे तुम्ही मागणी करण्याची जरूरी नाहीं. थेट मला तुमचा

---

*या दिवसांत नानांचा इंग्रजांवर विश्वास असे व त्यांजकडे त्याचा ओढाही असे. पु०रे०प०व्य०, भा०६, नं०१२६ पहा.

निश्चय कळवा व त्याची नक्कल मुंबईकर व हैद्राबादचा रेसिडेंट याजकडे पाठवा.

---

## २०५. टिपूशीं युद्ध संपलें

पु०रे०प०व्य०, भा०६ वा, १७९७–१८०१, नं० २६३ | २७ मे १७९९

लॉर्ड वेलस्ली–पेशवा

मला कळविण्यास समाधान वाटतें कीं (टिपूच्या मृत्यूनंतर) त्याच्या सैन्याचा मोड झाला व आतां युद्ध संपलें असून सर्वत्र पूर्ण शांतता नांदत आहे. अशा स्थितींत तुम्ही युद्धाची तयारी करण्याची जरूरी नाहीं. जर या वेळीं म्हैसूरच्या दिशेनें सैन्य पुढें जाऊं लागलें तर तेथील जनतेचीं मनें चलबिचल होतील व त्यायोगें तेथें नांदत असलेल्या शांततेंत बिघाड होण्याचा संभव आहे. जर परशुरामभाऊच्या किंवा इतर कुणाच्या हाताखालीं आपलें सैन्य त्या दिशेनें जात असेल तर त्यास परत बोलावा, अशी मी आपणांस विनंति करतों. मी श्रीरंगपट्टणकडे तिकडील मुलुखाची सर्वसाधारण व्यवस्था लावण्यासाठीं जात आहे हें मी आपणास कळविलेंच आहे. ती कशी काय लागली याबद्दलची माहिती मी आपणास योग्य वेळीं पाठवीनच. ती तुम्हास समाधानकारक असेल अशी मला आशा आहे.

---

## २०६. परशुरामपंताचा मृत्यु

ऐ०ले० सं० भा० ११ वा, नं० ५०९२ } { १८-९-१७९९

श्रीगणपतिर्जयति

अपत्यें* चिंतामणीनें विज्ञापना. वडिलीं पत्र पाठविलें तें पावलें. "ती॥ भाऊसाहेब यांस लढाईत तीन जखमा लागोन कामास आले. मोठी वाईट गोष्ट जाली. तुम्ही हल्लीं वारणा उतरून वाडीच्या रानांत आलां म्हणोन कळलें. ती॥ राजश्री आबा व चिरंजीव विठ्ठलराव बाबा अर्धरात्रौ आले. आबांस पांच सहा जखमा आहेत व विठ्ठलराव यांस पायास गोळी लागोन पार जाली आहे. वारणेस उतार आहे. सावध असावें." म्हणोन लिहिलें, ऐसीयास वडील सर्वाचें छत्र गेलें! श्रीइच्छेस इलाज नाहीं. वडिलांचा काल जालेचें पत्र नारो हरि याचें इचलकर्जीस काल सायंकाळीं आलें. ऐकलेपासून कोणते गोष्टीचें चैन पडत नाहीं असें जालें. रात्रौ चंद्रोदय जालेवर काल बुधवारीं निघोन ++ कृष्णा, वाडीजवळ उतरून सांगलीस मुक्काम केला.....

## २०७. इंग्रजांचा डाव व नानांचा आग्रह

ऐ०ले० सं० भा० ११ वा, नं० ५२३१ } { ८-१-१८००

श्री

सेवेसीं बाळाजी विष्णु सहस्रबुद्धे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ १२ साबानपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. पेशजी

---

*पत्र बाळासाहेबांस सांगलीहून.

इंग्रजाकडील वकील मालीट होता तो विलाइतेस जाऊन आपल्या पातशहाचीं पत्रें सरकारांत पाठविलीं तीं मुंबईकर जनरालाकडे आलीं. तेथून पुण्यास सरकारांत आलीं. बरोबर टोपीकर चार आहेत. येथें आल्यावर त्यांचें बोलणें सरकारांत पडलें जे, पातशाही पत्रें आणिलीं आहेत, त्यास सरकारचा डेरा बाहेर होऊन श्रीमंतानीं सामोरे येऊन फरमानबाडीचा[1] समारंभ करून श्रीमंतानीं उभ्यानीं पत्रें हातीं घ्यावीं. याप्रमाणें चार रकमा त्यांच्या बोलण्याच्या पडल्या. त्याजवरून श्रीमंतानीं श्रीमंत राजश्री नानांस पुसावयास पाठविलें जे, या इंग्रजांच्या मागील चाली कशा आहेत? तेव्हां नानानीं मागील चाली सांगितल्या. दिल्लीपतींशिवाय सामोरे जाणें अथवा फरमानबाडी करणें ही चाल नाहीं. मागें थोरल्या रावसाहेबांचे[2] वेळेस इंग्रजांच्या पातशाहाकडील पत्र आलें होतें ते टोपीकरानीं कचेरीस रावसाहेब यांचे हातीं दिलें. याप्रमाणें चाली असतां नव्याच रकमा[3] बोलण्याच्या काढाव्या या दौलतदारांच्या[4] चाली नाहींत! तेव्हां इंग्रजांकडील बोलणें पडलें जे, आजपर्यंत चाली चालत आल्या खऱ्या. त्या चालींत इंग्रजांकडील मातबर मनुष्य सरकारांत बोलावयासी आला असतां त्यास मदारुलमहाम[5] अगर मातबरांतील (कोणी) इस्तकबिल[6] येत गेले. हल्लीं तो पातशाही पत्रें घेऊन आलों आहों. त्यापेक्षां चारी रकमा घडाव्या. तेव्हां मागती सरकारांतून नानांस विचारावयाकरितां पाठविलें. याप्रमाणें आठ दिवस घाटत होतें. नंतर नानानीं चोहों रकमांचीं चार उत्तरें सांगितलीं जे, श्रीमंत सामोरे येणार नाहींत. डेरा देऊन फरमानबाडी व्हावयाची नाहीं. उभ्यानीं पत्रें घ्यावयाचीं त्यास इंग्रज पत्रें घेऊन वाड्यांत येतील तेव्हां श्रीमंत इंग्रजाच्या भेटीकरितां कचेरीस येतील. त्या संधींत इंग्रजानीं पत्रें श्रीमंतांच्या हातीं द्यावीं. श्रीमंतानीं पत्रें घेऊन मुनसीच्या[7] हवालां करावीं; आणि खुशालीच्या तोफा शंभर माराव्या असें इंग्रजाचें म्हणणें होतें त्यांपैकीं वीस तोफा सोडाव्या असें ठरोन छ० ११ साबानीं लिहिल्याअन्वयें घडलें. श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ फर्मान सन्मानपूर्वक स्वीकारण्यासाठीं दरबारसमारंभ. २ थोरले माधवराव. ३ गोष्टी. ४ राज्यकर्त्यांच्या. ५ हा नानांचा किताब. ६ सामोरे. ७ (फारशी) पत्रव्यवहार करणारा चिटणीस.

# २०८. नानांचा मृत्यु

पु० रे० प० व्य०, भा० ६ वा, १७९७–१८०१, नं० ३३१

पुणें १४ मार्च १८००

कर्नल पामर–लॉर्ड वेलस्ली

काल रात्रीं नाना फडणीस मृत्यु पावले हें आपणास कळविणें हें माझें महत्त्वाचें कर्तव्य समजतों. मला वाटतें त्याच्या मृत्यूबरोबरच शहाणपण व मुत्सद्दीपणा यांनींही पुणेदरबारचा निरोप घेतला.

नानाजवळ पुष्कळ संपत्ति आहे असें म्हणतात. ती आपल्या ताब्यांत मिळविण्याबद्दल आतां पेशवे व शिंदे यांच्यामध्यें तंट्याचें नवीन सत्र बहुधा सुरू होईल. व त्याबरोबरच येथील दुर्दैवी रहिवाशांवर लूट व क्रौर्य यांचा अंमल सुरू होऊन दोन वर्षांपूर्वी झालेल्या सर्जेरावीची त्यांना पुनः आठवण होईल.

# २०९. कर्नल पामरचें दुःख

पु० रे० प० व्य०, भा० ६ वा, पूना अफेअर्स, १७९६–१८०१, पत्र नं० ३७६

पुणें २१–१०–१८००

ए. कर्नल पामर–वेलस्ली

हैद्राबाद येथील वाटाघाटीस यश येऊन कंपनी सरकार व निजाम यांच्यांत संरक्षक दोस्तीचा तह झाला हें वर्तमान ऐकून जो आनंद झाला तो सरकारी पत्रव्यवहाराच्या मर्यादेंत व्यक्त करतां येत नाहीं म्हणून हें खाजगी पत्र पाठवून

त्याबद्दल आपलें अभिनंदन करीत आहे त्यास परवानगी असावी. या योगानें हिंदुस्थानांत ब्रिटिश सरकारची सुरक्षितता शाश्वत व भरभक्कम पायावर उभारली गेली. आपल्या पुढील उद्योगास असेंच उत्तरोत्तर यश येवो.

आपल्या यशाबद्दल आपलें अभिनंदन करीत असतां तुम्ही ज्याच्या हातीं येथील कारभार दिला त्याला येथें तशाच प्रकारचें यश संपादतां आलें नाहीं याबद्दल मात्र फार दुःख होतें. परंतु येथील परिस्थितीच अशी आहे व पेशव्यावरील बंधनें ही अशीं आहेत कीं माझ्याहून अधिक कर्तृत्ववान् इसमाच्या हातीं जरी येथील सूत्रें असतीं तरी त्यास यश येतें ना.

---

## २१०. मुलीचा पैसा घेऊं नये

काव्येतिहाससंग्रह, लें० ४७० } { शके १७२२ सुमारें सन १८००

### बाजीरावाचा हुकूम

श्री

श्रीमत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेशीं :—

पो[1] भवानी शंकर हैबतराव कृतानेक नमस्कार विनंती उपरी येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशळ लेखन करीत असलें पाहिजे. विशेष—आपण पत्र पा[2] नें पावलें. प्रांत वाई येथें ब्राह्मण ज्ञातींत कोणी कन्येचे रु॥[3] घेऊन विवाह करू नये, जो कन्येचा ऐवज घेईल त्याजपासून दुप्पट व जो देईल त्यानें कन्येचे बापास रु॥ दिल्हे असतील तितके, व मध्यस्ती करून पैका घेईल तो ऐवज त्याजपासून सरकारांत घेतला जाईल. याप्रमाणें ब्राह्मण ज्ञातीस व जमीदार[4] व धर्माधिकारी व उपाध्ये व जोशी व पा[5] कुलकर्णी, यांस निक्षूण[6] ताकीद केली

१ पोष्य. २ पाठविलें. ३ रुपये. ४ वतनदार. ५ पाटील. ६ हडमूनखडमून.

असतां आज्ञेप्रमाणें वर्तणूक न करीत, त्यांजपासोन सदर्हूप्रमाणें ऐवज घेऊन कांहीं खर्चाची बाब न लावितां[1] हिशेबीं जमा करावी, म्हणोन लिहिलें. ऐशास प्रांत वाई येथील गांव बहुत करून दुमाले[2] आहेत तेथें आमचा रोखा[3] पत्र चालत नाहीं. वसुली गांव व वाई क्षेत्र व देशमुख व देशपांडये वगैरे सरकारचे पत्राअन्वयें आणवून ताकीद करवितों. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें लोभ असो दिल्हा पाहिजे हे विनंती.

---

## २११. विठोजीचा खून

ऐ०लें० सं०, भा० १३ वा, नं० ६०२७ | १७-४-१८०१

श्री

विज्ञापना[4]. तागायत ३ जिल्हेज वर्तमान यथास्थित आहे. विठोजी होळकर यांस कैद करून गोखल्यांनीं सरकारांत पाठविलें. सरकार वाड्यांत पोहोंचतांच बेडी तोडून मार मारला. दोनशें कमच्या[5] मारून, लागलाच हत्तीच्या पायास बांधोन वोढविला. दुसरे दिवशीं आज होळकरांचे कारभारी वाड्यांत येऊन बोलत होते. पैका दहा वीस लाख मागावयाचा होता. असो. मूठ माती द्यावयास परवानगी द्यावी, म्हणोन त्यावरून आज्ञा जाहली. बायको सहगमन करणार होती. तिला आज्ञा जाहली नाहीं. बायको व पुत्र कैदेंत आहेत. वरकड विशेष नाहीं. तिकडील मुक्काम श्रीकृष्णातीरीं आल्याचें आज वर्तमान आल्यावरून सर्वांस चिंता स्वामीकडील लागली आहे. पार करणार श्री आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ हें करण्यासाठीं पैसा खर्चीं न घालतां. २ लोकांकडे इनाम म्हणून चालणारा गांव. ३ आज्ञापत्र, ताकीदपत्र. ४ पत्र कारकुनाचें पुण्याहून मिरजेस. ५ फोक. बारीक छडी.

# २१२. चहूंकडे इंग्रजांचा गलफ जाला

ऐ०ले० सं०, भा० १३ वा, नं० ६३३० — फेब्रुवारी १८०२ तालीक*

श्री

येथील[1] वर्तमान तर......येथं तुफानें व चौकशा, बारीक बातम्या, शहरांत चालल्या आहेत. याजमुळें लहानथोर गृहस्थ वगैरे कारकून धरून[2] पारपत्यें होतात. याजकरितां मोघम पत्रें लिहिलीं आहेत. स्वामींच्या ध्यानांत यावें ह्मणोन विनंती लिहिली आहे. अत:पर सेवेसीं पत्रें येतील तीं मोघम लिहून पाठवीत जाईन......पूर्व समुद्रांत इंग्रजांचा व फरांसीस याचा कलह होता. त्यास परस्परें सलाह होऊन समेट जाला म्हणोन कलकत्याहून पुण्यांतील इंग्रजांचा वकील कर्नेल कलुष[3] यास लिहिलें आलें. त्यावरून श्रीमंतांस हें वर्तमान करनेल यानें सांगून खुशीच्या तोफा सरकारांतून वीस करविल्या! सारांश चहूंकडे चहूं राज्यावर इंग्रजांचा गलफ[4] जाला! पुढें ईश्वर काय घडवील तें पहावें. श्रीमंत रा॥ रावसाहेब[5] यांस येण्याविशीं पत्रें गेलीं आहेत. रावसाहेब नाशिकाहून जोरव्यास आले म्हणोन वर्तमान आहे. कुल[6] फौजेचें कामकाज हुजरात व सरंजामी आदिकरून गोपाळराव मुनशी याजकडे सांगितलें आहे. जिवाजी यशवंत फौजसुद्धां बराणपुरानजीक गेले. तेथें ठाणें घालावें या बेतांत आहेत. चतुरसिंग वांईहून कूच करून बाबा पाटणकर यांस सामील जाले. मागाहून आनंदराव कुंजर वांईहून कूच करून तेही लौकरच पाटणकर यांस सामील होतील. सेवेसीं विदित होय. गाईकवाड यांच्या संस्थानीं सुरतकर इंग्रज याणीं मदतीच्या निमित्यें प्रवेश केला व कुल हिंदुस्थानांतही इंग्रज जाहले! पुढें काय होईल तें पहावें. हे विज्ञापना.

---

*नकल. १ बातमीपत्र कारकुनाचें पुण्याहून मिरजेस. २ सुद्धां. ३ क्लोज. ४ गवसणी. ५ बाजीराव. ६ सर्व.

# २१३. यशवंतरावाची पुण्यावर स्वारी

ऐ०लेखसं०, भा० १४ वा, नं० ६४६८ } { २८ ऑक्टोबर १८०२

सेवेशीं सा। नमस्कार विज्ञापना. ता। छ २० जमादिलाखर गुरुवार दोनप्रहर वर्तमान यथास्थित असे. विशेष. पेशजी छ० २८ मिनहूनचें[1] पत्र पाठविलें आहे. त्यावरोन सविस्तर कळलेंच असेल. हल्लीं येथील वर्तमान तरी, लढाई सुरू जाली. नंतर खामा यशवंतराव आपल्या फौजेंत येऊन पठाणाच्या जमेतींत जाऊन कंपूवर खुद्द व पठान मिळोन चालून घेतलें.[2] चार घटका तलवार चालली. निदान शेवटीं यशवंतराव खुद्द पाय उतार होऊन दोन गोलंदाज ठार केले. यशवंतरायास उजव्या हाताच्या चवड्यावर जखम तलवारीची व बहावटा[3] उजव्या हातचा याजवर भाल्याची व उजवेकडील गालावर तलवारीची याप्रमाणें जखमा लागल्या आहेत. शिंद्याकडील कंपूंत दहा पलटणें होतीं त्यांपैकीं पांच साडे पांच हजार मनुष्य पठाणांच्या तलवारीच्या जखमेनें ठार, शिवाय घायाळ व जखमी तीनचार हजार, व राऊत[4] दोन हजार, घोड्या मनुष्यांसुद्धां तोफेनें व तलवारीनें मिळोन व शिवाय घोडे राऊत जखमी याप्रमाणें इकडील लढाईत कामास आले......याप्रमाणें लढाईचा विषय जाहला. श्रीमंत व कारभारी व शिंद्याकडील निंबाजी भास्कर वगैरे मिळोन सिंहगडाखालीं वडगांवास होते. श्रीमंतांनीं शहरांत यावें म्हणोन यशवंतरायाचें बोलणें लागलें होतें. नंतर कार्तिक शु॥ १ बुधवारीं मध्यरात्रीं श्रीमंत व कारभारी वगैरे शिंद्याकडील मंडळ व लहानमोटे मुत्सद्दी निघोन कोंकणांत रायगडास गेले. पिच्छावर[5] होळकराची फौज बारा पंधरा हजार पठाण वगैरे सडे गेले आहेत. कुल शहराची गीर्दनवानी[6] नाकेबंदी होळकरांनीं करोन शहरांतील कोणास

---

१ चालू महिन्याचें. २ शिंद्याचे कंपू व तोफा याच्याविरुद्ध होळकराचा भालेतलवारींचा पठाणी जमाव अशा या सामन्यांत होळकरानें तडफेनें जय मिळविला आहे. ३ बाहु. ४ घोडेस्वार. ५ पाठलागास. ६ चोहों बाजूंनी (मूळ उताऱ्यांत दिलेला अर्थ).

बाहेर जाऊं देत नाहींत व शहरांत मुत्सद्दी वगैरे कारभारी मातबर गृहस्थ यांच्या घरीं पाहारे बसवून रुपये घ्यावे व शहराची खंडणी करावी[1] हा बेत होळकराचा आहे. उज्जनीकडील व दिल्लीकडील तूर्त पत्रें आलीं नाहींत. सरकारवाड्याच्या बंदोबस्तास तोफा व पलटणें काल होळकराकडील आले. विंचूरकराच्या पथकांनीं समयास काम चांगलें केलें. पुढें होईल मजकूर तो लिहूं. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

## २१४. पुण्यांत प्रळय : पट्टीची वसुली

ऐ०लें०सं०, भा० १४ वा, नं० ६५४५ — ३ जानेवारी १८०२

श्री

सेवेशीं धोंडो बापूजी जोशी. त्रिकाल चरणावर मस्तक ठेवून शिरसाष्टांग नमस्कार. विज्ञापना......गांवांत पट्टीचा तगादा प्रळय जाहला आहे! होळकर यांणीं नाकेबंदी केली आहे. दुकानें हर[2] कोणाचीं व घरें बहुतेक उघडीं नाहींत. जिवाजीपंत नेने व रामराव पुरंधरे यांजकडील कारकून व दमल शिंपी तिघे जण तस्ती[3] अनेक प्रकारची करून मृत्यु पावले. आज चार रोज होळकर खासा पट्टीस्तव गांवास फडके याचे कारभार वाड्यांत होतो तेथें येत असतात. धक्का[4] घरपट्टी व उदीमपट्टी[5] चालली आहे. कालपासून बुधवार शनवारांत मोठा दंगा आहे. कारभारी लपत फिरतात. जो सांपडेल तो नेतात, पठाणाचे हवाली करितात, हाल करितात ते पत्रीं काय लिहूं? XXX[6] लोक हरतऱ्हेनें बातमी बंदी असतां सडे रात्र बीरात्र करून जीव मात्र घेऊन जातात.

---

१ खंडणी वसूल करावी. २ दर, प्रत्येक. ३ श्रम, हाल (सोसून). ४ जकात. ५ व्यापारावरील सरकारी कर. ६ येथें पत्र फाटलें आहे.

याजप्रमाणें प्रकार आहे. वसईस श्रीमंतांनीं इंग्रज याजला आठ आणे[1] देऊ करून चाकरीस आणिलें. त्याजला मुलुख गुजराथ, सुरत अठ्ठाविसी[2] झाडून व श्रीकृष्णातीर दो प्रांत देण्याचा करार करून चार पलटणें आणलीं. आणखी येणार हें वर्तमान बोलतात......मातुश्री येशवदाबाई[3] रायगडावर आहेत. तेथे कोणी वेळेस काय होईल न कळे. शहर मरूं घातलें आहे! वाडयावर आख[4] पडल्यास मग जीव बचावण्यास कठीण आहेत. वडिलांचे पुण्येंकरून पार पडेल तें खरें. श्रीहरि पार करवील. बहुत काय लिहिणें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना......

---

## २१५. होळकराच्या निमंत्रणावरून अमृतरावाचें पुण्यास आगमन

ऐ०लें०सं०,भा० १४ नं० ६४८७ | १० नोव्हेंबर १८०२

उतारा—पत्र कारकुनाचें होळकराच्या लष्करांतून मिरजेस.

[ १३ रजब. ] " छ० १० रजबीं राजश्री मोरोबादादा फडणीस व बाबा फडके हे सुटोन येऊन भांबवडयास पेठयांचे वाडयांत येऊन राहिले. दुसरे दिवशीं छ० ११ रजबीं श्री. राजश्री रावसाहेब पुत्रसुद्धां भांबवडयास आले. त्या दिवशीं यशवंतराव पुढें सामोरे खडकीच्या पुलापर्यंत गेले. पूर्वी फडणीस व फडके यांच्या भेटी होऊन उपरांत राव[5] यांच्या भेटी होळकर याणीं घेतल्या. नंतर या उभयतांच्या भेटी राव यांच्या होऊन भांबवडयास डेरे देऊन मुक्काम

---

१ राज्याचा अर्धा भाग. २ अठ्ठावीस महालांचा सुरत. ३ सवाई माधवरावाची स्त्री. ४ आग. ५ अमृतराव.

करून राहिले. + + + चिंतोपत व मामा व आबा काळ व त्याचे पुतण्ये व अंतोबा सूळ हे कैदेंत ठेविले आहेत. × × × सिंहगडास पलटणें व तोफा गेल्या आहेत*."

---

## २१६. वसईचा तह

ऐतिहासिक पत्रव्यवहार, नं० ३६५ — { ३१-१२-१८०२

श्री

( तह बाजीराव रघुनाथ पतप्रधान यांचा व इंग्रज बहादुर यांचा पहिला वसई मुक्कामचा )

तहनामा दोस्तीचे मजबुदीकरितां सरकार दौलतमदार श्रीमंत बाजीराव रघुनाथ पंतप्रधान बहादुर व यांचे पुत्र वारीसदार व तावेदार यांचा व सरकार इंग्रज कंपिणीबहादुर यांचा जनरल कलकतेकर की[1] हे इंग्रजाचे बादशहाकडून व इंग्रज कंपिणीबहादुर यांजकडून तमाम मुलखाचे मुकत्यार आहेत. त्याजकडून कर्णेल कलोप[2] बहाद्दर हे मुखत्यार यांचे विद्यमानें ठराव जाहला.

१. ईश्वरी सत्तेनें पेशजीपासून[3] दोस्तीचा मार्ग सरकार कंपिणी इंग्रज बहादर व सरकार राव पंतप्रधान बहादुर यांमध्यें मजबूत आहेत व मागील तहनाम्यावरून दोस्तीचा मार्ग दृढतर आहे. दोन्ही सरकार याणीं समयावर दृष्ट देऊन ही मसलत करार केली कीं, उत्तम प्रकारें मसलतीचा पाया व दोस्तीचा नक्षा[4] ठराव जाहला कीं, हरदो[5] सरकारचे मुलखाचा बंदोबस्त

---

*बाजीराव सिंहगडाकडे पळाला होता. १ 'की' हें जनरलचें नांव. २ कर्नल क्लोज. ३ पूर्वीपासून. ४ (फारशी 'नक्शा') विचार. ५ दोन्ही पक्षांचे.

व्हावा व दोहींकडील सरकारचे शरीकाचा[1] व ताबेदाराच्या मुलखात शत्रु हंगामा[2] करतील त्याचा बंदोबस्त दोही सरकारांतून व्हावा. दोस्तीचा मार्ग दोही सरकारचा मजबूत आहे त्याची वृद्धि व्हावी. दोहींकडील मित्र व दोहींकडील शत्रु एक जाणावे. ही गोष्ट दोही सरकाराकडून मान्य जाहली. पूर्वीचे तहनामे व करार दोही सरकारांत मजबूत जाहले ते कायम आहेत व मागील तहनाम्याप्रमाणें हाही तहनामा मजबूत जाहला. कलम

२. .... .... ....

३. या तहनाम्याच्या शर्ता शेवटास जावयाकरितां दोही सरकारांतून ठराव होऊन उभयपक्षीं करार जाहला कीं, सहा फलटणें शिपाई, सहा हजार बंदुक व तोफा व गोलंदाज फिरंगी[3] लढाईचा सरंजाममुद्रां हमेशा सरकार राव पंडित प्रधान बहादूर यांचे मुलखांत राहतील. कलम

४–१८. ... ... ...

१९. या एकुणिसावे कलमाप्रमाणें दोही सरकारचा करार करणार जाहीर करितात कीं, हा तहनामा सदरहू कलमांप्रमाणें त्यांतील तात्पर्यार्थे यावत् सूर्यचंद्र आहे तोंपर्यंत श्रीमंत बाजीराव रघुनाथ पंतप्रधान बहादूर यांचे दौलतीची वृद्धि दिवसेंदिवस अधिकोत्तर व्हावी; कोणविसी नुकसान न व्हावें, हा तहनामा कायम असावा.

तारीख ३१ माहे डिसेंबर सन १८०२ इ० मुताबिक[4] छ० ५ मोहरम सन १२१७ हिजरी. वसईचे मुक्कामीं जाला असे.

---

१ साथीदार. २ दंगा. ३ युरोपियन शिपाई. ४ जुळणारा (दोन सन हिजरी व इसवी दिले आहेत ते जुळणारे).

# २१७. होळकराचें भोसल्यास पत्र



ऐतिहासिक पत्रव्यवहार, नं० ३७६ } { २७-८-१८०३.

## इंग्रजांस तोंड देणें अवघड नाहीं

श्रीम्हाळमाकांत

(बाजूवर शिका)

राजश्री राजा रघुजी भोसले सेनासाहेब सुभा गोसावी यांसी

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित यशवंतराव होळकर राम राम विनंती उपरी. एथील कुशळ जाणून स्वकीय लिहीत असावें विशेष. आलिकडे आपल्याकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी असें न करितां सर्वदा पत्र पाठवून सविस्तर वृत्त लेखन करून संतोषवीत असावें. इंग्रजांस स्वराज्याचा लोभ उत्पन्न होऊन चाल करावी ह्या इराद्यांत बहुत दिवस होतेच. प्रस्तुत श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब अनकूल हें निमित्यास कारण होऊन पुणियास येऊन अलीकडे चाल करून नगरचा किल्ला घेतला. आपल्यापाशीं वकील होता तो न पुसतां उठून गेला. नबाबाकडील फौज व दळ येणें. औरंगाबादेनजीक आहेत. त्यांची चाल पाहून आपण व राजश्री दौलतराव शिंदे संड होऊन भांदोल्याचे घाटावरतीं चढून त्याची आपली छटी[1] थोडी आहे म्हणून वर्तमान ऐकतों, त्यास आजपर्यंत आपसांत फूट होतो याजमुळें त्यांचा इतका प्रसार झाला. प्रस्तुत आपली त्रिवर्गांची एकदिली जाली. तेव्हां स्वराज्यांतील सर्व लहान थोर सरदार मराटे मुसलमान सामने[2] होतील. हिंदुस्थान प्रांतीचे राजेरजवाडे व राजश्री समशेरबहादूर बुंदेले व झांसीवाले आदीकरून छोटेमोटे अनकूल होतील. इतका भरणा

---

१ दोन सैन्यांतील अंतर. २ तोंड देण्यास सिद्ध होतील, स्वराज्यांत हिंदुमुसलमानांचा अंतर्भाव आहे.

पाहतां पांच-सहा लाख फौज व दहा कंपू होतील. दोन थोक[1] करून चाल केली असतां कांहीं जड[2] पडावें असें नाहीं......आपण उतावळी करून गांठ घालून ते हांवभरी[3] होऊन चाल करतील असें न करावें. धमकावून पोक्त विचारानें पाऊल पडल्यास सहजांत कायल[4] होतील. त्यास याच बेतास लागावें. कांहीं अवघड नाहीं. त्यांची चाल चहूंकडून आणि आपण एके ठिकाणींच घोटाळल्यानें ठीक नाहीं. फौजा व कंपू तिकडील जिल्ह्यांतील बोलाऊन घेऊन त्याची आपली छेटी लांब पल्याची राहून, सध्या नबाबाचा मुलुख पोटीं पाडा,[5] व इकडे आम्हीही तसाच बेत धरितों......सारांश ह्या प्रसंगीं एकदिलींत कसर नसावी, याचे पोटांत कामें बहुत आहेत. आपण विचारवंत दूरदेशीं आहां. विस्तारें ल्याहावें ऐसें नाहीं, पत्रांच्या रवानग्या वरचेवर होत जाव्या. रवाना चंद्र ९ जमादिलावल मा। आर्बैन मयातेन अलफ. बहुत काय लिहिणें ही विनंती. मोर्तबसुद.

---

## २१८. असईची लढाई

ऐ०ले०सं०,भा० १४, नं० ६७३४ } { ४-१०-१८०३

[ वेलस्ली-शिंदे युद्धाचें हे वर्णन काळजीपूर्वक वाचल्यास उभय पक्षांकडील बातमीदार आपलाच जय झाला म्हणून कां सांगतात, मराठे शौर्य, शिस्त किंवा शास्त्र या कोणत्याही कारणांपेक्षां पैसापुरवठ्याची अव्यवस्था यानेंच कसे हैराण झाले, पहिल्या बाजीरावापासून दुसऱ्या बाजीरावापर्यंत मराठ्यांची एकन् एकच गोष्ट—द्रव्यपुरवठ्याची अव्यवस्था—ही कशी चुकत गेली वगैरे मुद्यांचा प्रत्यय येतो. होळकर येऊन मिळणार म्हणूनही शिंदे थांबला असल्याचें या पत्रावरून कळतें. ]

---

१ सुसज्ज भाग. २ (इंग्रजांस तोंड देणें) कठिण जावें असें नाहीं. ३ उत्साहभरित. ४ काईल, कुंठित, जित. ५ आक्रमण करा.

श्री

विज्ञापना. तागायत छ० १७ जमादिलाखर भोमवासरे[1] प्रातःकालपावेतों यथास्थित असे विशेष....वसलीची[2] व शिंद्यांकडील पलटणांची लढाई सुरू जाहली. दीड प्रहरपर्यंत मारगीर* बहुत जाहली. शिंद्यांकडील पलटणवाल्यांनीं फिरंगी याचा काट[3] चालों दिला नाहीं. शिंद्याकडील पलटणवाले याणीं गोपाळराव भाऊ यांस सांगोन पाठविलें कीं, लढाई सुरू जाहली. जलद तयार होऊन येणें. तेही फौजसुद्धां तयार होऊन आले. लढाईमध्यें टोपीकरांचें माणूस काळे गोरें मिळोन हजार बाराशेंवर ठार व शिवाय जखमी. इतक्यांत टोपीकराकडील दुसरी टोळी मागें उभी होती तिणें गोपाळराव तयार होऊन इकडे आले हें पाहून त्याजपाशीं सरकारी दहावीस तोफा होत्या त्याजवर चालोन गेले. तोफखाने-वाल्यानें जलदी करून तोफा मागें ओढाव्या तर झाडून बैल रानांत चरावयास गेले. नाइलाज तोफा टाकून माघारे सरले. चिटणिसाकडील दहावीस तोफा होत्या तितक्या फिरंगी याणीं नेल्या. तोफा सांपडल्या याची फत्ते मानिली व माणूस पार ( फार ) पडलें हें पाहून माघारे सरले व फौज पल्टणेंही माघारीं गेलीं. हिंदूंकडील माणूस जायां व जखमी जाहलें....वसली याणीं शिंद्याकडील पलटणची लढाई पाहून चित्तांत सर्द आहेत....दुसरे दिवशीं फौज पलटणें सुद्धां कूच करून आठ दहा कोश अजटा घाटाजवळ गेले. एक दोन मुक्काम तेथें जाहले आहेत. आणखीही कूच करून घाटपार जावें असाही मनसबा ठरला आहे. मागाहून वसलीही एक दोन रोजीं कूच करून त्यांचे पाठीवर जाणार. प्रस्तुत टोपीकरास व हिंदूचे सैन्यास वीस कोसांची तफावत आहे. शिंदे भोसले मागें सरले, कांहीं खराबी जाहली व फिरंगी यांजपुढें टिकाव न निघे, याजकरितां मागें सरकले असा अर्थ नाहीं. फौजेत कांहीं पैक्याचा गवगवा व कांहीं मसलत[4] याजमुळें व होळकर यांजकडील पत्रे जलद येऊन पोहोंचतों म्हणोन आलीं. त्याजवरून मागें गेले व टोपीकरांस प्रस्तुत नगरची रस्त[5] दुसरीकडून पोंहचत नाहीं याजमुळें आंगावर घेऊन रस्त लांब पाडावी हाही मनसबा. याप्रमाणें मजकूर तिकडील आहे. इंग्रजांकडील जखमी नगरास फार

---

१ मंगळवार. २ वेलस्ली. *हाणामारी. ३ प्रहार. ४ डाव, कारस्थान. ५ रसद.

आले. दिल्ली व आग्रा इंग्रजांनीं घेतला म्हणोन बाजारी वर्तमान आहे; परंतु शिंद्यांची लष्करची पत्रें आलीं त्यांत लिहिलें आहे जे, पीरनची¹ व टोपीकरांची लढाई छ० २० जमादिलावलीं जाहली त्यांत फिरंगी याचाच नाश बहुत जाहला. पीरनचीं पत्रें फौजा जलद पाठवाव्या म्हणोन आलीं त्यांजवरोन राजश्री आंबोजी इंगळे यास जलद जाऊन पलटणांस सामील होणेंविसीं पत्रें गेलीं व आल्लीबहाद्दर याजकडील फौज पीरनकडे जाणार याजप्रमाणें त्या पत्रांतील मजकूर आहे. मागाहून होईल तो सविस्तर लिहीन. विदित होय हे विज्ञापना.

---

# २१९. इंग्रज-भोसले करार

| | |
|---|---|
| राजवाडे खंड १०, पत्र ६५१ | १८–१२–१८०३ १७२५ पौष शु० ४ |

श्री

विज्ञापना ऐसीजे इंग्रजांची व यांची बोलणी होऊन निश्चयांत आलीं. कलमें* विा—

वरधेपलीकडे जो प्रांत तो तुमचा तुम्हांकडे असावा. कलम १

मडले संस्थानाविशींचे आम्ही बोललों असतां. परंतु तुम्हीं राजश्री पंतप्रधान याची नुकसानी केली नाहीं. सबब तेहि तुम्हांकडे असावें. कलम १

फरासिस अथवा इंग्रज कोणीं तुह्मांपाशीं आल्यास त्यास नोकर ठेऊं नये. कलम १

आह्मांवितिरिक्त राजकारण कोणीकडे तुम्हीं ठेऊं नये. कलम १

कटक व वराड आम्हीं घेतलेंच आहे तें माघारें द्यावयाचें नाहीं. कलम १

---

१ पेरन, शिंद्याचा सेनापति. *यालाच इंग्रज लोक देवगांवचा तह म्हणतात. तहाची तारीख १७–१२–१८०३.

गाविलगड व नरनाला यांचे सरंजामाचा प्रांत इतकें तुम्हांस दिल्हे. हे तुम्हांकडे असावें. कलम १

आमचे द्वेषी असतील त्यांची साथ तुम्हीं करूं नये. कलम १

आमचा वकील तुह्मांपाशीं व तुमचा आह्मांपाशीं असावा. कलम १

सदर्हूप्रमाणें निश्चयात आलें, ऐसें ऐकिलें. त्याजवरून विनंती लिहिली आहे. याशिवाय आणखी काय असेल तें समजेल तसें लिहून पाठऊं. शेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

---

# २२०. नानाच्या बायकोस वेलस्लीचें आश्वासन

ऐतिहासिक पत्रव्यवहार नं० ३८१ — २५-३-१८०४

श्री

कौलनामा[1] श्रीमंत कैलासवासी राजश्री नाना फडनवीस यांचे कुटुंब मातोश्री जिऊबाई यांशीं—

कुंपनी सरकार इंग्रेज बहादूर यांजकडून वेलस्ली बहादूर यांनीं लिहून दिल्हा कौल ऐसाजे :—राजश्री धोंडोपंत सुभेदार लोहगड यासी केले ते कराराप्रमाणें आपली वस्तवानी[2] व खासगत चाकरलोकांनिशीं श्रीमंत पेशवेसाहेब राव पंडित प्रधान बहादूर यांचे मुलखांत आपले मनासीं कोठें प्रशस्त असेल त्या स्थळीं सुखरूप असावें. आपले पोटगी खर्चाकरितां इंग्रेज बहादूरचे सरकार विद्यमानीं[3] सालिना १२००० बारा हजार रुपयेप्रमाणें आपण कुंपनी इंग्रेज बहादूरचे सरकार व श्रीमंत पेशवा साहेब राव पंडित प्रधान यांचे शत्रुवर्गाशीं संबंध न ठेवीत तोपावेतों पावत जातील. आपणाशीं कोणाकडूनही कोणे गोष्टीची इजा पोहोंचणार नाही. अभय असे ता. २५ माहे मार्च सन १८०४ इसवी मुताबल[4] छ १२ जिल्हेज मुक्काम मुंबई.

---

१ अभयपत्र. २ चीजवस्त, दागदागिने. ३ नर्फे, कडून. ४ सुरू, चालू.

# २२१. होळकराकडून इंग्रजाचा पराभव : तहाची बोलवा

पेशवेदप्तर, भा० ४१ नं० ३८

२४-४-१८०४ नकल

[ पत्रलेखक ऐकीव माहितीवरून लिहीत आहे. पत्रांतील ठोकळ बातमी बरोबर आहे, पण कलमवारींत चुका दिसतात. ]

श्री

विनंती जे होळकरानी जळाचा[1] समग्र फडच्या[2] केला. मागील लढाई भरतपुरसमीप जाली म्हणौन आपल्यास सूचना पूर्वी लिहिण्यांत आली होतीच. त्यांत तीन सरदार मातबर सापडले तेव्हां तह ठरला. दोन सवस्थानापौ येक स्थळ द्यावे असे ठरले. नतर सिंद्यास पत्र पा की पत्र पावतेक्षणी सडे होऊन यावे. त्याजवरून सिंदे राघोगडानजीक लस्कर ठेऊन सडे पाच च्यार हजार फौजेनिसी स्वार होऊन दरकूच होलकराचे भेटीस मथुरेनजीक गेल्याची पत्रे आली. इकडे पेंढार व जोत्याजी माने रवाना जाहाले आहेत हें खचित, काही येक तथा* नाहीं. छ० १० मोहरमी श्रीमताकडे अस्तमानी इंग्रेज आले होते...नगरचे किल्यातील सरंजाम समग्र बाहेर काढिला. तह जाला असे दिसते. साहुकारी पत्रे आली त्यात तह जाहला पत्रं करार करून आणावयासी पंधरा दिवसाचे मुदतीने कल्कत्यास पाठविली आहेत. काल छ० १२ मोहरमी येथें प्रहर रात्रपर्यंत विचार जाहाला. बहुत ग्लानि[3] दिसोन आली. येकूण जळानी जळात राहावे, खुसकी[4] समग्र सोडून द्यावी असे जाहालेसे दिसोन आले.

---

१ जलचरांचा. २ नाश, पाडाव. *अन्यथा (?). ३ उदासीनपणा. ४ जमीन (जमिनीवरील स्वामित्व).

# २२२. होळकराची तळमळ



ऐतिहासिक पत्रव्यवहार, नं० ३९४ } { २८-२-१८०६ श०१७२७ फा०शु०१०

श्रीम्हाळसाकांत

राजश्री व्यंकोजी भोसले सेनाधुरंधर गोसावी यांसी—

सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित येशवंतराव होळकर रामराम विनती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत असावें विशेष...... स्वराज्यांत जलचरांचा प्रसर विशेष जाला, हा घडूं नये यास्तव माहाल मुलकाची आशा न ठेवतां कळल त्याप्रमाणें फौज व कंपू वाढवून करोडों रुपयांचे पेचांत येऊन आज दोन अडीच वर्षें होत आली. रात्रंदिवस आंग्रजांसीं मुकाबल्याचा प्रसंग घडत आला. दरम्यान राजश्री दौलतराव शिंदे यांसी मेळ* करून भेट घेतली. त्यांचे आपले विचारानें पगडीबंद[१] सामल[२] राहतीलच याच भावें आपल्याकडे पत्राच्या रवानग्या होत गेल्या. मेवाडप्रांतीं आलियावर ताम्रांस[३] चौकडून पायबंद देऊन हारीस[४] आणावें यास्तव पंजाबपावेतों यावयाचे केलें. इकडे लाहूरवाले वगैरे सिखांच्या भेटी होऊन सर्व सामल जाले. जमाद पोक्त जाल्यामुळे फिरंगी मागें पंचवीस तीस कोसांचे अंतरानें येत गेले. त्याणीं पटाल्याचें† मुक्कामापासून समेटाचें बोलणें लाविलें. इकडील मुस्तेदी[५] पाहून सोबत्याणीं राजेरजवाडे अनुकूल करून दिल्लीचे सुमारें येऊन शह द्यावा तें न करितां कारभारी दुराशेत[६] येऊन पुन्हा त्यासी[७] येकोपा ठेवून मेवाडांतच राहिले ! स्वराज्यांतील ऐक्यता बहुत, येणेंकरून आजपावेतों व्यंग न पडतां एकछत्रीच अमल फैला[८] होता. हालींच्या

*सख्य. १ दौलतराव (?). २ सामील. ३ इंग्रज (हा शब्द 'मोगल' या अर्थींही वापरला जातो.). ४ जेरीस आणावें. †पत्याळा (?). ५ तयारी. ६ (शिंद्याचे) कारभारी निराश होऊन. ७ इंग्रजाशी. ८ फैलावला.

आपसांतील बदचाली पाहून सर्वांस आपलालें घर संरक्षण करून जमींदारीनें[1] असावें हेंच प्राप्त जालें. येणेयाची[2] प्रतीक्षा होती तो योग न आला. फौज सामल होईल हें कागदपत्रीं मात्र श्रवण जालें, अथवा तिकडेच बंगाल्यांत वगैरे बल धाडलें असतें तरी किती उपयोग घडता. हिंदु धर्मास मुख्य आपले इरादे[3] नमूद[4] असावे तें कांहीं एक दिसण्यांत येईना. स्वधर्मास एक आमचा नफा, वरकडांची नुकसानी असाहि अर्थ नाहीं.[5] सर्वत्राची उमेद, अनुभव व प्रत्यय पाहून आंग्रजांकडून समेटाचें बोलणें आलें होतें त्याजवरून समेट करून घेतला. फिरंगी कूच करून माघारे दिल्ली प्रांते गेले. आमचे मुक्काम व्यासगंगा व सुतलज नदीचे द्वाबांत असे. इतःपर दरकूच माळवे प्रांतीं यावयाचें घडेल. वरकड घरोब्याचे विचार सनातन आहेत ते यथाक्रम चालवावे. इकडील दुसरा अर्थ मानूं नये...बहुत काय लिहिणें ? लोभ कीजे हे विनंती. मोर्तब.

---

## २२३. पेशवे छत्रपति यांचें सख्य

**ऐतिहासिक पत्रव्यवहार, नं० ४१२** — १२–१०–१८१०

श्री

( माईसाहेबांचें पत्र बाजीरावास )

श्रीपंढरी व शंभु महादेव व जेजुरी येथील यात्रेस स्वारी गेली होती ती आश्विन शु. १५ भृगुवारीं ३ प्रहरीं शहर सातारा येथें आली. यात्रेस जावें

---

१ मांडलिकीनें. २ येतील अशी वाट पाहात होतों. ३ संकल्प. ४ रुजू. ५ स्वधर्म रक्षिल्यानें आमचा नफा होईल व इतरांची नुकसानी होईल असें नाहीं

असें मनांत होतें त्याची गोष्ट तुम्हापाशीं काढतांच तुम्ही अगत्य धरून घडविलें, याचा संतोष वारंवार होतो. त्याचा विस्तार पत्रीं कोठवर लिहावा! आजपर्यंत घडलें नाहीं, पुढें घडण्यास अशक्य तें राव तुम्ही आमचे वचनास अनुमोदन देऊन मनांत होतें त्यापेक्षां खर्चवेंचाचा वगैरे बदोबस्त यथास्थित करून देऊन त्रिंबकजीस पाठविला, त्यानें कोणे गोष्टीचें कमी पडूं दिलें नाहीं.

---

# २२४. पेशवा-गायकवाड वाद

पेशवेदप्तर, भा० ४१, नं० ६७ — ९-२-१८१४

## गंगाधरशास्त्री पुण्यास रवाना

श्री

सेवेसी विनंती सेवक रघुनाथ रणसोड मुक्काम बंदर मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना.... बंदर मजकूरचे अखबारींचें[१] विनंतीपत्र जामुदासमागमे सेवेसीं लिहून पेसर्जी पाठविलेंच आहे. राजश्री गंगाधरशास्त्री यांस निकडीनें पुण्यास जाऊन पोहचावें म्हणोन येथील मुख्याची ताकीद जाहाली. त्याजवरून माघ वद्य ४ भोमवारीं[२] निघोन पुण्यास जावयासी गले. कारनल कारनिक कपतान बडोदकर याचा मार्ग मशारनिल्हे पाहात होते.* ते येऊन उभयेताचीं बोलणीं जाहालीं. त्यांतील हांसील[३] पुण्यास गेल्यावर सरकारांत गायेकवाड प्रकर्णी बोलणी होऊन, संकेताप्रमाणें उलगडयांत आणावे[४]. कमपेश[५] जाब-

---

१ वकिलाकडून आलेलें बातमीपत्र. २ मंगळवार. *कर्नल कारनॅक मुंबईस येण्याची गंगाधरशास्त्री वाट पाहात होते. ३ इत्यर्थ. ४ निकाल करावा. ५ कंपेश, फरक.

साल[1] पडल्यास येथें लिहून पाठवीत जावे. त्याचा पुरावा[2] येथून होत जाईल. याप्रमाणें घाट[3] ठराऊन महिना पंधरा दिवस तेथील बोलणी समजण्यांत येत तोंपर्यंत कननेल[4] याणे येथें असावें असा बेत ठराऊन, शास्त्री निघोन गेले. करनेल येथें आहेत. दुसरा मजकूर आबरक्रांबी जनराल मदरासेस होते त्याचे चित्तांत विलायथेस जावयाचे, याकरितां विलायथेहून त्याचे जाग्यावर दुसरा जनरल इस्लुप[5] म्हणोन नेमिला आहे. इतक्यांत येऊन पोहचेल, यावर मजकूर नवल विशेष आढळेल ते शेवेसीं लिहीत जाईन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

## २२५. एल्फिन्स्टनकडे कोण आले गेले ?

काव्येतिहाससंग्रह, नं० ४८६

मार्गशीर्ष शु० १२ श० १७३६
ता० २४-१२-१८१४

### हेराची बातमी

श्री

साहेबाचे सेवेशीं आज्ञांकित बयाजी[6] नाईक, विज्ञापना मेस्तर एलफिन-इष्टेन वकील दिम्मत[7] इंग्रज कलकत्तेकर यांजकडील दिनचर्येची बातमी.

१. छ १० मोहरमचें वतमान. मशारनिले प्रातःकाळी दापोडी पावेतो जाऊन

---

१ करार, करारांत फरक पडल्यास असा अर्थ. २ स्पष्टीकरण, पाठ-पुरावा. ३ बेत. ४ कर्नल कारनॅक. ५ हिस्लॉप. ६ बयाजी नाईक—हा एक हुजऱ्या असून तो पुण्यास एल्फिन्स्टनच्या बंगल्यावर हेराचें काम करीत होता. ७ आश्रयाखालील, ताबेदार. अशा शब्दांचा पुढील शब्दाशीं संबंध असतो. जसें, दिम्मत इंग्रज = इंग्रजांच्या आश्रयाखालील.

सहल करून आले. अनुमिया हैदराबादकर, नारायणजी डांकवाले* यांशीं बोलून गेले. मुंबई व हैदराबाद व श्रीरंगपट्टण व ब-हाणपुरचीं पत्रें डांकेबरोबर आलीं जबाब रा[1] जाले. रिकार्ड[2] कोशलदार व कर्णेल ग्रांट मुंबईहून बंगल्यास आले. सात मुक्काम केले होते. वेहरास येऊन देऊळ वगैरे जागा पाहून, कारल्यास मुक्काम करून, मागती मुंबईस गेले. सरकारचा जासूद व मारनिलेकडील खिजमतगार तरतुदीकरितां मारनिलेनीं पाठविले होते ते माघारें आले.

१. छ ११ मोहरमचे वर्तमान. बापूजी गणेश गोखले यांस मारनिलेनीं पत्र लिहून, थैली[3] तयार करून रवाना करावयास त्यांजकडील सखोपत टेंभे यांस बोलावून आणोन त्यांचे हवाली केली. सखोपंतानीं एक घटका बोलणें करून गेले. बापूजी गोपाळ साने येऊन कप्तान कलोस[4] यांशीं बोलून गेले. करवीरकराकडील कारकून मेस्त्र रसल[5] यांशीं बोलून गेले. प्रभाकरपंत जोशी मोधीशीं[6] बोलून गेले. आंगरे यांजकडील बापूभट सोमण मेस्त्र रसल यांशीं बोलून गेले. गंगाधरशास्त्री याणीं जासुदाबरोबर लखोटा पाठविला तो मुंबईचे डांकेवर रवाना करावयास मारनिले जवळ पावता करून गेला. मुंबईचे डांकेवर व हैदराबाद व श्रीरंगपट्टण व ब-हाणपूरचीं पत्रें आलीं. जाब रा जाले. दोन रोजां वर्तमान निवेदन जालें पाहिजे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

*टपाल नेआण करणारे. १ रवाना. २ रिचर्ड कौन्सिलदार (कौन्सिलचा सभासद). ३ थोरामोठ्यास पाठवावयाचें पत्र. ४ क्लोज. ५ मिस्टर रसेल. ६ मोदी.

# २२६. रणजितसिंग वगैरेशीं दोस्तीचा यत्न



पे० द०, भा० ४१ वा, नं० ८१ — २०-२-१८१५

[ हें पत्र बहुधा होळकरच्या छावणीतील पेशव्याच्या इसमाकडून पुण्यास पेशव्याकडे लिहिलेलें आहे. ]

शेवेसी गोपाल गणेश विज्ञापना ताा छ २१ माहे रौवल* पो[1] साहेबाचे कृपावलोकणेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील मजकूर ये संस्थानीहून कुंभारासीयाचे[2] निाा[3] भला माणूस उतर दिसेस गेला. त्याणें मजला पत्र पा आहे तो माार कार्तिक वद्य ८ निघोण आंतरवेदचे रस्त्यानें पाहाड तून अमरसरास[4] आलो. पाहाडी राज्याच्या भेटी होऊन पकाइत[5] करून आलो. रंजितसिंग सीक याची भेट जाली. जितकी खातरीची बोलणी होती ।ततकी पक्की[6] जाली. आणि येथून आटकपार वलिटीवाले[7] मीरत नरशा याजकडे हालकारे[8] रवाना केले आहेत. काबलवाले याची व रंजितसिंग याची दोस्ती होऊन काबलवाले याचा वजीर फतेखान व रंजितसिंग याची फौज येकटी[9] होऊन कास्मीर[10] खाली[11] केली. येथें पत्रें माघ शुाा ११ तिसरे प्रहरी आली. बहुत खुषी होऊन तोफा जाल्या. पलटणची रजक[12] जाली. पुढें फौजा मुलतान खाली करावयासी जान्हार. काबलवाले यांचा व रंजित-सिकाचा हा करार ठरला आहे. उभयेताच्या फौजा येकटया करून तांब्रावर[13]

---

*रबिलावल. १ पावेतों. २ कुंभ राशी ज्याची आहे असा. नांव गुप्त राखण्यासाठीं हा संकेत आहे. ३ निसबत, मार्फत. ४ अमृतसर. ५ पकाइत करणें = संबंध, मैत्री पक्की करणें. ६ निश्चित. ७ वलिटीवाले = वलाटीवाले, डोंगरभागचे स्वामी. ८ जासूद, हलकारा, हरकारा. ९ एकत्र. १० काश्मीर. ११ खालसा. १२ रंजक = बार, पलटणीनें बार उडविले असा अर्थ. १३ इंग्रज.

जावे याप्रमाणें कुरान-कसमा[1] जाल्या आहेत. आण[2] आम्हास आज्ञा जाली आहे मागती[3] आम्हास पत्र यावे म्हणजे आमची तयारी आहे....आमचे कराराप्रमाणे इकडील सरदार कायेम आहेत. परंतु खावंदाचा[4] भरोसा[5] येत नाहीं, यामुळें जेथें तेथें कच्चाई[6] पडती....

---

# २२७. बाजीरावावर एल्फिन्स्टनचे हेर

पे० द०, भा० ४१, नं० ८७ } { १८१६ (?)

श्री

यादी कलमे दीक्षित याणी सदासिवपंत* भाऊ याचे विा[7] टराऊन द्यावी ते येणेप्रो :—

१ श्रीमंत माहाराजा[8] प्रातःकालापासून रात्रपर्यंत काय बोलतात, कोणासी खलबत करितात हे झाडून वर्तमान रोजचे रोज कलवीत जावे.

१ जातीने सरकारचा कारभार करितील त्याची वरदी[9] रोजचे रोज द्यावी.

१ सरकार फौजेचे सरदार यास महाराज आतून बंदोबस्तास कोठे पाठवितात, व सरंजामास[10] मोघम काय देतात ही बातमी कलवावी.

१ श्रीमंतास पत्रे येतात त्याची उत्तरे काये देतात हे तावार[11] कलवीत जावे.

१ महिन्याची हजरी लोकांची होत्ये त्यास ब्राह्मण व मराठे व मुसलमान

---

१ कुराणावर (धर्मग्रंथावर) हात ठेवून शपथा. २ आणि आम्हास (आपणांकडे कळविण्यास) हुकूम झाला आहे कीं. ३ उलट. ४ पेशवा. ५ भरंवसा. ६ राजकारण ढिलें पडतें. *सदाशिव माणकेश्वर. ७ विषयीं. ८ बाजीराव. ९ बातमी. १० जुळवाजुळव, तयारी. ११ तपशीलवार.

किती याची हजरी समजावावी; व सिपाई यास दरमहा काय देतात व देनगीत तोडजोड[1] कसी करितात हे कलवावे.

१ त्रिंबकजी श्रीमतास भेटला की नाही ही बातमी पकी काढून सांगावी.

१ पेंढारी उठले आहेत, यास आश्रय कोणाचे हे कळवावे.

१ आमची खासगत गोष्ट श्रीमंत काय बोलतील ते सांगावे.

१ नागपुरवाले भोसले याचे कारभाराविसी माहाराज काय बोलतात ते कलवावे.

सदरहू कलमे लिहिली आहेत. याची बातमी सांगावी; विद्यमान सदाशिवपंत भाऊ. याप्रो ठरावाची याद[2] जाहाल्यास सर्व बोलणी बेताप्रो करार करून द्यावयासी येतील.

---

## २२८. त्र्यंबकजीस पकडून देण्याबद्दल बक्षिस

पे०द०, भाग ४१, नं० ८९ | २१-५-१८१७

### बाजीरावाचा जाहीरनामा

श्री

अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री बाबूराव गणेश कादार[3] क्षेत्र पंढरपूर गोसावी यासी—

सेवक बाजीराव रघुनाथ प्रधान नमस्कार सुरु सबा अशर मयातेन व अलफ. त्रिंबकजी डेंगला कुंपणी इंग्रजबाहादूर याचे कैदेतून पलून बंड करीत फिरतो.

---

१ कमजास्त व्यवस्था. २ अटी निश्चित झाल्यास. ३ कमाविसदार.

त्याची चौकसी करून डेंगला मजकूर याचे ठिकाण लाऊन जिवंत अगर मेला सरकारांत हवाला करून देईल त्याजला बक्षीस दोन लक्ष रुा व हजार रुपयाचा गाव इनाम इंग्रजबाहादर याचे विद्यमाने दिल्हा जाईल. याप्रमाणें खातरजमा राखोन सरकारचाकरी करून दाखवावी. याची पुर्ती चौकशी करून जो त्रिंबकजीस धरून आणून देईल त्याजवर सरकारची सर्फराजी[1] होईल. येविसी कोणी अनमान करील त्याजवर सरकारची इतराजी होईल. समस्त गरीब रयत ब्राम्हण व मराठे व वाणी व उदमी[2] व परदेसी व मुसलमान व बेरड भील व मांग व रामोसी व रहदार[3] वगैरे जे कोणी त्रिंबकजी डेंगळा याचा पता अमुक जाग्यावर आहे असा प्रत्यक्ष सरकारात दाखऊन देतील त्यास पाच हजार रुपये बक्षीस व येक चाहूर[4] जमीन इनाम इंग्रजबहादूर याचे विद्यमाने पावेल. डेंगला मजकूर याचा पता ठाऊक असोन जर कोणी सरकारात समजाविण्यास अलस केला असे विदित जाहाले तरी त्याचे पारिपत्य होईल......

---

१ मेहरबानगी. २ उद्यमी, दुकानदार. ३ जाणारायेणारा, वाटसरू. ४ एकशेंवीस बिघे.

# २२९. ' सर्व हिंदूंनीं एक होणें योग्य '

पे० द०, भा० ४१, नं० १२७ — १७-११-१८१७

## येरवडयाची लढाई

श्री

कार्तिक शुा ८ रविवारी इंग्रजासी दुसरी लढाई मातबर जाहाली. उभय पक्षी माणसे जखमी ठार बहुत जाहाली. जंगी सरंजाम त्याचा, आपला थोडा पडला तो पुरा सरंजाम करून मागती लढाई द्यावी अशा उदेशे तोफखाना काढून कूच करून सासवडास येऊन तेथून कूच दरकूच साल्ण्याचे घाटानें फालक्याचे* पाडळीस[1] आलों. पेशजी लढाई जाहाल्याचा मार[2] लिहून गेलाच आहे. ऐसियास इंग्रजांनी सर्व दौलतदारांस जाच करून दौलत हरण करण्यांत बाकी ठेविली नाहीं. व सर्वांचे अंतःकरणाचे धर्म कीं श्रीमत प्रगट[3] जाहल्याखेरीज कोणी धजावत नाहीं. श्रीमंत प्रगट जाहाले असता सर्वहि प्रगट होऊन येक समई पायबंद जिकडील तिकडे लागले असतां बंदोबस्त होईल, असा सर्वांचा मनोधर्म येकविचाराचा जाणोन इंग्रजासी लढाई सुरू जाहाली त्यांस तर तुम्ही तेथें बिघाडाचा मोहरा[4] करून लढाईचा प्रसंग घालावा. अवसर पडेल त्याप्रो हिकडेहि कुमक असावी.

सर्वत्रानी येके समई पायबंद लाविल्यावाचून जेरीस येणार नाहीं. हिंदु धर्म रक्षावयाचा समय जाणोन सर्व हिंदूनीं येक होणें हे हिंदु धर्मास व कीर्तीस योग्य.

---

*फाळके यांचे. १ पडळ, शेतांत बांधलेली पडवी, मोकळी जागा. २ मजकूर. ३ विरोधी म्हणून उभे राहिल्याखेरीज. ४ अग्रभाग, आरंभ, भांडणाची कुरापत काढून असा अर्थ.

# २३०. बाजीराव मालकमच्या स्वाधीन

पे०द०, भा० ४१, नं० २२८ | १२-६-१८१८

श्री

आखबार* सुभे खानदेश सरहद मथवार तापी तीर बऱ्हाणपूर येथील वृत्त. श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब धुलघाटानजीक सातपुडया पाहाडात होते. जरनेर दफटीन साहेब बहादूर बऱ्हाणपुरानजीक लाल बागावर आहेत. जरनेल मालकीनसाहेब[1] बाहादूर याजकडून वकिलीस येक साहेब आले त्याचे त्याचे बोलणें होऊन श्रीमंत कूच करून साहेबाकडे भेटीस गेले मालकीन साहेबाच्या भेटीही जाहल्या. श्रीमंताबरोबर फौज होती त्यास साहेबानी चकत्या[2] देऊन आपले आपले देसी रवाना केले. ते स्वार काल छ ११ जुनी[3] पारोले यावरून गंगथडीकडे गेले. कपतान बेर साहेब बाहादूर पारोल्यास मुकाम करून आहेत. त्याणी दवड करून स्वारी गेली, त्याणी चकत्या दाखविल्या तेव्हा जाऊ दिल्हे. मालेगांव आद्याप लडत आहे. सेवेसी श्रुत होय. रवाना छ १२ जून मुकाम पारोले.

---

*बातमीपत्र. १ मालकम. २ पत्र, पास. ३ जूनला. मराठी पत्रव्यवहारांत इंग्रजी तारीख प्रथम केव्हां आली ?

# २३१. पुणेकरांचा स्वभाव

भा० इ० सं० मंडळ, त्रैमासिक
व० २० वें, अंक २ रा,
ऑक्टोबर १९३९, पृ० ९२

पुणें,
८ एप्रिल १८१८

## कलेक्टर रॉबर्टसन यांचा रिपोर्ट

आपणांस २० जानेवारीला येथील वृत्त पाठविलेंच आहे तेव्हांपासून इकडे विशेष महत्त्वाचें असें कांहीं घडलें नाहीं. पण लढाईची बाजू बाजीरावावर उलटूं लागल्याची बातमी येऊं लागल्यापासून पुण्यांतील जाणते रहिवाशी आपणास यापुढें ब्रिटिश सरकारच्या अमलाखालीं रहावें लागणार अशा समजुतीनें वागत आहेत. ज्यांना बाजीरावाच्या रोषाची भीति वाटत होती तेसुद्धां ११ फेब्रुवारीचा मातारचा जाहिरनामा* येथें प्रसिद्ध झाल्यापासून बोलू लागले कीं आम्ही बाजीराव जीची बाजू धरून आहोत याचा अर्थ आम्हास कंपनी सरकारबद्दल अप्रीती वाटते असें समजण्याचें कारण नाहीं. पुण्याच्या लोकांनीं तो जाहिरनामा इतक्या आधाशीपणें वाचला व त्याच्या नकलाही करून घेतल्या कीं मला त्याचें आश्चर्य वाटलें. राजकीय विषयावर गप्पा माराव्या व सरकारी घडामोडी व हालचाली यासंबंधीं आपले तर्क रचून ते प्रसृत करावे हा पुणेकरांचा स्वभाव मला माहीत होताच. पण तरी देखील त्यांचे त्या जाहिरनाम्याबद्दलचें औत्सुक्य मोठया नवलाचें होतें. येथील लोकाच्या ह्या प्रवृत्तीला धिटाई किंवा साहसाची जोड मिळाली तर ती प्रवृत्ती हा एक धोकाच आहे.

---

*हा जाहिरनामा प्रतापसिंहाकडून काढविला. तो कै. भावेकृत मराठी दप्तर रुमाल २ मध्यें छापला आहे.

# २३२. ग्रांट डफच्या इतिहासाची पूर्वतयारी



पेशवे दप्तर, भा० ४२, पत्र नं० २ } { ७-७-१८१९

[ राज्य ताब्यांत येतांच जितसत्तेचा इतिहास व त्यांची राज्यकारभाराची पद्धत इंग्रज किती दक्षतेनें समजून घेत आहे तें पाहा ].

" छत्रपति प्रतापसिंह याचे रोजनिशींतील उतारे "

रोजनिसी राजमंडळ[1] सुा आशरीन मया तैन व आलफ

१ छ १३ रमजान रोज बुधवार प्रातःकाली उठोन स्नानसंध्यादि नित्ये क्रम होऊन खोलीपुढं कचेरी जाली. वामन गोसावी याणी सतार वाजऊन दाखविले नंतर निद्रा जाली. त्रितीये प्रहरी ग्राटसाहेब याणी बलवंतराव चिटणीस यास बोलाऊन नेले आणि प्रतिनिधिपद कधी कोणते कारकीर्दीत जाले, पद जाले, त्याचे नाव व घालमेल कसी हे पुसिले. प्रल्हाद निराजीस राजाराम कारकीर्दीस चदींस पद जाले, ते परशराम त्रिंबक प्रतिनिधिपर्यंत (असे) लेहून घेतले. सन शक लेहून घेतला....नंतरी प्रश्न केला कीं, बाबती[2] व सरदेशमुखी व मोकासा[3], चौथाई व सावोत्रा[4], जाहगीर ही वाटणी कसी आहे; आमल कसा घेतात व स्वराज्ये हे काये, याचा आर्थ, मायेने[5] काये ? याचे उतर केले जैतापुरी दादा चिटणीस लेहून पुर्जे[6] कागद व माहिती शोध करून आणऊन समजाऊ. तसेच आष्ट प्रधान यास वेतन काय? नख्त[7] पोहचत होते की सरजाम वगैरे हे कसे हे लेहून आणावे. सांगितले बरे आहे. उतर केले तो आताच चिठी लेहून आणा बोलिले. नंतरी फर्मान पादषाहाचे

१ छत्रपतीच्या भोंवतीं प्रतिनिधि, सचिव, अमात्य वगैरेंचें मंडल असे त्यास,राजमंडल ही संज्ञा होती. त्याची रोजनिशी. २ देशमुख, देशपांडे इत्यादिकांचे हक्क. ३ लष्करी नोकरीची अट घालून दिलेलें इनाम, गांवच्या वसुलांत हिस्सा. ४ चौथाईपैकीं पंतसचिवांचा हिस्सा. ५ मायना, पद्धत. ६ दस्तऐवज, कागदाचा तुकडा. ७ रोख.

साल सन कोणते, किती वर्षें जाली? त्याचे उतर केले की पारसनीस मुनसी आहेत त्यास माहिती दखल[1] असेल. त्यास बोलाऊन आणा बोललेवरून आबा पारसनीस आणिले. त्याणी उत्तर केले, पत्रे फारसी फर्मान किल्यावरी आहेत. आणून पाहून सांगतो. नंतर जुनी पत्रे याच्या नकला करून नेल्या होत्या त्या आणिल्या. ठवाव्या बालाजीपंतासी बोलले....नकला आणिल्या बहुत खुसी जाली. बरे जलद आणिल्यात. रुमाल सोडून त्यांत बांधून ठवाव्या...नतर सांगितले उद्या लौकर यावे.

---

## २३३. संस्कृत पाठशाळेचा जाहीरनामा

पे०द०, भा० ४२, नं० ४ — २१-९-१८२१

श्री

जाहीरनामा सरकार दौलतमदार[2] कंपनी बाहादर सु।। इसने अशरीन मया तेन व अल्फ. तमाम ब्राह्मण लोकास जाहीर व्हावयाकरिता लिहिणेत येत आहे जे:—कुंपणी सरकारची मर्जी आहे की या मुलकात ब्राह्मण लोक बहुत आहेत. विद्या पढून पंडित व्हावे म्हणून, ऐशास शहर पुणे येथें विश्रामबागेचा वाडा पाठशालेस नेमून विद्या पढवणेस शास्त्री वैदिक वगैरेस नेमिले आहे.

१ ... ... ... ...

२ पढणार लोक जितके येतील तितक्यास विद्याभ्यास जे पाहिजे ते पढवावे. विद्या वाढावयाकरिता अनुत्पन्न[3] पाहून पढणार शंभर विद्यार्थ्यास सरकारातून दरमाहा रुपये ५ प्रो खर्चास पोटाकरिता मिळेल.

---

१ परिचित. २ राज्याचा आधार (ही पदवी आहे). ३ उत्पन्न नाहीं, गरीबी. त्यांची गरीबी आहे हें पाहून.

३ विद्या पढणेस लोक जे येणार ते आस्विन सुध ८ चे दिवसी सर्वत्रानी दप्तरचे[1] वाड्यामध्यें दाहा घटिका दिवसास[2] प्रातःकाली हजर व्हावें. ज्यास जे विद्या अपेक्षा आहे ते पढवणेस नेमणेंत येईल. सुध ५ दिवसापासून पढवणेस प्रारंभ होईल.

४ पढवणार व पढणारसुधा वर्तणूक करणेस विद्याभ्यास अधिकोतर जसे जसे करितील तसे त्यास दक्षणा अधिक मिळेल. न्याय ज्योतिष वैद्यशास्त्रास जाजती[3] दक्षणा मिलेल; म्हणोन ऐसे वर्तणूक करणेविषई कितेक कलमाची याद निराली लिहिली आहे, त्याप्रमाणे वर्तणूक करणेंत यावे.

येकूण च्यार कलमे लिहिली आहेत. तारिख २१ माहे सप्तबर सन १८२१ इसवी मुतावल[4] छ २३ जिल्हेज.

---

## २३४. बाजीरावाचें लग्न: वधूचा शोध

पे० द०, भा० ४१, नं० २६४ — {१८२२ (१)

श्री

ब्रह्मावर्तास बाजीराव सो लग्न करणार त्यास कन्या गणपतराव याची योजिली आहे ते कोण कोठे राहणार शोध घ्यावा म्हणौन साहेब याचे हुकूम जाहल* होत. त्याचे शोध घेताना गणपतराव भागवत यानी दप्तरदार सुभा खानदेश हाली नासिकात आहेत, याच कन्या देणचें निषकरष[5] जाहल आहे म्हणोन हरिभाऊ देशमुख यास पत्र आल आहे. म्हणौन साहेबास विनंती करावी हे विनंती.

---

१ रेकॉर्ड. २ म्हणजे सूर्योदयानंतर ४ तासांनीं सुमारें १० वाजतां. ३ जास्त. ४ चालू. *बाजीरावाच्या वधशोधाच्या हालचालीवरही साहेबाचें लक्ष आहे! ५ निष्कर्ष—निश्चित.

# २३५. छापील पुस्तकाचा चमत्कार

पे० द०, भा० ४२, नं० १२ | २१-१०-१८२२

हू

साहेब मेहरबान करम फर्माय दोस्तां† ह (न)-
राबल* मौट इस्टुवार्ट इलफिस्टन साहेब गवरनर
बाहादूर सलामत[१]

छ अजदिल[२] येखलास[३] माधवराव अनंत बादसलाम[४] अंकी येथील खे-रयत[५] जाणून आपली शादनामी[६] हामेशा[७] कलमी करीत[८] आसावी. दरीविला[९] आंसाहेबानी[१०] तारीख ९ आकटोंबरचे खत रवाना केले ते पावलें. जंजिरे मुंबईस हाली[११] छापखान्यांत महाराष्ट्र भाषेत पंचोपाख्यान बालबोध लिपीत यंत्रे करून बुके वाचावयास तयार केली आहेत. हा चमत्कार अवलोकनात यावा म्हणौन बुक पाठविले आहे, स्वीकार होऊन मनन व्हावें म्हणून लिहिलें ते कलले व बुक पाठविले ते पावले त्याचा स्वीकार करून बहुत खुषी हासल[१२] जाहाली. ज्यांचा जसा महजब[१३] त्या रीतीनेच त्यांचे संरक्षण करणे ही बुजुर्गी[१४] खुदाने आपल्यास दिल्ही आहे. हारवख्त[१५] आपले दानाईची[१६] याद[१७] होते. हार हामेषा खत[१८] रवाना करून मेहरबानगीची तरकी[१९] करीत

---

†करम फर्माय दोस्ता-मित्रावर कृपा करणारा. *ऑनरेबल मौट स्टुअर्ट एल्फिन्स्टन. १ सुरक्षित. २ (अज-पासून + दील-मन) मनापासून. ३ मैत्री. ४ (बाद-नंतर + सलाम-नमस्कार) नमस्कारपूर्वक. ५ क्षेम. ६ खुशाली. ७ नेहमीं. ८ कलमी करणें-लिहिणें. ९ या वेळीं. १० आंसाहेबानीं (आँ-तो, ती, तें) त्या प्रभूनीं, आपण. ११ हल्लीं. १२ हंशील, प्राप्त. १३ धर्मपंथ, धर्म. १४ थोरवी, मोठेपण. १५ दर वेळीं. १६. शहाणपण. १७ आठवण. १८ पत्र. १९ वृद्धि.

आसावें. रा छ ५ सफर जियादा[1] काय लिहिणे प्यार[2] महब्बत[3] कीजे हे किताबत.[4]

---

## २३६. उमाजी नाइकाच्या भावाशीं खलबत

पेशवेदप्तर, भा० ४२ वा, पत्र नं० २०, पृ० ६४ } { २८-६-१८३१

उम्याचा भाऊ कृष्ण्या हजर जाहाला तो बोलला, उम्याची साहा महिने गाठ नाहीं. इनसाफ[5] करीत आसल्यास मुदा[6] घालावा. नाही तरी सचिवाचे हदेतील[7] वतन व इकडील हदेतील सोडावे म्हणजे गेल्या बंगल्यात उम्या हजर होईल. नाही तरी जे करणे ते करावे. खर्चास देत होते, घेतले नाहीं. उम्याचा भाऊ आप्या आम्हापासी बोलला, आभये देत असल्यास उम्या हजर होईल. साहेबास कलविले. उतर केले, वचन द्यावयाचे नाही. उम्या इकडील सिपाई वगैरे लोकास बोलतो, तुम्ही आमचे आंगावर येऊ नये. तुम्हाकडे काही नाही. तुमचे वाटे जाण्याचे नाही. त्याचे कारण[8] दिसते, सचिवाकडे व इंग्रजाकडे इनाम जमिनी आहेत, इकडील हदीत काही नाहीत सबब आसे आसून साफ इकडे बोलणे वाकडे नाही व उपद्रव नाही. ते व्हो.[9] परंतु उपद्रव लावला फार रयेतेस पलता पलता. हे बोलणे आगाव[10] खरे आहे.

---

१ ज्यादा, बहुत. २ लाडका. ३ मेहेरबानी, आपल्या प्यारावर कृपा असावी. ४ हे किताबा–ही विनंति (किताबत–लेख). ५ निर्णय. ६ शर्त, अट. ७ हद्द. ८ रोख दिसतो. ९ असो, असेल. १० अगाऊ, प्रथम, अगदीं.

# २३७. कांहीं खाऊन मरावें!

पेशवेदप्तर, भा० ४२ वा, पत्र नं० ५०, पृ० १०० | ४-४-१८३७

## प्रतापसिंहाच्या डायरींतील नोंद

सेनापति व सनाकर्ते रसिदंट लाडऊक[१] सो[२] याजकडे जाऊन बोलणे जाले ते कलमे बिा[३]

१ बालाजीपंत किबे सेनापतीकडे सकाली येऊन बोलले की पधरा कलमाची याद घेऊन साहेबानी आपणास बोलाविले आहे. उतर की बारावर दोन वाजता येऊ.

२ गेल्यावर सो बोलले की हली याद कलमे गाळून पाठविली ती ठीक आहे; परंतु येके ठिकाणी आसे आहे कीं ही इंग्रजी सरकारची जबरदस्ती आहे व कांही खाऊन मरावे आसे शब्द माहाराजास आसू नयेत; व याणे गवरनर सोसहि घुसा येईल. सेनापति बोलले की आम्ही जो मजकूर लिहून याद पाठवावयाची ती पाठविली. तुम्हास इचा तरजुमा करून पाठवावयाची असल्यास पाठवावी नाही तर माघारी पाठवावी. त्याजवर सो बोलले पाठवितो.

३ सो बोलले की या यादीतील अर्थ काये? उत्तर जाले की या यादीत इसील[४] इतकेच की तुमचे दोन सो कमिशने* होऊन आले होते, त्याणी परभारे चौकशी केली आणि जबान्याच्या नकला देतो म्हणून बोलले ते दिल्ह्या नाहीत; व भेटून जातो म्हटले तेहि भेटले नाहीत, व मजकूर कांही कलला नाही; यास्तव ही चौकसी येकतर्फी आसी शाहा[५] आमचे व माहाराजाचे मनात आहे; व लिहिले गेले म्हणता, त्यास एकतर्फी समजुतीबरहुकूम

१ लॉडविक्. २ साहेब. ३ बितपशील, तपशील येणेंप्रमाणें. ४ तात्पर्य, मुद्दा. *चौकशीमंडळ. ५ शह, मुद्याची गोष्ट.

आल्यास त्याप्रो चालावे आसे म्हणाल; †मग तुमचे हाती काये; याजवर सो बोलले हे खरे आहे. याजवर सेनापति बोलले, याकरिताच आगोधर आम्ही तुम्हास बोललो. ऐकिले तरी ठीक; नाही तर गवनररापाशी बोलू. त्याणी न ऐकिल्यास लाटापाशी[1] बोलू. त्याणी न ऐकिल्यास कोर्ट डरकटर्ज्य[2] याजपासी बोलू. त्याणी न ऐकल्यात पादषा सरकारात बोलू आणि समजून देऊ. याजवर सो बोलले ठीक आहे. परंतु आम्ही माहाराजाचा मजकूर समजून देण्यास सिध्ध आहो; व माहाराजाना जबान्याच्या नकला कमिसनानी दिल्या नाही, भेटले नाही, ही साक्ष मी देईन.

४ सेनापति बोलले गवरनर याचे भेटीविसी पोषाखासारखे[3] न व्हावे व तेथे नेऊन फसऊ नये. तसेच आसल्यास कारण[4] नाहो आसे मनात आहे. याजवर सो बोलले, येविसी याद[5] पाठविली आसता चिंता नाही; आगर समक्ष येऊन बोलून ठरऊ.

---

† ' एकतर्फी समजुतीवरून हुकुम आला आहे हें खरें असलें तरी लिहून आलें आहे तसें चाला ' म्हणाल तर आम्ही विचारतों ' तुमच्या हातांत काय आहे ?' त्यावर साहेब म्हणाले ' हो माझ्या हातांत कांहीं नाहीं हेंही खरेंच. '
१ लॉर्ड, बडा साहेब गव्हर्नर जनरल. २ डायरेक्टर्स. ३ वर वर देखाव्यासारखे, औपचारिक. ४ जाण्याचें कारण नाहीं. ५ पत्र.

# २३८. 'महालमुलुख परत घ्या, पण संशय नको'

पेशवेदप्तर, भा० ४२ वा, नं० ५४ — १५-७-१८३७

## प्रतापसिंहाची तीन कलमी याद

इकडून सेनापति व सेनाकर्ते यास रसिदंट साहेब याजकडे पाठविले ते बोल्ले, त्यास उतर जाले की याप्रो यादी द्यावी. त्याजवरून कलमे लिहिली आहेत :—

१ प्रथम बाजीराव याचे लस्करातून फक्त इंग्रजी सरकारचा बादशाई चालीचा भरोसा व दोस्तीचीच इच्छा धरून इंग्रजी सरकारचे लष्करांत आलो. फक्त पूर्वीचे इशाऱ्यावर इंग्रजी सरकारचा भरवसा दोस्तीवर नजर ठेऊन येणे जाले. बाजीराव वगैरे लोक पुढे चालीचे रीतीचे भरवसा देत आसता त्याचा भरवसा धरिला नाहीं.

२ पुढे तह्नामा इंग्रजी सरकारानी केला त्या वेलेस ठरावाची कलमे कमजाजती काही न बोलता फक्त दोस्तीवर नजर देऊन इंग्रजी सरकार समजदार आहेत, सर्व समजोनच कर्णे ते करितील हा पूर्ण भरोसा ठेऊन जो तहनामा लाट साहेबाचे लिहिणेचा दिल्हा तो ठेविला.

३ हली वीस वर्षे दोस्तीवरच नजर देऊन चालविले आहे. फक्त दोस्तीची ख्वाहिष[1] व पेशजी इंग्रजी सरकारची नेक[2] नजर होती त्या वेलेस हलीचे मोकदम्याप्रो[3] कोणी काही समजाविल्यास येऊन पुसोन इकडील मनुष्य असल्यास इकडे चौकशी करून समजण्यात येत होते. परभारे आसलियास नाही किंवा आहे हे सागणे होताच, परभारे असलियास तिकडील तिकडे चौकशी करून निराकर्ण[4] करून घेऊन इकडे पुन्हा पुसत नव्हते, नेक नजर होती तोपर्यंत आसे चालले होते.

---

१ इच्छा, मागणी. २ नीट, सरळ. ३ दावा, तक्रारीचा मसुदा त्याप्रमाणें. ४ निरसन.

हली इंग्रजी सरकारची नजर नीट नाही आसे समजल्यावरून शेकडो पाहिजे ते रचना करून, कोण काय करील व बोलेल तो नेम नाही. हाजारो इंग्रजी सरकारचा डोला[1] दिसेल तसे बोलतील....हली इंग्रजी सरकारानी दोस्तीने जे केले, त्याजवरच दील ठेऊन चालविले होते. ते त्यास हली तसी नेक नजर दिसत नाही, संशयेचा दिलात वाटतो, त्याअर्थी हली जे इंग्रज सरकारानी हवाली केले आहे ते इंग्रजी सरकारानी सांभालावे. माहाल[2] मुलूक व वहिवाट[3] पाहावी. हाली मोकदमा जो चालविला आहे हा नसावा. ज्या लोभासाठीं संशये ते जिकडील तिकडे घ्यावे म्हणोन सदरी[4] लिहिले आहे, तेव्हा कोणती आडचण व बेहुरमत[5] आसू नये. इकडून फक्त दोस्तीची गरज आहे. लोभावर नजर नाही. ज्या वेलेस भरवसा वाटून इंग्रजी सरकारानी आपले दौलतीप्रा। इकडील[6] सरकारचे दौलती संपादतील आसे नजरेस वाटेल, तेव्हा इकडूनही पाहाण्यास नीट आहे.

येकूण तीन कलमे लिहिली आहेत, छ १२ राखर ता। १६ जुलई सन १८३७ इसवी. याप्रा। याद रेसिदंट वोबीन[7] साहेब याजकडे पाठविली.

---

१ डोळा. २ राजवाडा. ३ व्यवस्था, सर्व मामलतीची व्यवस्था पाहावी, 'व्यवस्था आपले आपण संभाळा' असा भावार्थ. ४ कलमीं, ज्याच्या लोभा-मुळें संशय उत्पन्न झाला ती जहागीरच नको. ५ अप्रतिष्ठा. ६ इकडील सरकार (प्रतापसिंह) राज्याची व्यवस्था पाहूं शकतील असें वाटेल. ७ ओव्हॅन्स.

# २३९. पुण्यांतील मद्यप्राशनविनाश मंडळी

ज्ञानप्रकाश* पृ. ३२६-२७, पुस्तक १, कागद ४१ | पुणें १२-११-१८४९

[हा व पुढील उतारा कमिशनरचे ऑफिसांतून नकलून आणला. हे उतारे घेऊं दिल्याबद्दल आम्ही एलिनेशन ऑफिसचे आभारी आहोंत.]

पुण्यांत ब्राह्मणज्ञातीमध्यें धर्माध्यक्ष कोणी नाहीं, यास्तव जे ज्याचे मनास येईल तसे तो करतो आणि वाम मार्ग व मद्यप्राशन बहुत वृद्धिंगत आहे. हा दुराचार नाशाप्रत न्यावा, व धर्मसंबंधी दक्षतेनें कारभार चालावा अशी उत्कंठा ज्यास आहे ते सर्व मागले गुरुवारीं रात्रीं जमून सभा झाली आणि त्यांत असें ठरलें कीं दहा असामी नेमावें त्यांस गैरवर्तणुकीमुळें बरतर्फ करणें तर सर्व सभासदांनीं जमून करावे व सर्वांनीं त्यांचे आज्ञेप्रमाणें चालावें, व त्याणी मद्यप्राशन नाशीसें करण्याकरितां मेहेनत करावी. त्याजवरून खाली लिहिलेले लोक पंच ठरविले'.

पंच

१ मोर दीक्षित  
२ कृष्णंभटजी गोखले  
३ श्रीपत भटजी वेव्हारे  
४ रघुनाथभट शारङ्गपाणी  
५ विष्णुभट साने

**प्रश्न** :—कायद्यास सम्मत, परंतु समाजास असम्मत, किंवा सामाजिक दृष्ट्या निंद्य, असें आचरण कोणीं केल्यास त्यास शिक्षा करण्यास आज असें कोणतें साधन आहे ? नसल्यास तें इष्ट कीं अनिष्ट ?

---

*पत्राचा आकार १२ × ८ इंच. १ या कागदावर ब्राह्मणमंडळीच्या सह्या घ्याव्या, जे कोणी देणार नाहींत त्यांना व ज्यांची सही पंच घेणार नाहींत त्यांना जातीबाहेर असें समजावें असें ठरलें.

# २४०. वर्तमानसार



समाचार पत्रांत असें लिहिलें आहे कीं कांहीं दिवसांवर मुंबई आणि ठाणें याजमध्यें एक डांकेची गाडी चालू जाहाली आहे ती एका रुपयाच्ये दरानें मनुष्यास पोंचते करती. व एका गाडींत चार मनुष्यें बसतात.

—**प्रभाकर*** २४ जानेवारी १८४७

**सातारचा राजा**—कामसंहालं† एथें नवेंबरच्ये २६ वे तारिखेस लोकांची सभा[1] भरली होती. या सभेचा उद्देश हा होता कीं हिंदुस्थान सरकारनें सातारच्या राजाशीं फार वाईट वर्तणूक करून त्यास गादीवरून पदच्युत केला आहे. त्यास त्याचे मुकदम्याची चौकशी करण्याविषयीं पार्लमेंटास अर्ज करावा. या सभेंत ४०० पासून ५०० पर्यंत लोक होते. आठ वरांच्ये सुमारे[2] डाक-तर बौरिंग हा प्रमुखस्थानीं येऊन बसला.

—**प्रभाकर** पुस्तक ५. कागद १२.
मु. मुंबई रविवार ता. १२ जानेवारी १८४७



*पत्राचा आकार ११×८ इंच. †विलायतेस. १ या सभेंत प्रतापसिंहातर्फे विलायतेस गेलेला रंगो बापूजी यांचें भाषण झाल्याचें नमूद आहे. २ आठ वाजण्याचे सुमारास (?).

## २४१. दुराचाराबद्दल प्रायश्चित्त



पे० द०, भा० ४३, नं० २९ } { (?)

### पृथ्वीप्रदक्षिणा व तीर्थस्नान

श्री

बालाजी धोंडदेऊ कुलकर्णी मौजे पेठ पारगाव ता। खेड सरकार जुनर याने कलवांतिणीसमागमे गमन व भोजन व मांसभक्षण व सुरापान केले, यामुले पतित जाला व यामुले याचें समस्त भाऊबंद आपांक्त[१] जाले म्हणून हुजूर ब्राम्हसभा करून धर्मशास्त्रमते यास प्रायेछित द्यावयाचा निर्णय करून पूर्वांग[२] प्रायेछित यास देऊन प्रिथवी प्रदक्षण तीर्थस्नानें करावयाची आज्ञा केली आहे. प्रदक्षणेस व तीर्थस्नानास पाठविला आहे. हा श्रीपुन्यक्षेत्रीं येऊन वास करून श्रीगंगेची तीर्थस्नाने करील. (अपूर्ण)



## २४२. एक सांकेतिक पत्र*



पे० द०, भाग ४३, नं० ३२ } { (?)

श्री

श्रीमत् सेवेसी दंडवत विनंती उपर. आग्निकवतुकांची दोन झाडें राहिलीं आहेत. पर्जन्यातिवृष्टीमुळें वाळतात. व चातकन्यायेची नगारियाचे निजभक्ष मागतात. अजी आज्ञा जालियां देवढीपासीं येऊन उभी राहातील हे विनती.



---

१ पंक्तिबाह्य. २ प्राथमिक. *अर्थ लागत नाहीं.

## २४३. दारूबंदीची ताकीद

पे० द०, भाग ४३, नं० ३६ | (?)

श्री

विनंती उपरी, बाजरांतील कलालाची दारू मना करणें म्हणोन लिहिले, त्याजवरून आज ताकीद करून भट्या मना करवितो. कळलें पाहिजे. हे विनंती.

## २४४. ब्रह्मावर्ताहून बाजीरावाकडून तिळगूळ

काव्येतिहाससंग्रह, लेखांक ४९८ | इ० स० १८५० (?)

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक सोयराजी अवधूत कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विशेष. विज्ञापना. ता। छ० २५ माहे रकि(बि)ला खर स्वामीचे कृपावलोकनें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. सरकारचें आज्ञापत्र सेवकाचे नावें सादर जाले कीं तुम्हांस—संक्रमणचे तीळ शर्करायुक्त पाठविले असत ते घेऊन स्वीकार करणें म्हणून त्यास आज्ञापत्र शिरसा वंदन करून शर्करामिश्रित तीळ अत्यादरें सेवकानें स्वीकारून अमृतलाभातुल्य आनंद होऊन सेवक सनाथ जाला. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.*

---

*ह्या पत्राची तारीख देण्यास साधन नाहीं. सन अंदाजानें दिला आहे.

# २४५. '...हिंदुधर्माचा अभिमान धरून प्रवृत्त झालें...'

माझा प्रवास अथवा सन १८५७ सालच्या बंडाची हकीकत } { पृ० १३८–३९

## तृषाक्रांत राणी लक्ष्मीबाई

[ 'माझा प्रवास' अथवा 'सन १८५७ सालच्या बंडाची हकीकत' वे. शा. विष्णुभट गोडसे वरसईकर यांनीं लिहून ठेविली ती कै. चिं. वि. वैद्य यांनीं इ. स. १९०७ मध्यें संशोधन करून छापविली. प्रस्तावनेंत कै. वैद्य लिहितात 'सदहू प्रेक्षक मूळचा भिक्षुक असून तो हिंदुस्थानांत बंडाचे दिवसांत द्रव्यार्जनाकरितां गेला होता......पुस्तकांत लिहिलेल्या बहुतेक गोष्टी ग्रंथकारानें पाहिलेल्या आहेत.'

इ. स. १८५८ च्या मार्च महिन्यांत इंग्रज झांशी सर करणार हें पाहिल्यावर राणी आपल्या घोड्यावर स्वार होऊन पाठीशीं आपल्या दत्तक पुत्रास घेऊन तीनशें निवडक स्वारांनिशीं सर ह्यू रोजच्या छावणींतून फळी फोडून निघाली व एकसारखी १०२ मैलांची दौड करून काल्पी येथें येऊन पेशव्यास मिळाली. पुस्तकाचा लेखक गोडसे हाही काल्पीस जाण्यास निघाला. ]

काल्पीचा रस्ता धरल्यानंतर मजल दरमजल जातां जातां एके दिवशीं सायंकाळीं एका खेडे वस्तीस येऊन पोंचलों. येथून काल्पी सुमारें साहा कोश राहिली होती. गावांबाहेर चिंचेची झाडी आहे; येथें स्वयंपाक तयार करून भोजनें झाल्यावर स्वस्थ निद्रा केली; पहांटेच्या प्रहर रात्रीच्या सुमारास, एकाएकीं मोठा गलका झाला. त्यासरसे उठून पाहातों तों शेंकडों स्वार रस्त्यानें उधळत चालले आहेत; असें दृष्टीस पडलें. हें काय आरिष्ट आलें आहे याची कल्पना हाईना. आम्हीही तसेंच घाईघाईनें आपलें सामान गुंडाळून, खाकोटीस मारून

शिपायी लोकांच्या बरोबर पळ काढूं लागलों. कांहीं वेळानें असें समजलें कीं, पेशव्यांची व इंग्रजांची चरखारीवर लढाई होऊन, त्यांत पेशव्यांचा मोड झाला. त्यांत झांशीवाली राणीही होती. ती फौज परत काल्पीवर चालली आहे. मग आम्ही किंचित् स्वस्थ होऊन झुंजुमंजूचे सुमारास एका विहीरीवर पाणी काढून शौचमुखमार्जन करण्यास बसलों. तों पांच चार स्वार विहिरीवरून जात होते. त्यांत झांशीवाली दृष्टीस पडली. तिनें सर्व पठाणी पोषाख केला होता, व सर्व अंग धुळीनें भरलें होतें; तोंड किंचित् आरक्त असून म्लान व उदास दिसत होतें. तिला तृषा फार लागली असल्यामुळें घोड्यावरूनच आम्हास तिनें तुम्ही कोण आहां असा प्रश्न केला. तेव्हां आम्ही पुढें होऊन हात जोडून विनंती केली कीं, आम्ही ब्राह्मण आहों आपल्यास तृषा फार लागली असल्यास पाणी काढून देतों. बाईसाहेबांस ओळख पटली व खालीं उतरल्या. मी रसी[1] मडकें घेऊन लागलीच विहिरींत सोडणार, तों बाईसाहेब म्हणाल्या कीं, तुम्ही विद्वान ब्राह्मण, तुम्ही मजकरितां पाणी काढूं नका. मीच काढून घेतें. हे तिचे उदासपणाचे शब्द ऐकून मला फार वाईट वाटलें. परंतु निरुपायास्तव रस्सी मडकें खालीं ठेवलें. बाईसाहेबांनीं पाणी काढून, त्या मृण्मय पात्रांतून ओंजळीनें पाणी पिऊन तृषा हरण केली. दैवगति मोठी विचित्र आहे. नंतर मोठ्या निराश मुद्रेनें बोलल्या कीं, 'मी अर्धा शेर तांदुळाची धनीन, मजला × × × विधवाधर्म सोडून हा उद्योग करण्याची कांहीं जरूर नव्हती. परंतु हिंदुधर्माचा आभिमान धरून ह्या कर्मास[2] प्रवृत्त झालें, व याजकरितां वित्ताची, जीविताची सर्वांची आशा सोडिली '.....

---

१ दोरी. २ अर्थात् युद्धास.

# २४६. राणीच्या जाहीरनाम्यास उत्तर

धूमकेतू†, वर्ष ६, पृ० २०५ कॉलम २ | २४-१२-१८५८

इंग्लिशम्यान पत्रावरून असें समजण्यांत येत आहे कीं विलायतच्या राणीच्या नांवानें थोडक्याच दिवसांत या देशांत प्रगट जहालेला जाहिरनामा जेव्हां अयोध्ये बुनरी मुकामीं बेगमच्या छावणींत जाऊन प्रगट जाहाला व त्याच्या नकला जागोजाग रस्त्यामध्यें चिकटविलेल्या बंडवाल्यांच्या दृष्टीस पडल्या तेव्हां त्याणीं दुसऱ्या दिवशीं पानसुपारी खाऊन त्या नकलावर थुंकून त्या अगदी लाल करून टाकल्या व मग त्या जाहिरनाम्याच्या उलट इंग्रेजांच्या एका अदालतीमध्यें* शिरस्तेदाराच्या कामावर पूर्वीपासून असणारा कोणी एक फझुल हक्क नांवाचा मुसलमान याणें तयार केलेला व क्वीन विक्टोरियाच्या जाहिरनाम्याचे उत्कृष्टरीतीनें अगदीं अक्षरशः खंडन करणारा एक जाहिरनामा हिंदी भाषेंत बेगमच्या नांवानें जिकडे तिकडे पाठवून दिला.

—धूमकेतू वर्ष ६, ता. २४ डिसेंबर १८५८
पृ. २०५ कॉलम २

---

†पत्राचा आकार १९॥ × १२॥ इंच. *कोर्टीत.

# २४७. तात्या टोपे याचा जाहीरनामा

धूमकेतू,
पृ० २०८

२४ डिसेंबर १८५८

तात्या टोपे याणें गेल्या नवेंबर महिन्याच्या ७ व्या तारखेस मुलताई मुकामीं रावसाहेब पेशवे यांच्या नांवानें जो जाहिरनामा लावला त्याचा सारांश आम्ही आपल्या वाचणाराकरितां हा एथें खालीं लिहिला आहे :—

सर्व शहरें लहान मोठीं गांवें व खेडीपाडीं एथील राहणारे मध्यमप्रतीचे लोक व्यापारी, दुकानदार लष्करी लोक व त्याजप्रमाणें इतर सर्व प्रतीचे लोक यांस असें कळविलें जातें कीं जयाचा झेंडा बरोबर बाळगून राज्याच्या मुख्या-बरोबर असणारी जी ही फौज इकडेस आली आहे ही फक्त धर्मबाह्य खिरस्ती लोकांच्याच नाशाकरितां एथें आली आहे, या देशांत राहाणाऱ्या लोकांची खराबी करण्याकरितां ती इकडेस आलेली नाहीं.

सर्व लोकांस आणखी असे कलविलें जातें कीं, जिकडे तिकडे जय मिळ-वीत येणारी ही फौज इंग्रजांची मात्र शत्रू आहे. तिचा या देशांतील शेतकरी लोकांशीं कांहीं एक द्वेषभाव नाहीं, आपण ज्या मुलुखांतून जातों त्या मुलुखांतील लोकांचें कोणत्याही प्रकारें नुकसान करावें हें आजपर्यंत या फौजेपैकीं कोणाच्याही मनांत कधीही नव्हते व अजूनही नाहीं. परंतु या फौजेस सामानसुमान मिळालें पाहिजे. व शत्रु आपल्या समोर असतांना तर ते कोणत्याही रीतीनें मिळविण्याची आवश्यकता असल्यामुळें कांहीं कांहीं ठिकाणी गांवकरी गांव सोडून पळून गेले तेव्हां या फौजेस सामानसुमान विकत मिळेनासे जाहाले तेव्हां त्यास तें जबरीनें घ्यावें लागलें, यामुळें कित्येक गांवाची लुटालूट जाहाली, हें त्या गांवच्या लोकांस आपल्या मूर्खपणाचेंच फळ प्राप्त जाहालें...........तर या उपर कोणत्याही गांवच्या लोकांहीं ही फौज गांवा-नजीक आली असतां पळून जाऊ नये. ज्या सामानाची या फौजेस गरज लागेल तें सामान शिरस्त्यापेक्षां कांहीं जास्ती किंमत ठरऊन त्या किमतीनें

गांवकरी लोकापासून विकत घेतले जाईल. हा जाहिरनामा ज्या गांवीं जाऊन दाखल होईल त्या गांवच्या मुख्यानें तो आपल्या आसपासच्या गांवांत पाठऊन द्यावा म्हणजे तेणेकरून लोकांची सर्व भीती दूर होईल.

---

## २४८. तात्या टोपे याच्या त्वरेच्या हालचाली

**धूमकेतू, वर्ष ६, अं० ५१, पृ० २०७** — २४-१२-१८५८

तात्या टोप्या याजबाबद गेल्या आठवड्यांत कांहीं एक सांगण्याजोगती बातमी आलेली नाहीं. गेल्या बुधवारच्या टेलेग्राफपत्रांत बडोद्याहून आलेलें चालत्या महिन्याच्या १८ व्या तारिखचे एक पत्र छापलें आहे त्यांत तो पत्र लिहिणारा असें लिहितो कीं तात्या टोप्या हा बडोद्यापासून पूर्वेस सुमारें १०० कोशावर आहे असें म्हणतात. परंतु तो प्रस्तुत कोठें आहे याचा नीट बरोबर शोध मुळींच लागत नाहीं. त्याजवळ तोफा मुळींच नाहींत याजमुळें तो फार त्वरेनें इकडून तिकडे फिरतो व याखेरीज त्याणें जिकडे तिकडे गुप्त बातमीदार ठेवले आहेत. याजमुळें इंग्रजांचें लष्कर कोठे कोठें याचा त्यास नीट पक्का शोध असतो व तो त्याजपासून पाहिजे तितक्या अंतरावर असतो. तात्या टोपेजवळ आतां पुष्कळ हत्ती व तसेंच ग्वालेर मुकामीं मिळविलेली लूटही आहे असें म्हणतात.

---

## २४९. बंडवाले थकले

धूमकेतू, वर्ष ६, अं० ५२, पृ० २०६ } { ३१-१२-१८५८

—इंग्रजांच्या लष्करापैकीं एक शीक स्वार बातमी काढण्याकरितां तात्याच्या छावणींत गेला होता तो परत येऊन असें सांगू लागला कीं बंडवाल्यांचे लोक व घोडे हे अगदीं थकून गेले आहेत. परंतु पुढे चाल करण्यास जीं साधनें पाहिजेत त्यांचा पुरावा करणाऱ्या मित्रांची त्यास कांहीं कमताई नाहीं. रजपुतान्याचा पोलिटिकल एजंट कपतान शोअर्स हा हल्लीं मेजर रोक याच्या छावणीबरोबर आहे अशी बातमी आलेली आहे.

## २५०. पुणें सातारा हवालीं करा

धूमकेतू' पुस्तक ७, अं० ३४, पृ० १३३ } { २६-८-१८५९

नानासाहेब पेशवे यांहीं[2] पुणें व सातारा हीं ठिकाणें इंग्रज सरकारनें परत आपल्या स्वाधीन केलीं असतां आपण इंग्रज सरकारशीं लढाई बंद करूं असें आग्र्याच्या लेफ्टनंट गवर्नरला लिहून पाठविलें आहे अशी एक बातमी मद्रासस्पेक्टेटर वर्तमानपत्रांत लिहिली आहे.

१ हे ‘ धूमकेतू ’ साप्ताहिकांतील सर्व उतारे श्री. य. न. केळकर यांनीं दिले याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. २ यांनीं.

# सूचि

## श्री



## अ



## आ



## इ

उ



ए



ओ



औ



अं



क



ख

फ



ब